'बालपण' हे मॅक्सिम गोर्की यांच्या आत्मचरित्रात्मक त्रयीमधील पहिले पुस्तक. ('बालपण', १९१४; 'दाही दिशा', १९१५; 'माझी विद्यापीठे', १९२३.)

'बालपण' चा नायक स्वतः लेखक आहे. छोटा अल्योशा पेश्कोव – लेखक मॅक्सिम गोर्की यांचे साहित्यातील टोपणनांव – समजून घ्यायचा आटोकाट प्रयत्न करतो की, जगाची दोन भागांमध्ये विभागणी का झालीय? एक जग आहे त्याच्या आजीचे. ह्या तेजस्वी जगात तिला लोकांविषयी अपार प्रेम आणि करुणा वाटते; आनंदी स्वभावाचा रंगारी त्सिगानोक व "झकास" हेसुद्धा याच जगातील! दुसरे जग संकुचित आणि लोभी वृत्तीच्या माणसांचे. भावी लेखकाला अगदी लहानपणापासूनच "दुष्ट" जीवनाविषयी तिटकारा होता. "जीवनाची पुनर्घडण" करण्याची लहानपणापासूनच त्याला आस होती.

मॅक्सिम गोर्की

# बालपण

कादंबरी



प्रगती प्रकाशन
मॉस्को

अनुवाद – अनिल हवालदार

सजावट – लेव ग्रीत्चेन, लेव कातायेव

М. Горький

ДЕТСТВО

повесть

*на языке маратхи*

© मराठी अनुवाद, प्रगती प्रकाशन, १९८१

सोविएत संघात मुद्रित

Г $\frac{70302-588}{014(01)-81}$ без объявл. 4702010200

१

त्या छोटया, धुकट खोलीच्या खिडकीखाली फरशीवर माझा बाप पसरला होता. तसा तो लांबलचक वाटत होता आणि पांढरेस्वच्छ कपडे त्याने घातले होते. त्याच्या उघडया पडलेल्या पायांचे अंगठे विचित्रपणे फाकले होते आणि शांतपणे आपल्या छातीवर आडव्या धरलेल्या त्याच्या नाजुक हातांची बोटेही तशीच वेडीवाकडी झाली होती. त्याचे हसरे डोळे तांब्याच्या काळपट वाटोळया नाण्यांनी झाकले होते, त्याचा प्रेमळ चेहरा काळा-निळा पडला होता. त्याच्या भक्कम दातांची चमक माझ्या छातीत धडकी भरवीत होती.

लाल घागरा घातलेली माझी आई माझ्या बापाशेजारी ओणवी बसली होती. तिच्या अंगावर आणखी फारसे कपडे नव्हते. माझ्या बापाचे मऊ केस ती काळया कंगव्याने विंचरीत होती. हा कंगवा मी कलिंगडाची साल कापण्यासाठी करवत म्हणून वापरायचा. खोल, घोगऱ्या आवाजात आई सारखी काहीतरी पुटपुटत होती. तिचे राखी डोळे सुजले होते आणि मोठया आसवांमध्ये जणू विरघळून जाणार असे वाटत होते.

माझा हात माझ्या आजीने धरला होता. मोठे डोके, टपोरे डोळे, गंमतीदार गुबगुबीत नाक असलेली ती गोल अंगाची बाई होती. तिचे अंग खूप मऊ मऊ होते, रंग काळसर होता आणि ती खूप आकर्षक होती. तीसुद्धा रडत होती. पण अशा गंमतीदार रीतीने रडत होती की, माझ्या आईच्या रडण्याला तिच्या रडण्याची सुरेख साथ मिळत होती. तिचे सारे अंग थरथर कापत होते आणि मला माझ्या वडिलांकडे ती लोटत होती. पण मी मागे सरत होतो, तिच्या घागऱ्यामागे लपत होतो. मला भीती वाटत होती आणि बेचैन वाटत होते.

यापूर्वी मोठ्या माणसांना रडताना मी कधीही पाहिले नव्हते. माझी आजी मला सारखी सांगत होती त्या शब्दांचा अर्थ मला समजत नव्हता :

[illegible] पुन्हा त्यांना कधीही [illegible] पाहणार [illegible] अचानक वारले, आयुष्यातील धक्का [illegible]

[illegible] झालो होतो. त्या [illegible]पणात [illegible] गंमत करीत माझ्याशी खेळला [illegible] होती. पण एकदम तो नाहीसा झाला होता आणि [illegible] बाई, म्हणजे माझी आजी होती.

"इथं येण्यासाठी तुला खूप अंतर चालावं लागलं?" मी तिला विचारले होते.

"मी चालले नाही, बोटीमधून आले. अरे भोपळ्या, माणसं पाण्यावर चालत नाहीत," ती उत्तरली. "मी खालून* वरती आले."

तिचे हे बोलणे मला फार गंमतीदार आणि घोटाळ्याचे वाटले. आमच्या घरात वर रहात होते काही दाढीवाले पर्शियन, तर खाली तळघरात रहात होता एक पिवळ्या कातडीचा म्हातारा काल्मीक. तो मेंढकातडया विकायचा. कठडयाचा गज घसरून खाली जाता येते किंवा पडलात तर कोलांटी उडी मारून खाली जाता येते हे मला चांगले माहीत होते. पण इथे पाणी कुठून आले? ती काहीतरी अगदी चुकीचे सांगत होती आणि वेडयासारखा गोंधळ करीत होती.

"तू मला भोपळा का म्हणालीस?"

कारण तू खूप मोटा आहेस," हसून तिने मला टोमणा मारला.

तिचे बोलणे प्रेमळ, आनंदी आणि तालबद्ध होते. अगदी पहिल्याच दिवसापासून आम्हा दोघांची खूप मैत्री जमली. आणि आता त्या खोलीमधून आम्ही दोघे कधी एकदा बाहेर जातो असे मला झाले होते.

माझ्या आईने मला अस्वस्थ केले होते. तिच्या अश्रूंनी आणि विव्हळण्याने अनोळखी भीती माझ्या मनात साठत होती. यापूर्वी मी तिचा असा अवतार कधीच पाहिला नव्हता. एरवी ती फार खंबीर बाई होती. फार मोजके बोलायची. ती अगदी स्वच्छ, मऊ आणि एखाद्या घोडीसारखी धिप्पाड होती. तिचे शरीर भक्कम होते आणि हात खूपच बळकट होते. पण आता मात्र

---

* रशियन शब्द "नीझ्नी" म्हणजे "खालचा". "नीझ्नी-नोवगरद"ला "नीझ्नी" अशा संक्षिप्त नांवाने ओळखले जात असे. – अनु.

ती कमालीची बेंगरुळासारखी सुजली होती आणि विस्कटलेली होती. तिचे कपडे फाटले होते. एरवी तिचे केस व्यवस्थितपणे डोक्यावर बांधलेले असत. पण आता तिच्या उघड्या खांद्यांवरून ते ओघळत होते, तिच्या डोळ्यांवर केसांच्या झिंज्या आल्या होत्या आणि एक वेणी माझ्या बाबांच्या झोपलेल्या तोंडावर लोळत होती. मी इतका वेळ खोलीत उभा होतो, पण एकदाही तिने माझ्याकडे ढुंकून पाहिले नव्हते. माझ्या बापाचे केस विंचरण्यात आणि रडण्यात ती पुरती गढून गेली होती.

कामावरचा शिपाई खोलीत डोकावला. त्याच्याबरोबर काळपट चेहऱ्याचे काही बाप्ये होते.

"आटपा लौकर आणि बाहेर आणा त्याला," चिडक्या आवाजात शिपाई ओरडला.

खिडकीवर एक काळी शाल पांघरली होती आणि वाऱ्यामुळे ती शिडा-सारखी फडफडत होती. एकदा माझा बाप मला शिडाच्या बोटीतून फिरायला घेऊन गेला होता तेव्हा अचानक वीज कडाडली होती. हसून माझ्या बापाने आपल्या गुडघ्यांमध्ये मला धरले होते आणि मोठ्यांदा ओरडून तो म्हणाला होता :

"पोरा, घाबरू नको. हे काही विशेष नाही."

एकदम माझी आई झपाट्यासरशी उभी राहिली आणि उताणी फरशीवर कोसळली. तिचे केस फरशीवर अस्ताव्यस्त पसरले होते. डोळे मिटलेला तिचा चेहरा काळा-निळा पडला होता. माझ्या बाबांप्रमाणेच तिने आपले दात करकचून आवळले होते.

"दाराला कडी लावा — अलेक्सेयला बाहेर न्या," भयानक आवाजात धापा टाकीत ती म्हणाली.

दाराकडे धावता धावता माझ्या आजीने मला बाजूला सारले.

"भल्या माणसांनो, घाबरू नका!" ती ओरडली. "तिला हात लावू नका! मेहरबानी करून बाहेर जा! हा कॉलरा नाही! तिला बाळंतपणाच्या वेणा येताहेत! दया करा भल्या माणसांनो!" आजी ओरडत होती.

एका अंधाऱ्या कोपऱ्यात मी ट्रंकेमागे लपलो. फरशीवर तळमळणाऱ्या, कण्हणाऱ्या, दात कराकरा खाणाऱ्या माझ्या आईला मी तिथून पाहू शकत

होतो. दरम्यान माझी आजी इकडे तिकडे सरपटत होती, प्रेमाने आणि आनंदाने पुटपुटत होती :

"बापासाठी आणि पोरासाठी सोस! वार्यूषा,* कळा सहन कर! हे मेरी माते, हे कृपाळू..."

मी कमालीचा घाबरलो होतो. माझ्या बापाशेजारीच त्या दोघी फरशीवर हालचाली करीत होत्या, कण्हत होत्या, रडत होत्या, त्याला धक्के मारीत होत्या. पण तो मात्र अगदी चुपचाप पडला होता. त्यांच्याकडे पाहून जणू हसत होता. असे बराचवेळपर्यंत चालले. अनेकवेळा आईने लटपटत उभे राहण्याचा प्रयत्न केला. पण दरवेळी ती खाली पडायची. माझी आजी खोलीच्या आत-बाहेर सारखी पळापळ करीत होती. एखाद्या मोठ्या काळ्या चेंडूसारखी ती वाटत होती. अचानक अंधारात लहान बाळाचे रडणे ऐकू आले!

"देवाची कृपा," निःश्वास टाकीत आजी उद्गारली. "मुलगा झाला!"

तिने मेणबत्ती पेटवली.

मला कोपऱ्यातच झोप लागली असावी, कारण मला आणखी काहीच आठवत नाही.

माझी पुढची ठळक आठवण आहे ती एका पावसाळी दिवसात स्मशानभूमीतल्या एका ओसाड जागेची. एका निसरड्या मातीच्या ढिगाऱ्यावर मी उभा होतो आणि माझ्या बापाची शवपेटी ज्या खड्ड्यात लोक ठेवीत होते त्या खड्ड्याकडे टक लावून पहात होतो. त्या खड्ड्याच्या तळाशी पाणी साचले होते आणि बेडक्या उड्या मारीत होत्या. दोन बेडक्यांनी तर शवपेटीच्या पिवळ्या झाकणावर उड्या मारल्या होत्या.

थडग्याशी जेमतेम उभी असलेली माणसे म्हणजे पावसात निथळणारा पहाऱ्यावरचा माणूस, फावडी घेतलेले दोन रागीट बाप्ये, माझी आजी आणि मी. आम्ही सारे पावसाच्या सरीत चिंब न्हाऊन निघालो होतो.

"लोटा माती तिच्यावर," पहारेकरी म्हणाला आणि तिथून निघाला.

---

* रशियन भाषेत -षा -यूषा, -ओश्का, -ओच्का ही उपपदे विशेषनामाच्या पुढे जवळिकीची भावना आणि प्रेम व्यक्त करण्यासाठी लावतात. उदा. – वार्या-वार्यूषा, अलेक्सेय-आल्योशा. – **अनु.**

आपल्या शालीच्या टोकांनी आपला चेहरा झाकून माझी आजी रडत होती. बाप्ये ओणवे वाकले आणि फावडयांनी काही चिखल त्यांनी खड्ड्यात लोटला. पाणी पचकन उडाले आणि थडग्याच्या भिंतींशी बेडक्या टकरा मारू लागल्या. पण मातीची ढेकळे त्यांना खाली लोटत होती.

"अल्योशा, चल इथून," माझी आजी माझ्या खांद्याला धरून म्हणाली. मी तिच्या पकडीमधून स्वतःची सुटका करून घेतली, पण तिथून दूर मात्र गेलो नाही.

"अरे देवा," तिने अशा काही सुरात सुस्कारा टाकला की, ती माझ्याबद्दल तक्रार करीत होती का देवाबद्दल गाऱ्हाणे घालीत होती, याची ऐकणाऱ्याला शंका वाटावी. खूप वेळपर्यंत मान खाली घालून ती तेथे गप्प उभी राहिली. थडग्यावर पुरती माती लोटून झाली तरी ती तशीच उभी होती.

बाप्यांनी आपल्या फावडयांच्या उलटया पात्यांनी थडग्यावरची माती चोपली. वारा सुटला होता व त्याने पावसाला पळवून लावले होते. आजीने माझा हात धरला आणि काळ्या क्रूसांच्या जंगलात उभ्या असलेल्या दूरच्या चर्चच्या दिशेने ती मला घेऊन निघाली.

"तू रडत का नाहीस?" स्मशानाबाहेर आल्यानंतर तिने मला विचारले. "तू रडलं पाहिजेस."

"पण मला रडावंसं वाटत नाही," मी म्हणालो.

"ठीक आहे. तुला तसं वाटत नसेल तर नको रडू," ती शांतपणे उत्तरली.

तिने मला रडायला सांगावे याचे मला मोठे आश्चर्य वाटले होते. मी फार क्वचित रडत असे. तोसुद्धा माझ्या भावना दुखावल्या जात तेव्हा. शारीरिक वेदना झाली म्हणून मी कधीच रडलो नव्हतो. माझ्या आसवांना माझा बाप नेहमी हसायचा. पण आई ओरडायची:

"खबरदार रडशील तर!"

त्यानंतर, दुतर्फा काळपट लाल रंगाची घरे असलेल्या एका रुंद, चिखलभरल्या रस्त्यावरून आम्ही द्रोश्की* मध्ये बसून गेलो.

---

* द्रोश्की – घोडयाची बग्गी. – अनु.

"बेडक्या बाहेर यायच्या नाहीत?" मी विचारले.

"नाही. देव त्यांचं भलं करो," आजी उत्तरली.

माझा बांप किंवा माझी आई कधीही इतके सारखे देवाचे नांव घेत नसत. देवाच्या नांवाशी माझ्या आजीइतकी त्यांची जवळीक नव्हती.

त्यानंतर काही दिवस उलटले. मी, माझी आई, आजी असे सारेजण बोटीच्या एका छोटया केबिनमधून प्रवास करीत होतो. माझा लहानगा भाऊ माक्सिम वारला होता. तांबडया फितींनी बांधलेल्या पांढऱ्या कपडयात गुंडाळलेले त्याचे बंडल कोपऱ्यातल्या एका टेबलावर ठेवलेले होते.

आमच्या ट्रंकांच्या आणि गाठोडयांच्या माथ्यावर बसून मी फुगीर वाटोळ्या खिडकीतून बाहेर पहात होतो. ती खिडकी मला घोडयाच्या डोळ्याची आठवण करून देत होती. काळपट, फेसाळ पाणी काचेखालून वहात होते. काहीवेळा ते खिडकीशी काच संपूर्ण धुवून जायचे. तेव्हा मात्र मी नकळत खाली उडी मारायचा.

"भिऊ नको," आपल्या नरम हातांनी मला पुन्हा गाठोडयांवर उचलून ठेवीत आजी म्हणाली.

पाण्यावर ओलसर राखी धुके ओटंगले होते. काही वेळाच्या अंतराने अचानक धुक्यामधून दूरवर एखादा जमिनीचा काळा पट्टा उमटायचा आणि तेवढयाच अचानकपणे नाहीसा व्हायचा. आमच्या भोवतालच्या सर्व वस्तू हादरत होत्या. फक्त माझी आई ताठ आणि निश्चल उभी होती. ती भिंतीशी टेकली होती, आपले हात तिने डोक्यामागे धरले होते आणि डोळे गच्च मिटून घेतले होते. तिचा चेहरा गंभीर होता, काळवंडला होता, निस्तेज होता. तिने सबंध वेळात एकही शब्द उच्चारला नव्हता. ती आजीशी नवी आणि वेगळी भासत होती. इतकेच काय तर तिने परिधान केलेला पोषाखही मला अपरिचित होता.

अधूनमधून माझी आजी तिला हळूच म्हणायची

"वार्यूषा, एखादा घास अन्न खा ग... अगदी [illegible]..."

पण माझी आई गप्प आणि स्तब्ध राहिली

आजी माझ्याशी दबत्या आवाजात बोलत होती. माझ्या आईशी ती थोडया मोठयांदा बोलत होती; पण अगदी [illegible], [illegible] आणि क्वचित

बोलायची. ती माझ्या आईला भीत होती असे दिसत होते. मला मात्र हे कोडे उमजत नव्हते आणि त्यामुळे मी आणखीच आजीच्या जवळ ओढला गेलो.

"सारातोव," अचानक मोठ्या, कठोर सुरात माझी आई म्हणाली. "खलाशी कुठाय?"

तिचे ते शब्दही मला विचित्र आणि अनोळखी वाटले – "सारातोव", "खलाशी ..."

रुंद खांद्यांचा, पांढऱ्या केसांचा, निळ्या कपड्यातला आणि हातात छोटे खोके घेतलेला एक माणूस केबिनमध्ये आत आला. आजीने ते खोके त्याच्या हातून घेतले व माझ्या छोट्या भावाचे शरीर ती त्यात ठेवू लागली. ते काम पुरे केल्यावर पसरल्या हातांवर खोके धरून ती दरवाजापर्यंत गेली. पण ती एवढी लठ्ठ होती की एका बाजूला वळल्याशिवाय तिला दारातून बाहेर जाणे शक्य होईना. गोंधळून ती तशीच उभी राहिली तेव्हा मोठी मजेदार दिसत होती.

"आई, तुझी कमाल आहे!" अधीऱ्या सुरात माझी स्वतःची आई ओरडली व आजीच्या हातून तिने ती छोटी शवपेटी घेतली. नंतर त्या दोघीही गायब झाल्या आणि मी त्या निळ्या कपड्यातल्या माणसाबरोबर केबिनमध्ये राहिलो.

"तर मग तुझा भाऊ आपल्याला सोडून गेला," ओणवे होऊन तो माझ्याशी बोलला.

"तुम्ही कोण?"

"खलाशी."

"आणि सारातोव कोण?"

"गाव. खिडकीमधून बाहेर बघ. ते तिथं आहे."

खिडकीजवळून सरकणारी जमीन काळी, गुठळीदार आणि धुक्यात गुरफटलेली होती. ती जमीन पाहताना नुकत्याच कापलेल्या पावाच्या भल्या मोठ्या तुकड्याची मला आठवण होत होती.

"आजी कुठं गेली?"

"तिच्या नातवाला पुरायला."

"त्याला ते जमिनीत पुरतील?"

"अर्थात."

माझ्या बापाला पुरले तेव्हा त्याच्याबरोबर जिवंत बेडकांना कसे पुरण्यात आले ते मी त्या खलाशाला सांगितले. त्याने मला कडेवर उचलून घेतले, मला घट्ट मिठी मारली आणि माझी पापी घेतली.

"अरे बाळा, अजून तुला खूप काही समजत नाही!" तो म्हणाला. "त्या बेडकांची दया वाटायचं कारण नाही, ते मरं देत लेकाचे! पण तुझ्या आईची दया येते. केवढं दुःख कोसळलंय बिचारीवर!"

वरती एकदम कर्कश्य शिट्ट्या आणि भोंगे ऐकू आले. पण आगबोटीचे ते आवाज आहेत हे मला माहीत असल्यामुळे मी घाबरलो नाही. खलाशाने घाईघाईने मला खाली ठेवले आणि गडबडीने जाता जाता तो म्हणाला: "मला गेलं पाहिजे!"

मलाही जायची इच्छा होती. मी केबिनच्या बाहेर गेलो. अंधाऱ्या, अरुंद बोळकंडीत कुणीही नव्हते. दारापासून जवळच जिन्यावरचे पितळ चकाकताना मला दिसत होते. मी वर पाहिले तेव्हा बॅगा आणि बोचकी हातात धरलेली माणसे दृष्टीला पडली. प्रत्येकजण बोट सोडून जात होता हे स्पष्ट होते. तेव्हा मलाही जाणे भाग होते.

पण जेव्हा मी डेकवर पोचलो आणि बाप्यांच्या ओळींमधून झुलत्या फळीकडे जाऊ लागलो तेव्हा लोक माझ्यावर ओरडू लागले:

"ए तू कोण? कुणाचा?"

"मला माहीत नाही."

बराच वेळपर्यंत त्यांनी मला इकडे तिकडे लोटले, माझ्या अंगाला चाचपून पाहिले. शेवटी तो पांढऱ्या केसांचा खलाशी तेथे आला आणि मला पाहून म्हणाला:

"तो अस्त्रखानचा आहे. केबिनमधून बाहेर आलाय..."

मला उचलून घेऊन तो परत केबिनकडे धावला. तिथे त्याने बोचक्यांवर मला बसवले आणि हाताच्या बोटाने धाक घालीत म्हणाला:

"इथून हलशील तर खबरदार!" आणि तो बाहेर गेला.

हळूहळू वरची धांदल विरली, आगबोट थरथरायची थांबली. पाण्याचे सपकारे थांबले. केबिनच्या खिडकीला एका ओल्या भिंतीने झाकून टाकले. केबिनमध्ये अंधार पडला आणि कोंदट वाटू लागले. गाठोड्यांचा आकार

मोठा भास लागला आणि ती मला गिळून टाकतील अशी धास्ती वाटू लागली. ह्या रिकाम्या बोटीवर ते मला एकट्याला सोडून गेले तर?

मी दारापाशी गेलो. ते घट्ट बंद केले होते आणि पितळी मूठ मला फिरविता येईना. मी दुधाची बाटली उचलली आणि अंगातली सारी ताकद एकवटून त्या मुठीवर भिरकावली. बाटलीच्या ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या. दुधाचे ओघळ माझ्या पायांशी आले, माझ्या बुटांमध्ये शिरले.

माझ्या अपयशामुळे मी खचलो आणि गाठोड्यांवर आडवा पडून रडू लागलो. मला केव्हा झोप लागली ते समजलेच नाही.

मला जाग आली तेव्हा बोट पुन्हा हादरत होती, पाण्याचे सपकारे उडत होते आणि केबिनची खिडकी सूर्यासारखी चकाकत होती. माझी आजी माझ्याशेजारीच बसून केस विंचरत होती आणि स्वतःशीच काहीतरी पुटपुटत होती. तिच्या डोक्यावर निळसर काळ्या रंगाचे दाट भरपूर केस होते. त्या दाट केसांचा लोट तिच्या खांद्यांवरून, छातीवरून, गुडघ्यांपर्यंत पसरला होता आणि फरशीवर लोळत होता. एका हाताने तिने फरशीवरचा केसांचा झुपका उचलून घट्ट हातात धरला आणि दुसऱ्या हाताने जाडीभरडी लाकडी फणी दाट केसांमधून फिरवली. तिचे तोंड गच्च आवळलेले होते, तिचे काळे डोळे संतापाने वटारलेले होते आणि त्या केसांच्या जंगलात तिचा चेहरा लहान आणि गंमतीदार दिसत होता.

आज ती वाईट मनःस्थितीत दिसत होती. पण तिचे केस एवढे लांब कसे, असा प्रश्न मी तिला विचारला तेव्हा मात्र आदल्या दिवशीसारखाच तिचा आवाज मऊ आणि प्रेमळ बनला.

"परमेश्वराची कृपा! 'ही मेली आयाळ विंचरत घालव तुझे दिवस!' असं म्हणाला. 'तरुण होते तेव्हा मला मोठा अभिमान वाटायचा ह्या केसांचा! पण आता या वयात मात्र बोटं मोडते. बरं ते जाऊं दे, परत झोप बघू मुला. अजून सूर्य उगवायला खूप उशीर आहे."

"मला नाही आणखी झोपायचं."

"नसेल झोपायचं तर नको झोपू," केसाची वेणी घालीत आणि समोरच्या कोचावर बाणासारख्या ताठ उताण्या पडलेल्या माझ्या आईकडे कटाक्ष टाकीत माझी आजी समजुतीच्या सुरात मला म्हणाली. "काल ती बाटली कशी फोडलीस? हळू बोल."

"आणि तू कोण असावास वरं?"

"मी अस्त्रखानचा आहे. केबिनमधून बाहेर आलोय."

"काय म्हणतोय हा?" माझ्या आजोबांनी माझ्या आईकडे वळून विचारले. पण नंतर उत्तराची वाट न पाहता त्यांनी मला पुढे ढकलले. "बापा-सारखी चेहऱ्याची ठेवण आहे," मला निरखीत ते म्हणाले. "चल, होडीत उतर."

आम्ही किनाऱ्यापर्यंत होडीतून गेलो. तिथे फरसबंदी रस्त्यावर उतरलो. त्या रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पिवळ्या, तुडवलेल्या गवताने आच्छादलेली उंच टेकाडे होती.

आजोबा माझ्या आईबरोबर सर्वांत पुढे चालत होते. त्यांची उंची जेमतेम तिच्या खांद्यापर्यंत येत होती. ते भराभरा छोटी पावले टाकीत होते. ती त्यांच्याकडे वरून खाली कटाक्ष टाकीत होती. ती चालत नसून हवेत तरंगत होती असा भास होत होता. त्यांच्या मागे माझे मामा चुपचाप चालत होते. मिखाईल काळा, सरळ केसांचा होता व आजोबांसारखाच हडकुळ्या अंगाचा होता. याकोवचे केस सोनेरी, कुरळे होते. त्यांच्या मागे भडक रंगाचे कपडे घातलेल्या काही लठ्ठ बायका आणि माझ्यापेक्षा मोठ्या वयाची, अगदी शांत स्वभावाची अशी सुमारे सहा मुले चालत होती. मी माझ्या आजीबरोबर आणि छोट्या नताल्यामामीबरोबर चालत होतो. तिचा चेहरा फिकट होता, डोळे निळे होते आणि तिचे पोट प्रचंड पुढे आले होते. अधूनमधून सतत ती थांबायची आणि धापा टाकीत पुटपुटायची:

"अग आई ग, आता एक पाऊल पुढं उचलवत नाही."

"तुला कशाला त्यांनी बरोबर आणलं?" आजी रागाने पुटपुटली. "मूर्ख माणसं!"

मला ती मुलेही आवडली नाही आणि मोठी माणसेही आवडली नाही. त्यांच्यात मला संपूर्ण परका असल्यासारखे वाटत होते. माझी आजीसुद्धा मला आता दूरची वाटू लागली होती.

विशेषकरून मला आजोबा आवडले नाही. आमच्यातले शत्रुत्व मला ताबडतोब जाणवले. त्यांच्याविषयी माझ्यात सावध कुतूहल निर्माण झाले आणि मी त्यांना जास्त लक्षपूर्वक न्याहाळू लागलो.

चढाच्या माथ्यावर आम्ही पोचलो. उजव्या कडेला अगदी उंचावर एक

बैठे एकमजली घर उभे होते आणि तिथूनच रस्ता सुरू होत होता. त्या घराला कळकट गुलाबी रंग दिला होता, फुगीर खिडक्या होत्या आणि त्यांच्यावर उतरती छपरे होती. लांबून ते घर मला मोठे भासले, पण आत खोल्या अगदीच लहान, अंधाऱ्या आणि दाटीच्या होत्या. बोट धक्क्याला लागण्यापूर्वी माणसांची जशी धावपळ चाललेली असते तशी पळापळ त्या खोल्यांमधून चालू होती. सगळी माणसे चिडलेली वाटत होती. चोरट्या चिमण्यांच्या कळपाप्रमाणे मुले वावरत होती. सबंध घरात एक उग्र, अपरिचित वास भरला होता.

मी अंगणात उभा होतो. तेसुद्धा फारसे आल्हादक नव्हते. दाट, रंगीत पाण्याने भरलेल्या काचेच्या मोठ्या बरण्या सगळीकडे उभ्या होत्या. दोऱ्यांवर प्रचंड कापडे वाळत टाकलेली होती. एका कोपऱ्यामधील बैठ्या, खिळखिळ्या शेडमधून चुलाण्यात पेटलेल्या लाकडांची आग दिसत होती. काहीतरी उकळत होते, बुडबुडे येत होते व एक अदृश्य माणूस मोठ्या आवाजात विचित्र शब्द उच्चारीत होता :

" रक्तचंदन – किरमिजी – गंधकाम्ल . . . "

## २

गतिमान, घडामोडींनी भरलेल्या आणि कमालीच्या विचित्र अशा आयुष्याची ती सुरुवात होती. एखाद्या बुद्धिमान पण आत्यंतिक वास्तववादी माणसाने सांगितलेल्या उदास कहाणीप्रमाणे ते मला सारे आठवते. आता जेव्हा भूतकाळाची आठवण करतो तेव्हा खरेच तसे घडले होते यावर काही-वेळा विश्वास ठेवणे माझे मलाच कठीण जाते. त्या " मूर्ख मंडळी " चे आयुष्य एवढे दुःखी आणि क्रूर होते की, अनेक घटनांचे खंडन करण्याकडे आणि त्यांचा निषेध करण्याकडे माझा कल जातो.

पण सत्य हे कुठल्याही कळवळ्यापलिकडचे असते आणि हे मी माझ्या स्वतःविषयी लिहित नाही, तर सर्वसामान्य रशियन ज्या घुसमटल्या आणि भयानक वातावरणात जगत होता व अद्याप जगत आहे *, त्या संबंधी लिहितो आहे.

माझ्या आजोबांचे घर वैराच्या भावनांनी उकळत होते. प्रत्येकाचे सर्वां-विरुद्ध वैर होते. मोठ्या माणसांना तर वैराच्या विषाची पूर्ण बाधा झालीच

* प्रस्तुत कादंबरीच्या लेखनकाळात. — अनु.

होती, पण लहान मुलांनासुद्धा त्याचा संसर्ग घडला होता. नंतर मला आजीच्या गोष्टींवरून समजले की, माझी आई नेमकी अशा वेळी तिथे आली होती जेव्हा तिचे भाऊ आपल्या वडिलांपाशी इस्टेटीची वाटणी करावी म्हणून आग्रह धरून बसले होते. माझ्या आईच्या अनपेक्षित पुनरागमनामुळे त्यांच्या मागणीला जास्तच जोर चढला होता. माझ्या आईने "स्वतःच्या इच्छेप्रमाणे" लग्न केल्यामुळे, माझ्या आजोबांची मान्यता न घेता लग्न केल्यामुळे, त्यांनी तिला त्यावेळी हुंडा दिला नव्हता. आता तो हुंडा ती त्यांच्यापाशी मागेल अशी माझ्या मामांना धास्ती वाटत होती. तो हुंडा आपल्यात विभागावा असा माझ्या मामांचा दावा होता. शहरात कुणी दुकान खोलावे आणि ओका नदीच्या दुसऱ्या बाजूला कुनाविनो वस्तीत कुणी दुकान टाकावे, याबाबत त्या दोघांमध्ये काही काळ जबरदस्त वाद चालू होता.

आम्ही आल्यानंतर थोडयाच दिवसात, जेवणाच्या वेळी स्वैपाकघरात भांडण पेटले. माझे मामा अचानक उडया मारून उठले आणि मेजावर ओणवून चक्क माझ्या आजोबांदेखत त्यांनी शिवीगाळ व आरडाओरड सुरू केली. दोन कुत्र्यांप्रमाणे ते एकमेकांवर गुरगुरत होते. माझ्या आजोबांनी चमचा जोरजोराने मेजावर आपटला आणि लालबुंद चेहऱ्याने घोगऱ्या आवाजात ते खेकसले:

"मी तुम्हाला रस्त्यावर भीक मागायला हाकलून देईन."

कष्टाने चेहरा वाकडा करीत माझी आजी म्हणाली: "त्यांना देऊन टाका ना सगळं. द्या एकदा सगळं म्हणजे थोडी स्वस्थता लाभेल जिवाला!"

"तू चूप बैस!" डोळे वटारीत आजोबा ओरडले. त्यांच्याएवढा छोटा माणूस एवढया कानठळया बसविणाऱ्या आवाजात ओरडू शकतो याचे एखाद्याला आश्चर्य वाटले असते.

माझी आई उठली आणि हळू हळू चालत खिडकीपाशी गेली. तेथे सर्वांकडे पाठ करून ती उभी राहिली.

अचानक मिखाईलमामाने आपल्या भावाच्या तोंडावर जोरात ठोसा हाणला. याकोवने एक जोरात आरोळी ठोकली, आपल्या भावाची नरडी धरली आणि ते दोघेही एकमेकांना झोंबत, धापा टाकीत, शिव्या घालीत खाली कोसळले.

मुले रडू लागली. गरोदर नताल्यामामीने विव्हळणारा लांब सूर लावला. आईने दोन्ही हातांनी तिला धरले व तेथून बाहेर नेले. गमत्या स्वभावाच्या, तोंडावर देवीचे वण असलेल्या येवगेन्या मोलकरणीने मुलांना स्वैपाकघरा-बाहेर घालविले. खुर्च्या मोडल्या. उमेदवार त्सिगानोकने मिखाईलमामाला पाठीमागून आवळून धरले; तर काळा चष्मा लावणाऱ्या, अंगावर खरूज असलेल्या, दाढीवाल्या ग्रिगोरी इवानोविच ह्या कसबी कारागिराने शांतपणे मिखाईलमामाचे हात टॉवेलने बांधले.

माझा मामा आपली पातळ काळी दाढी फरशीवर घासत होता आणि भयानक घोगरे आवाज काढीत होता.

"वा रे भाऊ! एका रक्ताचे सख्खे भाऊ! काय पण माणसं!" मेजाभोवती पळापळ करीत माझे आजोबा बडबडत होते.

भांडणाच्या सुरुवातीलाच घाबरून मी चुलाण्यावर उडी मारून बसलो होतो. याकोवमामाच्या जखमी चेहऱ्यावरचे रक्त आजी पुसून काढीत असल्याचे मला तेथून दिसत होते. तो रडत होता, पाय आपटत होता आणि ती आटोकाटीने त्याला समजावत होती:

"अरे मूर्खांनो, जरा ताळ्यावर या! कसले रे जंगली तुम्ही!"

आपल्या फाटलेल्या सदऱ्याला खेचीत आजोबा तिच्यावर खेकसले:

"ह्या पशूंना तू जन्माला घातलंस, म्हाताऱ्या चेटकिणी!"

याकोवमामा बाहेर गेल्यानंतर आजी एका कोपऱ्यात अंग चोरून बसली.

"पवित्र मेरी माते," ती विव्हळली, "माझ्या मुलांना थोडी अक्कल दे!"

मेजावरच्या सर्व वस्तू सांडल्या होत्या, उधळल्या होत्या, तिकडे टक लावून पहात आजोबा उभे होते.

"तुझ्या पोरांवर नीट लक्ष ठेव," ते शांत सुरात आजीला म्हणाले, "नाही तर वार्वाराचा ते निकाल लावतील..."

"तुम्ही काय बोलताय ते देवालाच ठाऊक! द्या तो सदरा इकडं, शिवून देते फाटलाय तिथं." तिने आजोबांचा चेहरा आपल्या हातात घेऊन त्यांच्या कपाळाचे चुंबन घेतले. तिच्यापेक्षा खूप बुटक्या असलेल्या आजोबांनी तिच्या खांद्यांमध्ये आपले डोके खुपसले.

"मला वाटतं, वाटणी करून टाकलेली बरी."

"होय. मलाही तसंच वाटतं."

ती दोघे खूप वेळपर्यंत बोलत होती. प्रथम त्यांचे संभाषण प्रेमात चालू होते. पण झुंजीआधी कोंबडा जमीन उकरतो तसे लौकरच आजोबा पाय आपटू लागले आणि आजीसमोर हाताचे बोट नाचवीत ओरडू लागले:

"मी तुला चांगला ओळखतो. माझ्यापेक्षा त्यांच्या कल्याणाचा तू जास्त विचार करतेस. पण तुझा तो मिखाईल लुच्चा आहे आणि याकोव हरामखोर आहे! माझं जे काही आहे ते सारं साले उधळून टाकतील! सगळं नशापाण्यात खलास करतील!"

माझ्या खांद्याची वेडीवाकडी हालचाल झाली आणि माझ्या धक्क्याने लोखंडी इस्त्री चुलाण्यावरून गडगडत खाली सांडपाण्याच्या बादलीत कोसळली. माझे आजोबा ताडकन उठून उभे राहिले, मला त्यांनी स्वतःकडे खेचले आणि जणू काही पहिल्यांदाच मला पहात होते अशा नजरेने माझा चेहरा न्याहाळू लागले.

"तुला चुलाण्यावर कुणी चढवला? तुझ्या आईनं?"

"माझा मीच चढलो."

"खोटं बोलतोयस."

"मुळीच नाही. मी घाबरलो होतो."

त्यांनी मला ढकलले आणि डोक्यावर एक टपली मारली.

"अगदी हुबेहूब बापाची प्रतिमा आहे! चालता हो!"

स्वैंपाकघरातून निसटायला मिळाले याचा मला आनंदच झाला होता.

माझे आजोबा आपल्या तिखट घाऱ्या नजरेने सारखे माझ्यावर पाळत ठेवून होते, याची मला चांगलीच जाणीव झाली होती. मला त्यांची भीती वाटायची. त्या भेदक डोळ्यांपासून लपायचा मी नेहमी प्रयत्न करायचा, याची मला आठवण आहे. आजोबा अत्यंत दुष्ट होते असे मला वाटायचे. प्रत्येकाशी ते अपमानकारक आणि खोचक सुरात बोलायचे. लोकांना चिडवण्यात आणि टोचून बोलण्यात त्यांना आनंद वाटायचा.

"छी: ऽऽऽ कसली माणसं ऽ!" असे म्हणायचा त्यांना फार नाद होता. त्यांच्या त्या 'छी: ऽऽऽ' मधला लांब हेल मला नेहमी गोठवून टाकायचा, अनाथपणाची जाणीव करून द्यायचा.

दिवसभराचे काम संपल्यानंतर माझे आजोबा, मामा, कामगार असे सारे थकूनभागून संध्याकाळी चहासाठी स्वैपाकघरात येऊन बसायचे. त्यांच्या हातांवर रंगाचे डाग असायचे, आम्लांमुळे हात खरबरीत झालेले असायचे. एका पट्टीने त्यांनी डोक्यावरचे केस मागे बांधलेले असत. स्वैपाकघरातल्या कोपऱ्यातल्या काळ्या पुतळ्यांप्रमाणे ते सारे दिसत असत. अशा त्या धोकादायी चहापानाच्या प्रसंगी माझे आजोबा माझ्या अगदी समोर बसत आणि इतर नातवंडांपेक्षा माझ्याशी जास्त वेळा बोलत. त्यामुळे माझ्या त्या मामेभावंडांना साहजिकच माझा हेवा वाटत असे. आजोबांच्या स्वभावात एक रोखठोकपणा होता. त्यांच्या वागण्यात एक सफाई होती, कोरीवपणा होता. त्यांचे विणकाम केलेले सॅटिनचे जाकीट जुने आणि विरलेले होते, त्यांचा सुती सदरा चुरगळलेला होता, त्यांच्या विजारीला गुडघ्यांवर ठिगळे लावलेली होती, तरीसुद्धा इतरांपेक्षा ते जास्त स्वच्छ भासायचे. त्यांचे मुलगे सूट-कोट चढवायचे, खळीचे कडक सदरे घालायचे आणि रेशमी रुमाल बांधायचे. पण तरीही आजोबा त्यांच्यापेक्षा जास्त रुबाबदार वाटायचे.

माझ्या आगमनानंतर थोड्याच दिवसात त्यांनी मला प्रार्थना शिकायच्या कामगिरीला लावले. बाकीची सारी मुले माझ्यापेक्षा वयाने मोठी होती आणि उस्पेन्स्की कॅथेड्रलच्या पाद्र्याकडून लिहा-वाचायला शिकली होती. त्या चर्चचे सोनेरी घुमट आमच्या घराच्या खिडक्यांमधूनही दिसत असत.

शांत, भित्र्या स्वभावाची माझी नताल्यामामी मला प्रार्थना शिकवायची. एखाद्या लहान बाळासारखा तिचा चेहरा होता आणि डोळे एवढे नितळ होते की, त्यांच्यामधून थेट तिच्या डोक्याच्या आरपार पाहता येईल असे वाटायचे.

डोळ्यांची पापणीही न लवविता तिच्याकडे एकटक बघत बसायला मला आवडत असे. पण त्यामुळे ती मात्र अस्वस्थ व्हायची. ती आपले डोळे किलकिले करायची, मान वळवायची आणि अगदी अस्फुट आवाजात विनवायची:

"म्हण ना रे, 'आमचा पिता जो आहे...'"

"'जो आहे' म्हणजे काय?"

"प्रश्न विचारू नको," इकडेतिकडे कावऱ्याबावऱ्या नजरेने पहात ती म्हणायची. "तुझ्या प्रश्नांमुळं आणखीच सारं बिनसतं. नुसतं माझ्याप्रमाणं म्हण, 'आमचा पिता...' म्हणतोस ना?"

प्रश्न विचारण्याने काय बिनसते ते काही मला समजत नसे. 'जो आहे' या शब्दांना माझ्या दृष्टीने एक रहस्य प्राप्त झाले आणि मी मुद्दामच ते वेडेवाकडे उच्चारू लागलो.

"जो हाय," "ज्यो हाये..."

जणू लौकरच वितळून जाईल असे भासणारी, पांढऱ्याफटक चेहऱ्याची माझी बिचारी मामी नेटाने माझ्या चुका सुधारीत राही.

"तसं नाही रे. नुसतं म्हण – 'जो आहे...'"

पण ती स्वतः आणि तिने उच्चारलेले शब्द, अशा दोन्ही गोष्टी माझ्या दृष्टीने अवघड होत्या. त्याचा मला त्रास होत असे आणि प्रार्थना लक्षात ठेवणे अवघड जाई.

एक दिवस आजोबांनी माझी उलटतपासणी घेतली.

"काय अल्योश्का," ते म्हणाले. "आज काय करत होतास? तुझ्या कपाळावर भलंमोठं टेंगूळ आलंय. टेंगूळ घ्यायला काही फारशी अक्कल लागत नाही. पण प्रार्थना कुठपर्यंत शिकून झाली?"

"त्याच्या लौकर लक्षात रहात नाही," माझी मामी पुटपुटली.

आजोबा हसले आणि आपल्या तांबडया भुवया त्यांनी उंचावल्या.

"तसं असेल तर त्याला तिंबला पाहिजे. तुझा बाप कधी तुला तिंबायचा का रे?" त्यांनी माझ्याकडे वळून विचारले.

ते कशाबद्दल बोलत होते हे मला न समजल्यामुळे मी गप्प राहिलो.

"माक्सिम मुलाला कधीही मारायचा नाही आणि मलाही मारू द्यायचा नाही" माझी आई उत्तरली.

"असं कसं बुवा?"

"तो म्हणायचा की मारून कुणाला काही शिकवता येत नाही."

"महामूर्ख होता तुझा माक्सिम. देव त्याच्या आत्म्याला शांती देवो!" तिखट सुरात आजोबा म्हणाले.

त्यांचे शब्द मला झोंबले आणि ती गोष्ट त्यांच्या लक्षात आली.

"फुरंगटून कशाला बसलायेस? त्यापेक्षा जरा सांभाळून वाग! त्या टोपणाबाबत चावटपणा केला म्हणून साशाला येत्या शनिवारी चांगला फाडून काढणार आहे," आपले तांबडे-रूपेरी केस सरळ करीत ते म्हणाले.

"ते कसं करणार तुम्ही?" मी विचारले.

सगळेजण हसले आणि आजोबा उत्तरले :

"जरा थांब. म्हणजे तुलाही समजेल."

एका कोपऱ्यात बसून मी अंदाज लढवू लागलो: फाडून काढणे म्हणजे रंगवायला आलेले कापड वेगळे करणे, पण तिंबणे आणि मारणे हे दोन्ही शब्द एकाच अर्थाचे दिसतात. माणसे घोड्यांना आणि कुत्र्या-मांजरांना मारतात, अस्त्रखानमध्ये शिपाई पर्शियनांना मारतात — मी माझ्या डोळ्यांनी ते पाहिले होते. पण लहान मुलांना कुणी मारीत असलेले मी कधीच पाहिले नव्हते. माझे मामा काही वेळा आपल्या मुलांच्या कपाळावर एखादी खारीक ठेवून देत किंवा डोक्यावर टपली मारीत. पण त्याचे त्या मुलांना विशेष काही वाटत नसे. माराच्या जागी जरासे चोळून ती त्याबद्दल लौकरच विसरून जात. दुखते का, असे मी काही वेळा त्यांना विचारी.

"मुळ्ळीच नाही," ती शूरपणे उत्तर देत.

टोपणाचा सुप्रसिद्ध प्रसंग मला माहीत होता. चहाची वेळ आणि रात्रीच्या जेवणाची वेळ यांच्या दरम्यान माझे मामा आणि मुख्य कामगार रंगविलेल्या कापडाचे तुकडे एकत्र शिवत आणि त्यांना कार्डबोर्डचे तुकडे अडकवत. अर्धआंधळ्या ग्रिगोरीची थट्टा करण्यासाठी मिखाईलमामाने आपल्या नऊ वर्षाच्या पुतण्याला त्या कामगाराचे शिवणकामाचे टोपण मेणबत्तीवर गरम करायला सांगितले. साशाने चिमट्यामध्ये ते टोपण धरून लालभडक होईपर्यंत मेणबत्तीच्या ज्योतीवर तापवले आणि नंतर ग्रिगोरीपाशी ठेवून तो चुलाण्यामागे लपला. पण तेवढ्यात माझे आजोबा तिथे आले आणि कामाला सुरुवात करण्यासाठी त्यांनी ते टोपण उचलले.

कसला आरडाओरडा झाला म्हणून स्वैपाकघरात मी धावत गेल्याचे मला आठवते. तेथे आजोबा गंमतीदार उड्या मारीत होते व आपली पोळलेली बोटे आपल्या कानांच्या पाळ्यांना धरून ओरडत होते.

"कुणी रांडेच्यानं केलं हे?"

मिखाईलमामा टेबलावर वाकून ते टोपण ढकलीत होता आणि त्यावर फुंकरी घालीत होता ; ग्रिगोरी ढिम्मपणे शिवणकाम करीत होते ; त्यांच्या प्रचंड टकलावर सावल्या नाचत होत्या ; याकोवमामा धावत बाहेरून आत आला आणि हसू दाबण्यासाठी चटकन चुलाण्यामागे लपला ; पोटीस बांधण्यासाठी आजीने कच्चा बटाटा किसायला सुरुवात केली.

"याकोवच्या साशानं केलं हे," मिखाईलमामा अचानक म्हणाला.

"खोटं बोलतोय," चुलाण्यामागून उडी मारून पुढे येत याकोव ओरडला.

कोपऱ्यात कुठेतरी त्याच्या मुलाने गळा काढला.

"बाबा, त्या काकाचं काही ऐकू नका!" तो ओरडला. "त्यानंच मला टोपण गरम करायला सांगितलं."

माझ्या मामांचे भांडण जुंपले. ताबडतोब माझे आजोबा शांत झाले. त्यांनी बोटावर पोटीस बांधले आणि चकार शब्द न उच्चारता मला घेऊन ते बाहेर गेले.

सारा दोष मिखाईलमामाचा होता, असे प्रत्येकाचे मत होते. त्याला फाडून मार देणार का, असे चहाच्या वेळी मी स्वाभाविकपणेच विचारले.

"त्याला मार दिला पाहिजे," माझ्याकडे तिरप्या नजरेने पहात आजोबा गुरगुरले.

मिखाईलमामाने दण्णदिशी मूठ टेबलावर आदळली आणि माझ्या आईवर तो खेकसला:

"वार्वारा, तुझं ते पिल्लू तू आवरलं नाहीस, तर त्याची मुंडी मुरगाळून टाकीन!"

"त्याच्या अंगाला बोट तरी लावून बघ!" आईने त्याला उलट दम भरला.

सारे गप्प झाले.

मोजक्या छोट्या शब्दांनी रप्‌दिशी प्रहार करून लोकांना अवाक् करण्याची कला तिला अवगत होती.

प्रत्येकजण माझ्या आईला घाबरत असे, असे मला दिसून यायचे. माझे आजोबासुद्धा तिच्याशी वेगळ्या सुरात बोलत. इतरांशी ज्या आवाजात बोलत त्यापेक्षा थोड्या खालच्या सुरात तिच्याशी बोलत. मला हे खूप आवडायचे.

"माझी आई सर्वांत बलवान आहे," माझ्या मामेभावंडांसमोर मी फुशारकी मारायचा.

त्यांनी ती गोष्ट कधीच नाकारली नाही.

पण पुढल्या शनिवारी जे काही घडले त्याने माझ्या आईविषयीच्या मताला हादरा बसला.

शनिवारच्या दरम्यान मीसुद्धा एका भानगडीत गुंतलो होतो.

मोठी माणसे कापडाचा रंग ज्या तऱ्हेने बदलतात त्या पद्धतीचे मला मोठे आकर्षण वाटले होते. कुठलातरी पिवळ्या कापडाचा तुकडा ती मंडळी घेत, काळ्या पाण्यात बुडवीत आणि कपडा एकदम गडद निळा व्हायचा! किंवा लालसर पाण्यात ते काहीतरी राखाडी खळबळायचे आणि तुतीच्या फळांसारखा लालभडक रंग यायचा. सारे काही अगदी साधे भासायचे, पण समजायचे मात्र नाही.

कापड रंगविण्याची मनीषा मी मनी बाळगून होतो. याकोवचा मुलगा साशा याच्याजवळ मी माझी गुप्त इच्छा बोलून दाखवली. तो कमालीचा सज्जन, गंभीर स्वभावाचा मुलगा होता आणि नेहमी मोठ्या माणसांच्या मागे मागे असायचा, त्यांना मदत करायचा. तो हुषार आणि मदत करण्यात तत्पर असल्याबद्दल आजोबा सोडून सारेजण त्याचे कौतुक करीत.

"छी: ऽऽ शेंबडं पोरगं!" त्याच्याकडे बघून आजोबा तुच्छतेने म्हणत.

याकोवमामाचा साशा हा काळपट वर्णाचा, हडकुळा आणि खेकड्यासारख्या बटबटीत डोळ्यांचा होता. दबत्या आवाजात तो घाईघाईने बोलायचा. अर्धे शब्द तो गिळायचा आणि जणू काही कुठेतरी पळून जाऊन लपण्याच्या बेतात असल्याप्रमाणे आजूबाजूला कावऱ्या-बावऱ्या नजरेने पहायचा. सर्व-साधारणपणे त्याचे बदामी डोळे स्थिर असायचे, पण तो जेव्हा उत्तेजित होई तेव्हा मात्र त्याच्या डोळ्यांच्या बाहुल्या थरथरायच्या.

मला तो आवडत नसे. त्यापेक्षा मला मिखाईलमामाचा साशा जास्त आवडायचा. त्याचे अस्तित्व फारसे जाणवत नसे आणि तो टोणपा होता तरीही! तो शांत स्वभावाचा होता आणि त्याच्या आईप्रमाणे त्याचे डोळे उदास होते, लक्ष वेधून घेणारे हसणे होते. त्याचे दात मात्र अगदी बेढब होते. त्याच्या दातांची फळी तोंडामधून बाहेर आली होती आणि वरच्या जबड्यात दातांची दुहेरी रांग होती. त्यामुळे त्याला सतत उद्योग मिळाला होता. मागच्या रांगेतले दात सैल करून त्यांना पाडून टाकण्यासाठी सारखी त्याची बोटे तोंडात असायची. त्याच्या दातांच्या दुसऱ्या रांगेला हात लावून पहायची परवानगी तो कुणालाही गरीबडेपणाने द्यायचा. पण दुसरा कोणताही विशेष मला त्याच्यात आढळला नाही. त्या गजबजलेल्या घरात तो नेहमी एकलकोंडा वाटायचा. कुठल्यातरी एखाद्या अंधाऱ्या कोपऱ्यात बसलेला

असायचा किंवा संध्याकाळच्या वेळी खिडकीशी गप्प बसून रहायचा. त्याच्याबरोबर असताना काहीही न बोलणे फार छान वाटायचे. खिडकीत त्याच्या बरोबर निवांत बसावे आणि सूर्यास्ताच्या लालीच्या पार्श्वभूमीवर चमकणाऱ्या उस्पेन्स्की कॅथेड्रलच्या सोनेरी घुमटांभोवती घिरट्या घालणाऱ्या कावळ्यांकडे पहात बसावे. पक्षी भरारी घ्यायचे, खाली सूर मारायचे. मग अचानक पंख पसरून मावळत्या आकाशात जाळे धरायचे आणि अदृश्य होऊन अफाट रितेपण मागे सोडायचे. असा काही देखावा पहात असताना बोलण्याची अजिबात इच्छा होत नसे, कारण ऊर खुपत्या सुखाने दाटून यायचा.

याउलट याकोवचा साशा मोठ्या माणसांप्रमाणे कुठल्याही गोष्टीवर हवे तेवढे आणि आकर्षक पद्धतीने बोलू शकत असे. मला रंगारीकाम शिकायची इच्छा होती हे समजताच त्याने मला कपाटातून रविवारी वापरण्याचा टेबलक्लॉथ काढून गडद निळ्या रंगात रंगवायचा सल्ला दिला.

"पांढऱ्या वस्तू इतर कुठल्याही रंगापेक्षा चांगला रंग पकडतात अशी माझी खात्री झालीय," तो अगदी गंभीरपणे मला म्हणाला.

मी अवजड टेबलक्लॉथ खेचून काढले आणि अंगणात पळालो. पण निळ्या रंगाच्या बरणीत मी त्याचे एक टोक बुडवतो न बुडवतो तोच त्सिगानोकने माझ्यावर झडप घातली, माझ्या हातून ते खेचून घेतले आणि आपल्या भल्यामोठ्या पंजानी पिळून काढता काढता तो शेडमध्ये उभ्या असलेल्या माझ्या मामेभावाला ओरडून म्हणाला:

"तुझ्या आजीला बोलवून आण लौकर!"

तो माझ्याकडे वळला आणि त्याने आपले पिंजारलेले डोके अनिष्टसूचकतेने हलवीत म्हटले:

"याबद्दल तुला चांगला चोप बसणार!"

माझी आजी घाईघाईने बाहेर आली. माझी खोडी पाहताच तिला धस्स झाले. आपल्या गंमतीदार तऱ्हेने मला रागे भरताना ती थोडी रडलीसुद्धा:

"अरे पेर्म्याक*! अरे अकलेच्या कांद्या! तू दुसरीकडं कुठंतरी का नाही तडमडलास?"

नंतर ती त्सिगानोकची समजूत घालू लागली:

---

* पेर्म – गांवाचे नांव – (पेर्मच्या कारट्या). – **अनु.**

"वान्या, ही गोष्ट आजोबांना मुळीच सांगू नको! मी हा कपडा कुठंतरी लपवून ठेवते. कदाचित हे प्रकरण असंच दडपून जाईल..."

"तुम्ही माझी काळजी करू नका. पण साशा बोंबलत जाणार नाही एवढी खबरदारी घ्या," आपल्या कमरेच्या डागाळलेल्या मलवस्त्रावर स्वतःचे ओले हात पुशीत वान्या अस्वस्थपणे उत्तरला.

"त्याला थोबाड बंद ठेवण्याबद्दल मी एक नाणं देईन," मला घरात घेऊन जाता जाता आजी म्हणाली.

शनिवारी संध्याकाळी प्रार्थनेच्या वेळेच्या जरा आधी कुणीतरी मला स्वैपाकघरात नेले. तिथे अंधार होता आणि शांतता होती. घरात येण्याचे मुख्य दार आणि इतर खोल्यांची दारे घट्ट बंद केली असल्याचे मला ठाऊक होते. खिडकीबाहेर शरदातील धूसर राखाडी सायंप्रकाश ओठंगला होता आणि पावसाची भुरभुर चालू होती. चुलाण्याच्या काळया तोंडापुढे एका बाकड्यावर त्सिगानोक कधी नव्हे तो दुर्मुखल्या चेहऱ्याने बसला होता. कोपऱ्यात आजोबा एका टबाशी उभे होते आणि पाण्यामधून भिजलेल्या भोजाच्या डहाळया काढून त्यांना नापीत होते, त्यांची जुडी करून हवेत सपासप वार करीत होते. कुठेतरी काळोखात आजी उभी होती आणि जोरजोराने नाकात तंबाखू ओढीत बडबडत होती:

"गंमत वाटते, पशू कुठला..."

स्वैपाकघराच्या मध्यावरच्या एका खुर्चीवर याकोवचा साशा डोळयात मुठी घालून रडत होता. एखाद्या म्हाताऱ्या भिकाऱ्याप्रमाणे त्याचे विव्हळणे चालू होते:

"मला माफी करा. देवाच्या दयेखातर..."

मिखाईलमामाचा साशा आणि त्याची बहीण टेबलामागे शेजारी शेजारी खांबाप्रमाणे स्तब्ध उभी होती.

"तुला खाऊ मिळाल्यावर नंतर माफ करीन," हातामध्ये ओली लांबसडक छडी परजीत आजोबा म्हणाले. "चल, सोड तुझी चड्डी."

ते शांतपणे बोलत होते. त्यांच्या बोलण्याचा आवाज, किंवा करकरणाऱ्या खुर्चीवरच्या त्या मुलाच्या हालचाली, किंवा आजीच्या पावलांची चाळवाचाळव, यांपैकी कशानेही त्या बैठ्या, धुराने काळवंडलेल्या छताच्या अंधाऱ्या स्वैपाकघरामधील अविस्मरणीय शांतता भंगत नव्हती.

साशा उभा राहिला, त्याने चड्डीची बटणे सोडली, चड्डी गुडघ्यावर खाली सोडली आणि ओणवा होत बाकड्याकडे धडपडत गेला. त्याला तशा अवस्थेत पाहणे फार भयंकर होते. माझे स्वतःचे गुडघेही थरथर कापू लागले.

पण त्याने बापुडवाणेपणाने बाकड्यावर डोके ठेवले, वान्याने त्याच्या काखांभोवती व मानेभोवती लांब पंचाने बांधले आणि खाली वाकून त्याच्या पायाचे घोटे धरले, तेव्हा तर फारच भयानक वाटू लागले.

"अलेक्सेय!" आजोबांनी हाक मारली. "इकडं जवळ ये! कुणाशी बोलतोय मी? याला फाडून काढणं म्हणतात – नीट बघून ठेव! एक!.."

हाताला एक बारीक झटका देऊन त्यांनी साशाच्या उघड्या अंगावर छडी ओढली. साशा ओरडला.

"ढोंग करू नको," आजोबा म्हणाले. "तो फटका एवढा लागला नाही. पण यानं दुखेल!"

त्यांनी फटका मारताच चटकन साशाची कातडी लाल झाली व नांवडाभडक वळ उमटला. साशा जोराने किंचाळला.

"आवडलं नाही?" तालबद्ध रीतीने हाताच्या खाली-वर हालचाली करीत आजोबांनी विचारले. "तुझ्या आवडीचं नाही का? हे तुझ्या टोपणासाठी!"

जेव्हा जेव्हा त्यांचा हात वर जाई तेव्हा तेव्हा माझ्या काळजात वर लक्क होई आणि त्यांचा हात खाली जाई तसा माझा ऊर धपकन खाली पडे.

साशा तारस्वरात किंचाळत होता आणि कानांना त्याचे ओरडणे भयानक वाटत होते.

"मी पुन्हा नाही करणार. मी तुम्हाला टेबलक्लॉथबद्दल सांगितलं नाही का? मीच तर सांगितलं..."

"अशा गोष्टी सांगितल्या म्हणून तुझी सुटका होणार नाही. चुगल-खोराला पहिला मार बसतो. आता तुझी पाळी, टेबलक्लॉथबद्दल!"

माझी आजी धावत माझ्यापाशी आली आणि तिने मला पाटीशी घातले.

"अलेक्सेयच्या अंगाला हात लावू नका! मी तुम्हाला परवानगी देणार नाही, जनावर कुठले!"

ती दारावर लाथा मारू लागली.

"वार्वारा! वार्वारा!" ती ओरडली.

माझे आजोबा जोरात धावून आले. आजीला ढकलून त्यांनी खाली पाडले, खस्सकन माझ्या बकोटीला धरून बाकड्यापर्यंत खेचत आणले. मी त्यांच्या पकडीतून सुटायची धडपड करीत होतो, त्यांची लाल दाढी ओढत होतो. शेवटी तर त्यांच्या बोटाचा मी कडकडून चावा घेतला. ते जोराने गरजले, त्यांनी मला घट्ट आवळून दाणकन बाकड्यावर आदळले. माझा चेहरा लाकडावर जोरात आपटला. त्यांची जंगली आरोळी माझ्या कानात अजून घुमते :

"बांधा त्याला! ठार मारतो साल्याला!"

आणि मला आईचा पांढराफटक चेहरा व मोठे विस्फारलेले डोळे आठवतात. ती बाकासमोर पुढे-मागे धावत होती.

"थांबवा बाबा! सोडा त्याला!" घुसमटल्या आवाजात ती विनवीत होती.

मी बेशुद्ध पडेपर्यंत आजोबांनी मला मारले. त्यानंतर अनेक दिवसपर्यंत मी आजारी होतो. एक छोटी खिडकी असलेल्या एका बारक्या खोलीत एका रुंद, ऊबदार पलंगावर पालथे तोंड करून झोपून होतो. त्या खोलीतल्या कोपऱ्यामधील पुतळ्यांसमोर बारका तांबडा दिवा चोवीस तास पेटलेला असायचा.

माझ्या त्या आजारपणाचे दिवस हे माझ्या आयुष्यातील फार महत्त्वाचे दिवस होते. त्या काळात एकदम मी मोठा झालो होतो. सर्व लोकांविषयी गाढ आस्था बाळगण्याचा नवा गुण त्याचवेळी माझ्या अंगी बाणला. जणू काही माझ्या काळजावरची कातडी सोलून काढण्यात आली होती. माझ्या स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या प्रत्येक जखमेची असह्य वेदना त्या काळजाला तात्काळ जाणवू लागली होती.

पहिल्याप्रथम म्हणजे माझी आई आणि आजी यांच्यात जे भांडण पेटले, त्याने मला धक्का बसला. माझ्या मोठ्या, काळ्या आजीने त्या तिच्या छोट्या खोलीत माझ्या आईवर झडप घातली व पुतळ्यांच्या कोपऱ्यात तिला रेटत नेत ती फूत्कारली :

"त्याला तू बाजूला ओढून का घेतला नाहीस?"

"मी घाबरले होते."

"एवढी मोठी थोराड तू! शरम वाटली पाहिजे तुला वार्वारा! मी एवढी म्हातारी, पण मला भीती वाटत नाही. त्याच लाजेपायी!"

"आई, मला एकटीला राहू दे! वीट आलाय सगळ्याचा!"

"तुझं त्याच्यावर प्रेम नाही! त्या अनाथ पोराची तुला दया नाही!"

"मी स्वतःच अनाथ आहे—सारं आयुष्यभर!" माझी आई मोठ्यांदा कष्टी आवाजात म्हणाली.

मग कोपऱ्यातील ट्रंकेवर बसून त्या दोघीही रडू लागल्या.

"अलेक्सेय नसता तर मी कुठंतरी लांब निघून गेले असते!" माझी आई म्हणाली. "या नरकात राहणं मला शक्य नाही. आई, मला शक्य नाही! माझ्यात तेवढी ताकद नाही!"

"माझ्याच रक्तामांसाची तू मुलगी ना? माझ्याच काळजाचा तुकडा ना?" आजी अस्पष्ट उद्गारली.

आता मला समजले: माझी आई मुळीच बलवान नव्हती. इतरांप्रमाणे तिलाही आजोबांची भीती वाटत होती. आणि या घरात तिने अडकून पडायला मी जबाबदार होतो. इथे जगणे तिला असह्य होते. या विचारासरशी मी खूप निराश झालो. प्रत्यक्षात त्यानंतर लौकरच माझी आई नाहीशी झाली. ती दुसरीकडे कुठेतरी गेली.

एके दिवशी माझे आजोबा छतामधून पडावे तसे अचानकपणे माझ्या भेटीला आले. बिछान्याच्या कडेशी ते बसले आणि आपली बर्फासारखी थंडगार बोटे त्यांनी माझ्या कपाळावर ठेवली.

"कसा काय आहेस पोरा... चल, मला उत्तर दे. राग धरून बसू नको. कसा आहेस?"

त्यांना लाथ मारावी अशी मला इच्छा होत होती, पण जरा हलले तर खूप वेदना होत होत्या. त्यांचे केस नेहमीपेक्षा जास्त लाल दिसत होते. अस्वस्थपणे ते डोके हलवीत होते आणि त्यांचे चमकदार डोळे भिंतीवर गरागरा फिरत होते. सुंठीचे बकऱ्याच्या आकाराचे बिस्कीट, दोन लॉली-पॉप, एक सफरचंद, काही मनूका—एवढ्या गोष्टी त्यांनी खिशातून काढल्या आणि माझ्या नाकाशी उशीसमोर ठेवल्या.

"मी तुला काही खाऊ आणलाय बघ!"

खाली वाकून त्यांनी माझ्या कपाळाचे चुंबन घेतले. माझ्या कपाळावर

थोपटीत ते बोलू लागले. त्यांच्या खरबरीत छोटया हाताला पिवळा धमक रंग आला. विशेषत: त्यांच्या पक्ष्यांसारख्या वाकडया नखांभोवतीचा भाग जास्त पिवळा पडला.

"बछडया, तुझ्या वाटयापेक्षा तुला यावेळी थोडा जास्त प्रसाद मिळाला. मी एवढा बेभान झालो होतो—तू मला चावलास, ओरबाडलंस—आणि माझा राग अनावर झाला. पण यावेळी तुला थोडा जास्त डोस मिळाला म्हणून काही फारसं बिघडलं नाही. पुढच्या वेळी तुझ्या हिशेबी तो जमा करू. एक गोष्ट लक्षात ठेव—जेव्हा स्वत:ची माणसं मारतात तेव्हा अपमान वाटून घेऊ नये—तो चांगला धडा असतो! पण दुसऱ्यांना मात्र अंगाला हात लावू देऊ नको. फक्त आपल्या लोकांचं काही मानून घेऊ नये. माझ्या लहानपणी मी मार खाल्ला नाही असं वाटतं तुला? अरे मला ते कसा पिटत त्याची तू स्वप्नातसुद्धा कल्पना करू शकणार नाहीस आल्योशा! मला एवढया जोरानं मारायचे की ते पाहून देवसुद्धा रडला असेल! पण त्यातून काय निर्माण झालं? जरा माझ्याकडं बघ. अरे मी होतो एक अनाथ, एका भिकारणीचा मुलगा! आज आख्ख्या वर्कशॉपचा मालक आहे. लोकांना हुकूम ठोकतोय."

आपला सडपातळ, घडीव देह त्यांनी माझ्या अंगाला रेटला आणि स्वत:च्या बालपणाविषयी ते मला सांगू लागले. अवघड शब्दांच्या उतरंडी कौशल्याने रचू लागले.

माझ्या तोंडासमोर तोंड आणून ते बोलत होते तेव्हा त्यांचे हिरवे डोळे लकाकत होते आणि केसांना सोनेरी चमक मारत होती:

"इथं तू आगबोटीतून आलास. वाफेनं तुला इथपर्यंत आणलं, पण मी तरुण होतो तेव्हा अंगातला जोर वोल्गामध्ये रेटून पडाव खेचत होतो. पडाव पाण्यात असायचा आणि मी किनाऱ्यावर धारदार खडकांवर, धोंडयां-वर अनवाणी उभा असायचा. सकाळपासून रात्रीपर्यंत राबायचा. डोक्यावर सूर्य तापला म्हणजे मस्तक भणाणून उठायचं आणि केसातल्या आकडयाप्रमाणं ओणवं वाकून पडाव खेचत रहायचं. हाडं कडकडा वाजायची, समोरचं काही दिसायचं नाही, घामाच्या धारा डोळयांवरून वहात असायच्या, काळीज कण्हायचं, ओठ कुंथायचे—अरे अल्योशा, तुला तक्रार करायला काही जागाच नाही! राबता राबता मी जोखडातून खाली पडायचा, मातीत

चेहरा लोळला म्हणून आनंद वाटायचा, कारण अंगातला ताकदीचा अखेरचा कण संपला याची खात्री पटायची. आणि भानावर येईपर्यंत किंवा भान हरपेपर्यंत तिथंच पडून रहायचं. त्यातल्या कुठल्याही अवस्थेमुळं फारसा फरक पडायचा नाही. देवाच्या डोळ्यांदेखत आम्ही असं जगलो, आपल्या पवित्र येशू ख्रिस्ताच्या डोळ्यांदेखत आम्ही असं जगलो!.. अशा रीतीनं तीन वेळा वोल्गा मातेला पार केलं! सिम्बीर्स्क ते रीबिन्स्क, सारातोवपासून इथं आणि अस्त्राखानपासून माकाऱ्येवच्या जत्रेला! हजारो वेर्स्ता वाटा पायाखाली घातल्या. पण चौथ्या वर्षी मला बढती मिळाली. वोदोलीव * म्हणून मालकानं माझी नेमणूक केली. इतर चारचौघांसारखा मी नाही याची त्याला खात्री पटली."

जसजसे ते बोलत होते तसतसे एखाद्या ढगाप्रमाणे ते माझ्या नजरेसमोर मोठे होत चालले होते. त्या हडकुळया छोटया म्हाताऱ्यामधून मला एक अचाट पराक्रमी वीर दिसू लागला होता आणि महानदीच्या प्रवाहाविरुद्ध एक प्रचंड पडाव तो एकटयाने खेचून आणीत होता.

काहीवेळा आजोबा बिछान्यावरून खाली उडी मारायचे आणि जोखडामध्ये बुर्लाक ** कसे चालत आणि पाणी कसे उपशीत त्याचे प्रात्यक्षिक करून दाखवायचे. खर्जाच्या सुरात ते अपरिचित गाणी म्हणायचे, मग पुन्हा एकदा तरुणाप्रमाणे उडी मारून बिछान्यावर बसायचे. मोठा मजेदार माणूस होता. जेवढे जास्त बोलत होते तेवढा त्यांचा आवाज अधिक खोल आणि खात्री पटवणारा होत गेला.

"ते काहीही असलं तरी एखाद्या उन्हाळी संध्याकाळी झिगुलीमध्ये आमचा मुक्काम पडायचा ना अलेक्सेय, तेव्हा हिरव्यागार टेकडीच्या पायथ्याशी आम्ही शेकोटी पेटवायचे आणि काय मज्जा यायची म्हणून सांगू! खीर उकळायला ठेवलेली असायची, तेवढ्यात एखादा बुर्लाक आपलं काळीज हलकं करायला दर्दभरं गाणं सुरू करायचा अणि बाकीचे आम्ही त्याला साथ देत असू. ती गाणी ऐकताना साऱ्या अंगभर काटे फुलायचे आणि एखाद्या

---

* वोदोलीव – पाणी उपशा. – **अनु.**

** पडाव खेचणारे कामगार. – **अनु.**

घोड्याप्रमाणे भरधाव वेगानं वोल्गा नदी प्रत्यक्ष स्वर्गावर चालून जातेय असा भास व्हायचा! वाऱ्यानं धूळ उडवून लावावी तशा आमच्या साऱ्या चिंता त्यावेळी नाहीशा व्हायच्या. गाण्याच्या नादात आम्ही खीरही विसरून जायचो आणि आगीवर शेवटी ती चुरूचुरू जळू लागली म्हणजे भान यायचे. मग आचाऱ्यावर सगळा राग निघायचा आणि त्याला तंबी मिळायची— 'गाणं ऐक, पण स्वतःचं काम विसरू नकोस!"

बऱ्याच वेळा आजोबांना बोलवायला माणसे दाराशी आली, पण मी सारखा विनवायचा :

"इतक्यात जाऊ नका!"

ते हसायचे आणि हात उडवायचे.

"त्यांना थांबा म्हणावं," ते ओरडून सांगायचे.

संध्याकाळपर्यंत ते मला गोष्टी सांगत बसले. शेवटी माझा प्रेमाने निरोप घेऊन ते निघून गेले तेव्हा मला जाणवले की, आजोबा दुष्ट नव्हते किंवा भयंकरही नव्हते. त्यांनीच मला एवढे क्रूरपणे मारले होते ही आठवण पीडादायी होती, पण तरीही ते सत्य मी विसरू शकत नव्हतो.

आजोबा मला एकदा भेटून गेल्यानंतर बाकीच्या सर्वांना माझे दार खुले झाले. सकाळपासून रात्रीपर्यंत माझ्या उशाशी कुणी ना कुणी बसलेले असे व माझे मनोरंजन करण्याचा सारेजण प्रयत्न करीत. त्यांचे ते प्रयत्न नेहमीच यशस्वी होत नसत. माझी आजी इतरांपेक्षा जास्त वेळा येत असे; ती माझ्याशेजारी झोपायचीसुद्धा. पण माझ्या मनावर सर्वांत खोल ठसा उमटला त्सिगानोकच्या व्यक्तिमत्वाचा. आडव्या बांध्याचा, रुंद खांद्याचा, दाट काळ्या कुरळ्या केसांचे भलेमोठे डोके असलेला त्सिगानोक संध्याकाळी आला. त्याने रविवारचा सुटीचा पोषाख केला होता. मधाळ रंगाचा रेशमी सदरा, रुंद मखमली विजार आणि घोट्याशी ॲकॉर्डियनच्या भात्याप्रमाणे चुण्या पडलेले करकर वाजणारे बूट. त्याचे केस तकाकत होते, त्याच्या दाट भुवयांखालचे तिरपे डोळे आनंदाने चमकत होते, त्याच्या कोवळ्या मिशांच्या काळ्या रेघेखाली पांढरेशुभ्र दात चमकत होते. पुतळ्यांसमोरच्या लाल दिव्याचा प्रकाश त्याच्या सदऱ्यावरून मंदपणे परावर्तित होत होता.

"जरा नजर टाक," सदऱ्याची बाही वर सारून त्याने स्वतःच्या उघड्या दंडावरच्या लाल जखमांचे जाळे दाखवले. "पाहिलंस कसा सुजलाय

हात? पण यापेक्षा वाईट होतं याआधी! आता जखमा जवळ जवळ भरल्यात.

"तुझा आजोबा रागानं वेडा झाला होता, तुला मरेपर्यंत त्यानं मारलं असतं, हे मी पाहिलं. म्हणून चाबूक तुटावा यासाठी मी माझा हात मध्ये आडवा घातला. चाबूक मोडला असता म्हणजे आजोबांनी नवा घेईपर्यंत तुझ्या आईला किंवा आजीला तुला तिथून उचलून न्यायला वाव मिळाला असता. पण तो मोडला नाही. पाण्यात खूप भिजवला होता. तरी तुझे काही फटके मी वाचवले– किती ते तू स्वतःच्या डोळ्यांनी पाहू शकतोस. मी तरबेज आहे की नाही!"

तो हळूच मऊशार हसला.

"तुझ्याबद्दल मला एवढं वाईट वाटलं की, मला घुसमटून गेलं." आपल्या सुजलेल्या हाताकडे पुन्हा एकदा नजर टाकून तो पुढे म्हणाला: "परिणाम चांगला होणार नाही हे मला समजत होतं, पण ते छड्या मारतच राहिले..."

घोड्यासारखा त्याने नाकाने फुरफुर आवाज केला, मानेला झटका दिला आणि एखाद्या लहान मुलाच्या भाबडेपणाने तो माझ्या आजोबांवर शेरे मारू लागला. त्यामुळे तात्काळ तो मला जवळचा वाटू लागला.

मला तो खूप आवडतो असे मी त्याला सांगितले आणि त्यानेही तेवढ्याच अविस्मरणीय साधेपणाने म्हटले:

"मलासुद्धा तू खूप आवडतोस. म्हणून तर तुझ्या वेदना मी माझ्यावर घेतल्या– तुझ्या प्रेमाखातर. दुसऱ्या कुणासाठी मी असं केलं असतं असं तुला वाटतं? थू:! कधीही नाही!"

मग वारंवार दाराकडे सावध नजरा टाकीत त्याने मला धडा द्यायला सुरुवात केली.

"पुढच्या वेळी तुला ते तिंबायला लागतील," तो बोलू लागला, "तेव्हा ताठर होऊ नको, समजलं? अंग ताठ केलं तर दुप्पट लागतं. आपलं अंग अगदी सैल, लिबलिबित सोडावं! आणि श्वास रोखू नको. खच्चून श्वास घे आणि बेंबीच्या देठापासून बोंबल! हे सारं नीट लक्षात ठेव!"

"काय, मला पुन्हा मार देतील?" मी विचारले.

"मग तुला काय वाटतं?" शांतपणे त्सिगानोक म्हणाला. "अर्थात ते तुला पिटतील! अजून तुला खूप वेळा मार खायचाय!"

"कशाबद्दल?"

"तुझे आजोबा काही ना काही कारण नक्की शोधून काढतील!"

आणि पुन्हा एकदा अत्यंत काळजीपूर्वकपणे तो मला शिकवू लागला.

"जर ते सरळ छडी मारत असले तर मुळीच न हलता नरम पडून रहा. पण हात खाली आणून नंतर तुझी चामडी सोलण्याकरता अंगावर छडी ओढत असले, तर त्यांच्या बाजूला लोळत जायचं, छडीच्या दिशेनं, समजलं? त्यामुळं कमी मार बसतो!"

आपला काळा, तिरपा डोळा त्याने माझ्याकडे पाहून मिचकावला आणि म्हणाला :

"मार खायची वेळ येते तेव्हा पोलिसापेक्षा जास्त माहिती मला आहे. माझ्या अंगावरची चामडी एवढी सोलून काढलीय की तिच्यातून पँटीची एक जोडी तू बनवू शकला असतास!

त्याच्या त्या आनंदी चेहऱ्याकडे मी पाहिले तेव्हा आजीने मला सांगितलेल्या गोष्टींमधल्या इवान राजपुत्राची आणि मूर्ख इवानुश्काची आठवण झाली.

## ३

मी जेव्हा बरा झालो तेव्हा एक गोष्ट मला स्पष्ट झाली की, आमच्या घरामध्ये त्सिगानोकला एक खास स्थान होते. माझे आजोबा स्वतःच्या मुलांवर जेवढे वारंवार खेकसत आणि उर्मट वागत, तेवढे त्सिगानोकशी ते वागत नसत. आणि त्सिगानोकच्या अनुपस्थितीत जेव्हा ते त्याच्याविषयी बोलत तेव्हा डोळे बारीक करीत अणि मान हलवीत म्हणत :

"त्या इवानच्या बोटात जादू आहे. सोन्याची बोटं आहे सैतानाची! आपल्यात हा फार मोठा माणूस वाढतोय, हे माझे शब्द लक्षात ठेवा!"

माझे मामाही त्सिगानोकशी नेहमी मित्रत्वाने वागत. मुख्य कामगार ग्रिगोरी यांची ते नेहमी थट्टा-मस्करी करीत, पण त्सिगानोकशी मात्र सरळपणे वागत. ग्रिगोरींची मात्र रोज संध्याकाळी ते काही ना काही खोडी काढत.

कधी त्यांच्या कात्रीच्या मुठी तापवून ठेवत, तर कधी त्यांच्या खुर्चीवर चूक मारून ठेवत, तर कधी ते शिवत असलेल्या कापडांच्या ढिगात वेगवेगळया रंगाची कापडे मिसळून ठेवीत; त्यांना नीटसे दिसत नसल्याने वेगवेगळया रंगांचे कापड ते एकत्रच शिवून ठेवत आणि नंतर त्यांना आजोबांची बोलणी खावी लागत.

एके दिवशी दुपारच्या जेवणानंतर ग्रिगोरी स्वैपाकघरातल्या पेटीवर गाढ झोपले होते तेव्हा माझ्या मामांनी त्यांच्या तोंडाला किरमिजी रंग फासून ठेवला. त्यानंतर कित्येक दिवस ग्रिगोरींचा चेहरा गंमतीदार आणि भयानक दिसत होता. त्यांच्या चष्म्याच्या दोन काळया चकत्यांच्या मध्यभागी त्यांचे तांबडे नाक जिभेप्रमाणे लोंबताना दिसायचे. त्यांच्या पिकल्या दाढीच्या पार्श्वभूमीवर त्यांच्या चष्म्याच्या काचा अंधुकपणे चमकत रहायच्या.

माझे मामा अशा नवनव्या खोडया अखंडपणे हुडकून काढत असत. पण ग्रिगोरी तक्रारीचा एकही शब्द उच्चारीत नसत. फक्त स्वतःशीच पुटपुटत रहात आणि कात्री, इस्त्री, चिमटे किंवा बोटाचे टोपण उचलण्यापूर्वी आठवणपूर्वक हाताची बोटे थुंकीने ओली करण्याची खबरदारी घेत. या गोष्टीची त्यांना एवढी सवय लागली होती की, जेवणाच्या टेबलावरही काटा किंवा सुरी उचलण्यापूर्वी ते हाताची बोटे ओली करत व त्याची आम्हा मुलांना भारी गंमत वाटे. जेव्हा त्यांना वेदना होई तेव्हा त्यांच्या मोठ्या चेहऱ्यावरून सुरकुत्यांची एक लाट पसरत कपाळापर्यंत चढत जाई, त्यांच्या भुवया उंचावत आणि टकलावर कुठेतरी ती लाट अदृश्य होई.

माझे आजोबा आपल्या मुलांच्या ह्या खेळांकडे कोणत्या दृष्टीने पहात ते मला आठवत नव्हते. पण आजी मात्र आपल्या मुलांवर मुठी उगारून ओरडे:

"निर्लज्ज सैतान आहात; पिशाच्चं आहात!"

त्सिगानोकच्या पाठीशी माझे मामा त्याच्याविषयी दुष्टाव्याने आणि उपहासाने बोलत. त्याच्या कामावर टीका करीत आणि तो चोर आहे, ऐदी आहे अशी नांवे ठेवीत.

हे असे का, असे मी आजीला विचारले.

"कारण त्यांच्यापैकी प्रत्येकाला जेव्हा स्वतःचं दुकान उघडायची वेळ येईल तेव्हा वान्या हवाय," ती उत्तरली. "म्हणून प्रत्येकजण एक-दुसऱ्या-

समोर त्याला नांवं ठेवतो! महाधूर्त आहेत ते! पण त्यांच्याबरोबर जाण्याऐवजी वान्या तुझ्या आजोबांबरोबर इथंच राहील अशी त्या दोघांना भीती वाटते. आणि तुझ्या आजोबांच्या स्वतःच्या काही योजना आहेत. वान्याबरोबर तिसरं एक दुकान काढण्याचं त्यांच्या डोक्यात घोळतंय. ती गोष्ट तुझ्या मामांच्या दृष्टीनं चांगली नाही. समजलास?"

शांतपणे ती हसली.

"त्यांचं वागणं बघून देवसुद्धा हसत असेल! त्यांचा धूर्तपणा तुझे आजोबा ओळखून आहेत. म्हणून ते मुद्दाम त्यांना चिडवतात: 'मी वान्याला रिक्रूट सर्टिफिकेट विकत घेऊन देणाराय' असं ते म्हणतात, 'म्हणजे त्याला सैन्यात भरती व्हावं लागणार नाही. त्याच्याशिवाय माझं चालायचं नाही.' मग त्यांचं पित्त साहजिकच खवळतं! त्यांना ते घडायला नकोय आणि पैसे खर्चायला कुरकुरतात—त्या सर्टिफिकेटाला बरीच किंमत पडते!"

बोटीवर जसा मी आजीबरोबर रहात होतो तसा पुन्हा एकदा तिच्याबरोबर राहू लागलो. रोज रात्री झोपण्यापूर्वी ती मला परीकथा सांगायची किंवा परीकथांसारख्याच मनोरंजक अशा स्वतःच्या आयुष्यातील गोष्टी सांगायची. पण जेव्हा घरगुती व्यवहाराच्या गोष्टी ती करीत असे—माझ्या आजोबांच्या इस्टेटीची वाटणी करण्याविषयी किंवा स्वतःसाठी नवे घर विकत घेण्याच्या आजोबांच्या इराद्याविषयी ती बोलत असे—तेव्हा मात्र ती उपहासाने आणि तटस्थाच्या भूमिकेतून बोलायची. जणू काही ती त्या घरातली दुसऱ्या क्रमांकमची वडीलधारी नसायची; तिऱ्हाईत शेजारणीप्रमाणे बोलायची.

तिच्यापासूनच मला समजले होते की, त्सिगानोक म्हणजे रस्त्यावर सापडलेले मूल होता. वसंताच्या मोसमाच्या सुरुवातीला एका पावसाळी रात्री आमच्या घराच्या फाटकाशी एका बाकड्यावर तो त्यांना सापडला होता.

"तिथं बाळलेण्यात गुंडाळून त्याला ठेवलेलं होतं," विचारात गढून ती गूढ आवाजात म्हणाली. "इतका गारठला होता की त्याच्या तोंडून रडंसुद्धा बाहेर फुटत नव्हतं."

"माणसं आपल्या बाळांना का टाकून देतात?"

"जेव्हा आईला दूध येत नाही आणि बाळाला खाऊ घालायला तिच्या-

पाशी काही नसतं, तेव्हा जिथं लहान मूल नुकतंच जन्माला येऊन मेलंय अशी जागा ती हुडकून काढते. तिथं ती आपल्या बाळाला सोडून जाते."

केस विंचरताना ती क्षणभर बोलायची थांबली.

"अल्योशा, हे सारं गरिबीमुळं घडतं," आढ्याकडे वर नजर टाकीत उसासून ती म्हणाली. "काही माणसं एवढी गरीब असतात की त्यांच्या गरिबीचं वर्णन करायला शब्दच नसतात! आणि लग्न न झालेल्या मुलीला मूल होणं ही शरमेची बाब समजली जाते! तुझे आजोबा वान्याला पोलिसात नेऊन देणार होते, पण मी त्यांना म्हटलं: ठेवू या त्याला आपल्या घरात. आपल्या मेलेल्या मुलांच्या जागी देवानंच पाठवलं असेल याला! या जगात मी अठरा जीवांना जन्म घातला. आख्खा रस्ताभर अठरा घरांमध्ये माझी मुलं राहिली असती! मी चौदा वर्षांची होते तेव्हा माझ्या घरच्यांनी माझं लगीन करून दिलं आणि पंधरावं सरायच्या आत मला पहिलं मूल झालं. पण माझ्या रक्तामासाच्या गोळ्याबद्दल देवाला प्रेम होतं. आपले देवदूत बनवायला एकापाठोपाठ एक माझी मुलं देव घेऊन गेला. दु:खही व्हायचं– आनंदही व्हायचा!"

रात्रीच्या वेळी अंगात घालण्याचा सैलसर झगा घालून ती बिछान्याच्या कडेशी बसली होती. तिचे काळे केस पाठीवर मोकळे सुटलेले होते. सेर्गाचच्या जंगलामधून एका दाढीवाल्या बाप्याने नुकतीच एक अस्वली पकडून आणून आमच्या अंगणात बांधली होती. माझ्या आजीची ती जाडीढोल आकृती हुबेहूब त्या अस्वलीसारखी दिसत होती.

"सगळी उत्तम तेवढी देव घेऊन गेला आणि वाईट गाळ माझ्यापाशी ठेवून गेला," गालातल्या गालात हसत तिने आपल्या पांढऱ्याशुभ्र छातीवर हाताने क्रूसाची खूण केली. तिचे सारे अंग गदगदा हलले. "वान्या मिळाल्याचा मला खूप आनंद झाला होता. तुझ्यासारखी बाळं अंगावर पाजायला खूप आवडायचं मला! तर मी त्याला घरात घेतला, त्याला नांव ठेवलं आणि इथंच तो छानपैकी लहानाचा मोठा झाला. पहिल्यांदा मी त्याला "भुंगा" म्हणून हाक मारायची. रांगत रांगत सगळीकडं गूं गूं आवाज करत फिरायचा. अलेक्सेय, त्याच्यावर प्रेम कर. अगदी साधा जीव आहे तो!"

मी इवानवर खरोखरीच प्रेम करायचा आणि त्याच्या करामती पाहून थक्क व्हायचा. शनिवारी संध्याकाळी, मुलांना आठवडाभराच्या पापकर्माबद्दल बदडून

काढल्यानंतर आजोबा सायंकाळच्या प्रार्थनेसाठी चर्चला निघून जात आणि स्वैपाकघरामध्ये एका अवर्णनीय मनोरंजक आयुष्याला प्रारंभ होई : चुलाण्यामागून त्सिगानोक काही काळी झुरळे पकडायचा, त्यांना दोऱ्यामध्ये बांधायचा आणि कागदी घसरगाडीला जुंपून, पिवळ्याधम्मक चमकणाऱ्या तासलेल्या टेबलावरून त्या चार काळ्या घोड्यांना पळवायचा.

"आता ते मुख्य धर्मगुरूला आणायला गेलेत!" काडीने त्या झुरळांना दिशा देत तो उत्तेजित स्वरात ओरडायचा.

दुसऱ्या एका झुरळाच्या पाठीमागे कागदी कपटा चिकटवून त्याला तो घसरगाडीमागे पिटाळायचा आणि खुलासा करायचा :

"ते बॅग विसरले, म्हणून हा जोगी ती घेऊन चाललाय."

मग आणखी एका झुरळाचे तो पाय बांधायचा. तेव्हा ते अडखळून पडायचे आणि डोके रेटून पुढे जाऊ लागायचे.

"पाद्रीबाबा संध्याकाळच्या प्रार्थनेला निघाले," आनंदाने टाळ्या पिटत वान्या ओरडायचा.

त्याने उंदीर पाळून त्यांना शिकवले होते. त्या उंदरांच्या कसरती तो आम्हाला दाखवी. त्या उंदरांना तो उभे रहायला लावी आणि मागच्या पायांवर चालण्याचा हुकूम देई. आपल्या लांब शेपट्या लोळवीत, मण्यांसारखे डोळे लुकलुकत चालणारे ते उंदीर फार विनोदी दिसत. त्या उंदरांना तो खूप प्रेमाने वागवीत असे. त्यांना आपल्या कोटाच्या खिशात ठेवी, आपल्या तोंडामधून त्यांना साखर खाऊ घाली, त्यांच्या पाप्या घेई आणि मोठ्या खात्रीपूर्वक सांगे :

"उंदीर हा मोठा शहाणा आणि प्रेमळ शेजारी आहे. घरातलं पिशाच्च उंदरांवर खूप प्रेम करतं, म्हणून जो उंदरांना खाऊ घालतो त्याला ते त्रास देत नाही."

त्सिगानोक पत्त्यांच्या आणि पैशांच्या जादू करून दाखवीत असे. कुणाही मुलांपेक्षा जास्त मोठ्याने तो आरडाओरडा करायचा आणि मुलांमधून त्याला वेगळा करणे खरेच अवघड जायचे. एके दिवशी मुलांबरोबर पत्ते खेळताना ओळीने अनेक वेळा तो "डुक्कर" ठरला. त्याला त्याचा खूप अपमान वाटला आणि गाल फुगवून तो खेळातून उठून गेला. नंतर तिरसटून त्याने माझ्यापाशी तक्रार केली :

"मला ठाऊक आहे, त्यांनी बनाव रचला होता! एकमेकांकडं पाहून डोळे मारत होते आणि टेबलाखालून पत्ते बदलत होते! याला काय खेळणं म्हणतात? तसा मीसुद्धा त्यांना फसवू शकेन!"

तो एकोणीस वर्षांचा होता. आम्हा चारी मुलांना एकत्र केले असते तरी त्यापेक्षा तो खूपच धिप्पाड होता.

आजोबा आणि मिखाईलमामा बाहेर कुणाच्या भेटींना जात, अशा काही सणांच्या संध्याकाळी माझ्या ठसठशीत आठवणीत राहिल्या आहेत. कुरळ्या विस्कटल्या केसांचा याकोवमामा स्वैपाकघरात आपले गिटार घेऊन यायचा आणि आजी फराळाचे पदार्थ मांडून ठेवायची. खायच्या गोष्टींची तिथे नेहमी चंगळ असायची आणि हिरव्या रंगाच्या काचेच्या भांड्यामधून वोदका ओतायचे. त्या हिरव्या काचेत तांबड्या रंगाची फुले मोठ्या खुबीने फुंकून फुलवलेली होती. खास रविवारच्या कपड्यांमध्ये त्सिगानोक झोकात वावरत असायचा. आपला काळा चष्मा चमकावीत ग्रिगोरी हळूच आत येऊन कोपऱ्यात बसायचे. मोठ्या बरणीसारख्या आकाराची, देवीचे वण असलेली लाल तोंडाची आमची लठ्ठ मोलकरीण येवगेन्या आपले धूर्त बारीक डोळे मिचकावीत आणि खोल खर्जसुरात बडबड करीत तेथे बसलेली असायची. काही वेळा उस्पेन्स्की कॅथेड्रलचे केसाळ पाद्रीबाबा यायचे. शिवाय लहान-मोठ्या मासोळीसारखी दिसणारी काही काळपट, हडकुळी माणसे यायची.

प्रत्येकजण खूप खायचा, खूप प्यायचा आणि मोठमोठे उसासे टाकायचा. मुलांना त्यांच्या लायक खाणे मिळायचे (त्यात गोड दारूचा एक ग्लासही समाविष्ट असायचा) आणि हळू हळू वातावरणात एक वेगळीच धुंदी निर्माण व्हायची. याकोवमामा मोठ्या प्रेमाने गिटार छेडून सूर लावायचा आणि हे झाले म्हणजे हमखास एकच वाक्य नेहमी बोलायचा:

"आता मी सुरवात करतो हं!"

कुरळ्या केसांच्या बटा मागे झटकून तो वाद्यावर झुकायचा आणि बगळ्यासारखी मान लांबवायचा. त्याच्या गोल, बेफिकीर चेहऱ्यावर एक स्वप्नाळू भाव तरळू लागे. हळुवार तारा छेडताना त्याच्या तेजस्वी डोळ्यांवर एक धुंद पारदर्शी पटल उमटे आणि संगीताचे सूर पायांना आपोआप नाचवू लागत. त्याच्या वादनाच्या वेळी कमालीची शांतता लागत असे. भिंतींमधून आणि जमिनीमधून झिरपत जाणाऱ्या, दूरवर कुठेतरी खळाळत जाणाऱ्या

एखाद्या निर्झरासारखे ते संगीत असे. तुमच्या अंतःकरणात ते दुःखी, अस्वस्थ भावना चाळवायचे. स्वतःची आणि इतरांची तुम्हाला करुणा वाटू लागे. मोठी माणसेसुद्धा लहान मुलांसारखी भासू लागत. प्रत्येकजण मुग्ध दुःखात स्तब्ध बसून राही.

मिखाईलमामाचा साशा विशेष एकतानतेने ऐकायचा. आपल्या काकाच्या दिशेने तो सारे अंग झोकून बसायचा, त्याचे डोळे गिटारवर खिळलेले असायचे, तोंडाचा आ वासलेला असायचा आणि ओठांच्या कोपऱ्यांमधून लाळ गळत असायची. काहीवेळा तर त्याची इतकी तंद्री लागायची, की धपकन तो खुर्चीवरून खाली पडायचा आणि अशा प्रसंगी पडल्या जागीच एकटक नजर कायम राखून बसून रहायचा.

संगीताच्या मोहिनीने भारून प्रत्येकजण श्वास रोधून बसे. फक्त समोवार शांतपणे गुणगुणत पेटत रहायचा. त्याच्या गुणगुणण्याचा आम्हाला उपद्रव होत नसे. दोन छोटया खिडक्या बाहेरच्या शारदीय रात्रीच्या अंधाराकडे टक लावून पहात रहायच्या. कधीतरी कुणी एखादा तावदानांवर हळूच टकटक वाजवी. मेजावर मेणबत्तीच्या उजेडाच्या भाल्यांसारख्या तीक्ष्ण अशा दोन पिवळ्या ज्योती थरथरत रहात.

याकोवमामा समाधीमध्ये जास्त जास्त दंग होत जायचा. आपले दात आवळून तो गाढ झोपलाय असा भास व्हायचा. पण त्याचे हात मात्र वेगळेच जीवन जगत असायचे. त्याच्या उजव्या हाताची बोटे एखाद्या पक्ष्याप्रमाणे आवाजपट्टीवर फडफडत रहायची आणि डाव्या हाताची बोटे तारांवरून सरसर खाली-वर व्हायची.

एक-दोन प्याले झोकल्यानंतर अप्रिय अशा 'श'कारी आवाजात तो एक गाणे विव्हळू लागायचा. त्या गाण्याला शेवट नसे:

जर याकोव झाला पिल्लू कुत्र्याचं
उडवील झोप शेजाऱ्यांची केकाटणं त्याचं--
हा ऽऽऽ य रे देवा!
कंटाळलो ऽ सोडव बाबा!
रस्त्यावरून चालते जोगीण ठसक्यात,
कावळ्याची कावकाव घोटाळते तिच्या पायात,
हा ऽऽऽ य रे देवा!

• कंटाळलो ऽ सोडव बाबा !
चुलाण्याच्या पाठी रातकिड्याची किरकिर,
बाहेरच्या राईत बेडकाची डराव डराव,
हा ऽऽऽ य रे देवा !
कंटाळलो ऽ सोडव बाबा !
• भिकाऱ्याने विजार वाळायला घातली,
जाता जाता दुसऱ्याने बगलेत मारली—
अरे कंटाळलो ऽ रे कंटाळलो ऽ !
देवा, परमेश्वरा ऽ कंटाळलो ऽ !

मला हे गाणे ऐकवत नसे आणि माझा मामा भिकाऱ्यांबद्दल गाऊ लागला म्हणजे तर रडू अनावर होई.

इतरांप्रमाणे त्सिगानोकही लक्षपूर्वक गाणे ऐकायचा. त्याची हाताची बोटे त्याच्या कुरळ्या बटेमध्ये गुरफटलेली असत, एका कोपऱ्यात त्याची नजर स्थिरावलेली असे व श्वासोच्छ्वास मोठमोठ्याने चाले. काहीवेळा तो दुःखाने कळवळून उद्गारायचा:

"अरेरे, मला जर आवाज असता तर! मीसुद्धा गाणी म्हटली नसती काय?"

"याकोव, तुझं काळीज पिळून काढणं आता पुरे!" उसासा टाकीत आजी म्हणायची. "वान्या, आता तू नाच बघू!"

तिची विनंती ते नेहमीच मानीत असे नाही. पण काहीवेळा याकोव काही क्षण तारांना घट्ट मिठी मारून राही आणि एकदम मूठ सोडून हाताने फरशीवर काहीतरी जोरात फेकल्याचा आविर्भाव करी व गुंडासारखी आरोळी ठोके :

"बस्स झालं हे रडणं! वान्या, नाचायला चल!"

मग वान्या उठायचा, स्वतःला ठाकठीक करायचा, आपला पिवळा सदरा सरळ करायचा आणि जणू काही काचेवरून चालत जावे तसा हलक्या पावलांनी खोलीच्या मध्यभागी जायचा.

"जरा ताल आणखी वाढवा याकोव वासील्येविच," लाजत-मुरकत तो नम्रपणे विनंती करायचा.

गिटारमधून बेभान सूर वाजू लागले, टाचांनी ताल धरला, फडताळावरच्या आणि मेजावरच्या बशा कडकडू लागल्या. त्सिगानोक खोलीच्या मध्यभागी भिंगरीसारखा गरगरत होता, पक्ष्यासारखा झेपा घेत होता, पंखांसारखे हात हलवीत होता आणि त्याचे पाय एवढ्या वेगाने नाचत होते की, पहाणाऱ्याची नजर त्यांच्यावर ठरेना. एक आरोळी मारून तो उकीडवा बसला आणि सोनेरी कळसासारखा गोल फिरला. त्याच्या रेशमी सदऱ्याच्या फलकाऱ्यांनी भोवतालचे सारे काही उजळून उठले.

त्सिगानोक अथकपणे बेभान होऊन नाचत राहिला. असे वाटले की, जर दार उघडले तर तो रस्त्यावर नाचत जाईल, शहरभर नाचत जाईल, दूर कुठल्यातरी अज्ञात भूमीपर्यंत नाचत जाईल...

"आणखी जोसात!" पायाने ताल धरीत याकोव ओरडला.

त्याने एक कर्कश्य शीळ मारली आणि घसा खरवडीत तो ओरडला:

अरे वाटंवर फाटलं नसतं बूट,
बायकूकडं धावलो असतो पयले झूट!

मेजाशी बसलेल्या लोकांनाही आता स्फुरण चढले. जणू तापल्या इस्त्रीचा चटका बसावा तसे ते काही वेळा ओरडायचे किंवा किंचाळायचे. दाढीवाले ग्रिगोरी आपल्या टकलावर टिचक्या वाजवीत ताल धरायचे आणि खालच्या आवाजात काहीतरी पुटपुटायचे. एकदा ते माझ्याकडे झुकले, त्यांची मऊ दाढी माझ्या खांद्याला घासली आणि जणू मी मोठा होतो अशा थाटात माझ्या कानात हळूच कुजबुजले:

"अलेक्सेय माक्सिमोविच, तुमचे वडील जर आत्ता असते तर! त्यांनी एक वेगळीच ज्योत उजळली असती! फार गंमत्या माणूस होता! आठवतो तुम्हाला?"

"नाही."

"अरे! ते आणि तुमची आजी... जरा एक मिनिट थांबा हं!"

उंच, कृश अंगाचे, संतासारखे दिसणारे ग्रिगोरी उठून उभे राहिले, माझ्या आजीसमोर अदबीने किंचित झुकले आणि अगदी वेगळ्या खोल आवाजात म्हणाले:

"अकुलीना इवानोव्ना, आमच्यासाठी नाच करून दाखवा ना! माक्सिम

साव्वातेयेव यांच्याबरोबर कसं नाचत होता ते आठवतं ना? आता आमच्यासाठी एवढं करा!"

"अग्गोबाय ऽ, अहो तुम्ही बोलता काय ग्रिगोरी इवानोविच? ईश्श ऽऽ!" अंग चोरीत आजी हसून उद्गारली. "मी नाचणार? म्हणजे लोकांना हसायला एक विषय मिळायचा! .."

पण प्रत्येकजण तिला आग्रह करू लागला आणि अचानक ती एखाद्या तरुणीच्या डौलात उठून उभी राहिली. तिने आपला घागरा ठाकठीक केला, पाठ ताठ केली, अवजड डोके दिमाखाने मागे झुकवले आणि तरंगत जात ओरडली :

"खुशाल हसू देत हसायचंय त्यांना! चल याकोव! वाजव!"

माझ्या मामाने अंगाला एक झटका दिला, पाय फाकविले, डोळे मिटले आणि किंचित मंद लयीची सुरावट तो वाजवू लागला. त्सिगानोक क्षणभर थांबला, मग त्याने उडी मारली व आजीभोवती फेर धरून तो उड्या मारू लागला. आजी जणू हवेतून तरंगत जावे त्याप्रमाणे फरशीवरून अक्षरशः तरंगती पावले टाकीत होती, तिच्या हातांच्या मोहक हालचाली होत होत्या, भुवया कमानदार बनल्या होत्या आणि काळेभोर डोळे कुठेतरी दूरवर पहात होते. मला ती खूप गंमतीदार वाटली, म्हणून मी खिंकाळलो, पण ग्रिगोरींनी हाताच्या बोटाने मला दटावले आणि सगळ्या मोठ्या माणसांनी माझ्याकडे नाराजीचा कटाक्ष टाकला.

"इवान, बाजूला हो!" हसून ग्रिगोरी म्हणाले आणि त्सिगानोक आज्ञाधारकपणे एका कोपऱ्यात जाऊन बसला. तेवढ्यात येवगेन्या मोलकरीण आपल्या गळ्याची घाटी पुढे काढून सुरेख भरदार आवाजात गाऊ लागली :

शनवारपत्तूर दिवस सात,
पोरीनं विणली लेस खास,
शिणले-झिजले नाजुक हात,
पोरीचा मुखडा झाला उदास!

माझी आजी नाचण्यापेक्षा गोष्टच सांगत होती असे भासत होते. सावकाशपणे, विचारपूर्वक, डोलत डोलत, वर उचललेल्या हाताखालून

कटाक्ष टाकीत ती फिरायची; पुढची वाट काळजीपूर्वक काढताना थोडी घुटमळायची. मग एकदम घाबरून गेल्या सारखी अचानक थांबायची. तिच्या कपाळावर आठ्या असायच्या आणि अंग थरथरत रहायचे. अचानक तिच्या मुद्रेवर प्रेमळ स्मित उजळायचे, जणू कुणाला वाट करून द्यावी अशा थाटात ती बाजूला उडी मारायची आणि इतरांना ढकलल्याचा आविर्भाव करायची. मग मान खाली घालून ती काहीतरी ऐकत रहायची आणि आनंदाचे हसू तिच्या तोंडावर हळू हळू उमटत जायचे. आणि धाडदिशी ती बेभान नृत्य सुरू करायची, स्वत:भोवती गिरक्या घेताना स्वत:च्या उंचीपेक्षा जास्त उंच भासायची, अधिक ताठ भासायची. त्या पुनरुज्जीवित यौवनाच्या मत्त भरारीत ती एवढी आकर्षक दिसायची की तिच्यावरून नजर बाजूला करणे कठीण ठरायचे.

आणि हा सारा वेळ येवगेन्या शिंग फुंकल्यासारखी गात असायची:

नाचता नाचता पहाट फुटली
होता काल रविवार.
सणाची गंमत संपून गेली,
आज उजाडलाय सोमवार.

नाच संपल्यानंतर आजीने समोवारपासची आपली जागा घेतली. सर्वांनी तिची स्तुती केली, पण नम्रपणे ती म्हणाली:

"पुरे पुरे! तुम्ही खरी नाचणारी कधी पाहिलीच नाही म्हणून"– तिने स्वत:चे केस सारखे केले आणि पुढे सांगू लागली, "बालाखनालामी रहात होते तिथं एक मुलगी होती – मी तिचं नांव विसरले. कुणाची होती बरं ती – क्वचित नाचायची, पण नाचायची तेव्हा पाहणाऱ्याच्या डोळ्यांचं पारणं फिटायचं! तिला नाचताना बघणं म्हणजे आनंदाची मेजवानी! मला मेलीला तिचा फार फार हेवा वाटायचा!"

"गाणारे आणि नाचणारे म्हणजे या धरतीवरची हिरे-माणकं!" येवगेन्या म्हणाली आणि तिने डेव्हिड राजाविषयीचे कुठलेतरी गाणे सुरू केले.

"तुला एखाद्या नाचाच्या कंपनीत काम मिळायला पाहिजे," त्सिगानोकच्या खांद्यावर हात टाकीत याकोवमामा म्हणाला. "लोकांची भरपूर करमणूक करशील."

"मला गावंसं वाटतं," त्सिगानोकने आपले दु:ख व्यक्त केले. "देवानं मला जर आवाज दिला, तर न थांबता सतत दहा वर्षं मी गात राहीन– मग पुढं माझं काहीही होवो. संन्यासी बनलो तरी चालेल!"

सारेजण वोदका प्यायले. ग्रिगोरी जास्त प्यायले.

"ग्रिगोरी, सांभाळा हां! नाहीतर पुरते आंधळे व्हाल," त्यांना एकामागून एक ग्लास भरून देताना आजीने इशारा दिला.

"काय बिघडलं?" ग्रिगोरी म्हणाले. "मला आता डोळे नसले तरी चालतील. खूप पाहिलं!"

त्यांना दारू चढली नाही, पण ते जास्त जास्त बोलू लागले. सारा वेळ माझ्या वडिलांविषयी ते माझ्याशी बोलत होते.

"त्यांच्यापाशी मोठं काळीज होतं... खरंच... माक्सिम साव्वातेयेविच फार चांगला मित्र होता..."

आजीने सुस्कारा टाकीत त्यांना दुजोरा दिला: "खरंच, देवाचं लेकरू होता..."

मला ते सारेच वातावरण खूप मौजेचे वाटत होते आणि मी कमालीचा उत्तेजित बनलो होतो. त्या वातावरणात एक प्रकारची निवांत, कंटाळा न आणणारी विषण्णता निर्माण झाली होती. लोकांच्या मनात विषण्णता आणि आनंद अशा दोन्ही भावना नांदत होत्या, त्या अविभाज्य होत्या. एका भावनेच्या जागी दुसरी भावना विलक्षण वेगाने मनाचा ताबा घेत होती.

फारसा झिंगलेला नसतानाही एकदा याकोवमामाने आपला सदरा फाडायला सुरुवात केली, आपले कुरळे केस तो उपटू लागला, रंगविहीन मिशा उपटू लागला, नाक ओढू लागला आणि ओठ पुढे काढीत विव्हळू लागला:

"का, का म्हणून? का म्हणून असं असावं?"

त्याने स्वत:च्या थोबाडीत मारून घेतले, कपाळ आणि ऊर बडविले आणि हुंदके देत म्हणाला:

"मी दुष्ट आणि नालायक आहे, वाया गेलेला आहे!"

"ओ हो! अगदी बरोबर!" ग्रिगोरी गरजले.

"पुरे झालं याकोव! देवाला चांगलं ठाऊक आहे आपल्याला काय

शिकवायचं ते," किंचित धुंदी चढलेली माझी आजी आपल्या मुलाचे हात धरीत म्हणाली.

आणखी थोडे प्यायल्यावर ती जास्तच चांगली बनली. तिचे हसरे काळे डोळे प्रत्येकावर प्रेमाचा वर्षाव करीत होते. आपल्या लालबुंद घामेजलेल्या चेहऱ्याला हातरुमालाने वारा घालीत किनऱ्या आवाजात ती म्हणायची :

"देवा, परमेश्वरा, सारं किती छान आहे! खरंच कित्ती कित्ती छान आहे नाही!"

तो तिच्या काळजातील आवाज होता, तिच्या आयुष्याचे ब्रीदवाक्य होते.

माझ्या बेफिकीर मामाच्या अश्रूंचे आणि रडण्याचे मला मोठे नवल वाटायचे. तो रडत का होता आणि स्वतःला मारून का घेत होता, असा मी आजीला प्रश्न केला.

"तुला सारं माहीत करून घ्यायला हवं असतं!" नाखुषीने ती गरजली. वस्तुतः अशा रीतीने माझ्याशी बोलण्याची तिची पद्धत नव्हती. "काही दिवस थांब– अशा बाबतीत तू नाक खुपसणं फार घाईचं ठरेल!"

पण तिच्या अशा बोलण्यामुळे माझी उत्सुकता अधिकच ताणली. वर्कशॉपमध्ये जाऊन मी इवानला त्याबाबतीत प्रश्न करू लागलो. त्यानेही मला उत्तर देण्याचे टाळले. फक्त तो शांतपणे हसला, डोळ्याच्या एका कोपऱ्यातून त्याने ग्रिगोरींकडे एक कटाक्ष टाकला व मला वर्कशॉपमधून बाहेर काढू लागला.

"पुरे कर! इथल्या एखाद्या बरणीत तुला टाकून हिरवागार रंग द्यायच्या आत इथून पळ बघू!" तो ओरडला.

तीन मोठ्या बरण्या बसविलेल्या एका बैठ्या, रुंद चुलाण्यासमोर ग्रिगोरी उभे होते. एक लांब काळ्या काठीने ते त्या बरण्यांमधील द्रव ढवळीत होते. नंतर त्याच काठीने कापड उचलून त्यावर कितपत रंग चढलाय याचा ते अंदाज घेत असत. त्यांच्या कंबरेला बांधण्याच्या कातडी मलवस्त्रावर आगीच्या धगीचा प्रकाश उजळला होता. धर्मगुरुच्या जरतारी बहुरंगी झग्यासारखे त्यांचे मलवस्त्र दिसत होते. बरण्यांमधील रंगीत पाण्याला बुडबुडे येत होते आणि दारामधून बाहेर हिवाळी अंगणात तिखट धुराचे लोट वहात होते.

ग्रिगोरींनी चष्म्याच्या काचांखालून आपल्या लालभडक अंधुक डोळ्यांनी मला रोखून पाहिले. मग ते इवानकडे वळले.

"मला थोडं सर्पण पाहिजे ते तुला दिसत नाही का?" कठोर आवाजात ते म्हणाले.

त्सिगानोक बाहेर अंगणात पळाला तेव्हा ग्रिगोरी रक्तचंदनाच्या पोत्यावर बसले आणि त्यांनी मला आपल्याकडे येण्याची हाताने खूण केली.

"इकडं ये," ते म्हणाले.

त्यांनी मला आपल्या मांडीवर बसविले, आपल्या उबदार नरम दाढीने माझ्या गालाला घासले आणि जे काही सांगितले ते मी कधीही विसरणार नाही.

"तुझ्या मामानं आपल्या बायकोला मरेपर्यंत मारलं आणि त्यामुळं त्याच्या मनाला शांतता लाभत नाही. समजलं? तुला प्रत्येक गोष्ट माहीत झाली पाहिजे हे अगदी योग्य आहे. डोळे सतत उघडे ठेव, नाहीतर तुला काळ फार कठीण जाईल."

माझ्या आजीशी बोलणे जसे सोपे जाई, तसेच ग्रिगोरींशी बोलणेही मला सोपे वाटे. पण त्यांच्याशी बोलताना मनात धडकी भरायची. आपल्या काळ्या चष्म्यामधून ते तुमच्याकडे पहात तेव्हा त्यांना आरपार सगळे काही दिसते असे वाटायचे.

"आणि त्यानं तिला मरेपर्यंत कसं मारलं माहीत आहे?" सावकाशपणे ते पुढे म्हणाले. "तो बिछान्यात तिच्याशेजारी झोपायचा. तिला पाया-पासून डोक्यापर्यंत दुलईमध्ये गुंडाळायचा आणि रोज रात्री बुकलून काढायचा. शेवटी ती मेली. तो असं का वागायचा? त्याचं त्यालाच उत्तर देता येत नाही."

इवान लाकडे घेऊन आला आणि हात शेकण्यासाठी चुलाण्यासमोर उकीडवा बसला. पण त्याच्याकडे मुळीच लक्ष न देता ग्रिगोरी ऐटीत बोलत राहिले.

"कदाचित ती त्याच्यापेक्षा जास्त चांगली होती आणि तिचा त्याला मत्सर वाटत होता, म्हणून तो तिला मारत असेल. बेटा, ही कशीरिन कुटुंबातली माणसं स्वतःपेक्षा जास्त चांगल्या माणसांना सहन करू शकत नाहीत. चांगुलपणाचा ते हेवा करतात, पण ते चांगुलपण त्यांना आत्मसात

करता येत नाही. म्हणून त्याला ते नष्ट करतात. तुझ्या वडलांना त्यांनी इथून कसं पिटाळून लावलं ते तुझ्या आजीला विचार. ती सारं सांगेल तुला. तिला खोटं बोलता येत नाही, खोटं सोसत नाही. कधीमधी ती घोटभर पीत असली आणि तपकीर ओढायला तिला आवडत असलं तरी तुझी आजी म्हणजे देवमाणूस आहे. पवित्र बाई आहे. पोरा, तू तिच्याजवळ रहात जा..."

त्यांनी मला दूर ढकलले आणि सुन्न, घाबरल्या मन:स्थितीत मी बाहेर आवारात गेलो. फाटकापाशी वान्याने मला गाठले.

"त्यांना भिऊ नको, चांगला माणूस आहे तो," माझ्या डोक्यावर मायेने हात ठेवीत तो माझ्या कानात कुजबुजला. "त्यांच्या डोळ्यात सरळ बघत जा—तसं करणारी माणसं त्यांना आवडतात."

सारे काही विचित्रपणे अस्वस्थ करणारे होते. दुसरे जीवन मला ठाऊक नव्हते, पण मला अस्पष्ट आठवण होती की, माझे आई-बाबा असे रहात नव्हते. त्यांचे बोलणे वेगळ्या प्रकारचे असे, त्यांच्या करमणुकीचे प्रकार वेगळे होते, नेहमी जोडीने बसत—जोडीने फिरत. संध्याकाळच्या वेळी खिडकीशी बसून गाणी गात, खूप मोठ्यांदा हसत. त्यांचे शेजारीपाजारी भोवती जमून त्यांची गाणी ऐकत. त्या शेजारच्या लोकांचे वर उचललेले चेहरे मला नेहमी खरकट्या बशांची आठवण करून देत, असे स्मरते. याउलट इथे माणसे क्वचित हसत. आणि जेव्हा हसत तेव्हा नेमके कशासाठी हसत याचा तुम्हाला अंदाज लागत नसे. ही माणसे नेहमी एकमेकांवर खेकसत, एकमेकांना धमक्या घालीत, एखाद्या कोपऱ्यात कुजबूज करीत. मुले गप्प असायची, त्यांचे अस्तित्वच जाणवायचे नाही. पावसाने धूळ जमिनीवर चोपून बसवावी तशी ही मुले चेपलेली असत. मला या घरात खूप परक्यासारखे वाटायचे. इथले आयुष्य मला हजार सुयांसारखे बोचायचे, माझ्या मनात सारखे संशय दाटून यायचे आणि प्रत्येक गोष्टीकडे मी ताण-ताणून लक्ष देऊ पहायचा.

इवानबरोबर माझी मैत्री वाढली. सूर्योदयापासून रात्री उशीरापर्यंत आजी घरकामात गुंतलेली असायची. म्हणून त्सिगानोकच्या पाठीशी फिरत फिरत मी सबंध दिवसाचा वेळ घालवायचा. जेव्हा जेव्हा आजोबा मला बदडून काढत तेव्हा तेव्हा स्वत:चा हात आडवा घालून तो माझा बराच

मार वाचवायचा. नंतर दुसऱ्या दिवशी स्वतःची सुजलेली बोटे दाखवून माझ्यापाशी तक्रार करायचा :

"काही अर्थ नाही यात. तुला काही मदत होत नाही आणि हे बघ मला काय मिळालं! ही शेवटची वेळ – पुढच्या वेळी तुझं तू सांभाळ!"

पण पुढच्या वेळी पुन्हा तो माझ्या वाटयाची शिक्षा भोगायचा.

"तू म्हणाला होतास, पुन्हा तू माझ्यासाठी मार खाणार नाहीस," मी म्हणायचा.

"बोलणं आणि वागणं या दोन वेगळ्या गोष्टी असतात. कसं काय असं घडतं ते माझं मलाच समजत नाही."

लौकरच मला त्सिगानोकसंबंधी काही माहिती समजली. त्यामुळे त्याच्याविषयीची माझी आस्था आणि भक्ती जास्तच वाढली.

दर शुक्रवारी त्सिगानोक घसरगाडीला तांबूस रंगाचा, खसी केलेला शाराप नांवाचा घोडा जुंपायचा (या खोडकर जनावराला गोड पदार्थांची फार आवड होती – माझ्या आजीचा तो फार लाडका होता). स्वतः त्सिगानोक डोक्यावर भलीमोठी टोपी चढवायचा, आखूड मेंढकातडी कोटाला हिरवा कमरबंद करकचून आवळायचा आणि आठवडयाचे खाद्यपदार्थ विकत आणण्यासाठी बाजाराला जायचा. काहीवेळा त्याला परत यायला खूप उशीर व्हायचा. मग प्रत्येकजण धाबराघुबरा होई, सारखा खिडकीशी जाऊन गोठलेल्या काचेच्या तावदानावर वाफेचा भपकारा सोडीत दूर रस्त्यावर नजर टाकी.

"आला का?"

"नाही अजून!"

सर्वांत जास्त चिंता आजी करायची.

"अरे देवा!" ती आपल्या मुलांना आणि नवऱ्याला उद्देशून म्हणायची. "चांगल्या माणसाला आणि चांगल्या घोडयाला तुम्ही लोक ठार माराल! निर्लज्ज प्राण्यांनो, जरा सद्बुद्धीनं वागा! मिळतं त्यावर तुमचं कध्धी समाधान नाही. मूर्ख माणसं! लोभी!! देव तुम्हाला चांगली अद्दल घडवील!"

आजोबा कपाळाला आठ्या घालीत पुटपुटत: "ठीक आहे, ठीक आहे. आता ही शेवटचीच वेळ..."

काहीवेळा त्सिगानोक दुपारीच परतायचा. मग आजोबा आणि दोन्ही

मामा त्याला अंगणातच भेटायला धावत जात. त्यांच्या पाठीशीच रागाने तपकीर ओढीत, अस्वलासारखी दुडक्या चालीने आजी जायची. का कुणास ठाऊक, पण अशा प्रसंगी ती अगदी वेंधळ्यासारखी वागायची. मुलेसुद्धा घरातून धावत बाहेर येत आणि मग ताज्या कोंबड्या, आख्खी डुकरे, मासे व वेगवेगळ्या प्रकारच्या मांसाच्या तुकड्यांनी लगडलेली घसरगाडी सोडण्याचा आनंदसोहळा सुरू व्हायचा.

"सांगितलेल्या सगळ्या वस्तू आणल्यास?" आपल्या तीक्ष्ण बारीक डोळ्यांनी घसरगाडी न्याहाळीत आजोबांनी विचारले.

"सर्व काही, सांगितलं होतं त्याप्रमाणं," आवारात आनंदाने उड्या मारीत आणि हातमोजे घातलेले पंजे ऊब आणण्यासाठी एकमेकांवर घाशीत इवान उत्तरला.

"हातमोजे घासायचं थांबव–त्यांना पैसे पडतात," कडक आवाजात आजोबा ओरडले. "सुटे पैसे परत आणलेस?"

"नाही."

घसरगाडीभोवती सावकाश चक्कर मारीत आजोबा स्वतःशीच पुटपुटले : "पुन्हा एकदा तू चिक्कार सामान भरून आणलेलं दिसतंय. यातलं काही पैसे न देता तर आणलं नाहीस ना? माझ्या घरात तसलं काही चालणार नाही, समजलास?"

आणि चेहरा वेडावाकडा करीत आजोबा तेथून घाईघाईने निघून जायचे.

मग माझे मामा आनंदाने उड्या मारीत घसरगाडीजवळ जायचे आणि पाखरे, मासे, काळीज, वासराच्या तंगड्या, मटणाचे तुकडे इत्यादींचे वजन किती असेल त्याचा अंदाज घेऊ लागत.

"माल तर मोटा झकास आणलास!" शिट्या मारीत आणि पसंतीच्या आरोळ्या ठोकीत ते म्हणायचे.

मिखाईलमामा विशेष खूष व्हायचा. स्प्रिंगा लावल्याप्रमाणे तो घसरगाडीभोवती लंगडी घालायचा, सुतारपक्ष्यासारखा नाकाने वस्तू हुंगायचा, जिभल्या चाटायचा आणि अस्वस्थ डोळे किलकिले करीत समाधान व्यक्त करायचा. माझ्या आजोबांसारखाच तो हडकुळा होता आणि त्यांच्याचसारखा दिसायचा. फक्त त्यांच्यापेक्षा तो जरा उंच होता आणि जिप्सीसारखा काळा होता. बाह्यांमध्ये गोठलेले हात खुपसून तो त्सिगानोकला विचारायचा :

. "म्हाताऱ्यानं किती पैसे दिले तुला?"

"पाच रूबल."

"आणि इथं सामान किमान पंधरा रूबलचं आहे. तू खर्च किती केलेस?"

"चार रूबल दहा कोपेक."

. "म्हणजे तुझ्या खिशात नव्वद कोपेक आहेत. होय की नाही? ऐकलंस याकोव? पैसे करायचा हा एक मार्ग आहे बघ!"

नुसता सदरा अंगात घालून गोठलेल्या निळ्या आकाशाकडे किलकिल्या नजरेने पहात गारठ्यात उभा असलेला याकोवमामा खुदकन हसला.

"वान्या, आम्हा प्रत्येकाला अर्धा पिंट पाजणार का?" तो हेल काढून विचारायचा.

आजीने घोड्याला घसरगाडीपासून मोकळे केले.

"काय रे माझ्या छबड्या? काय रे माझ्या बबड्या?" घोड्याला सोडता सोडता ती पुटपुटायची. "खेळायचंय का थोडं? जा, पळ. थोडं खेळलास बागडलास तर देव मना करत नाही."

प्रचंड आकाराचा शाराप आपली आयाळ उडवायचा, आपल्या पांढऱ्या दातांनी आजीचा खांदा ओरबाडायचा, तिचा रेशमी रुमाल खेचून काढायचा, आपल्या आनंदी डोळ्यांनी तिच्या चेहऱ्याकडे कटाक्ष टाकायचा व पापण्यांवरील गोठलेले पाणी झटकता झटकता हळूच फुरफुरायचा.

"तुला पावाचा तुकडा हवाय का रे?" उत्तम मीठ चोळलेला पावाचा भलामोठा तुकडा त्याच्या जबड्यात कोंबीत, आपल्या कंबरेचे मलवस्त्र त्याच्या तोंडाखाली धरीत आणि त्याला पाव चघळताना कौतुकाने पहात ती विचारायची.

"आजी, हा घोडा म्हणजे रत्न आहे रत्न!" स्वतः शिंगरासारखा बागडणारा त्सिगानोक म्हणायचा. "इतका हुशार आहे तो!"

"चल, चालता हो! इथं शेपटी घोटाळत फिरू नकोस!" पाय आपटून आजी त्सिगानोकवर ओरडली. "अशा दिवशी मी तुझ्या काही कामाची नाही हे तुला चांगलं ठाऊक आहे!"

तिने मला समजावून सांगितले की, त्सिगानोक जेव्हा बाजारात जातो तेव्हा वस्तू विकत घेण्यापेक्षा चोऱ्या जास्त करतो.

"आजोबा त्याला पंजा देतात. हा तीन खर्च करतो आणि दहा रूबल किंमतीच्या मालाची चोरी करतो," ती उदासवाण्या सुरात म्हणाली. "त्याला चोरी करायला आवडतं, डांबीस आहे! एकदा चोरीचा प्रयत्न केला – जमलं! इथं घरी त्याला सगळे हसले आणि सगळ्यांनी त्याचं कौतुक केलं! बास्स! तेव्हापासून त्याला चोरीची सवयच लागलीय! तुझे आजोबा तरुण होते तेव्हा दारिद्रयानं एवढे गांजले होते की, आता म्हातारपणी खूप कंजूस बनलेत. आपल्या स्वतःच्या मुलांपेक्षा त्यांना पैशाची किंमत जास्त वाटते. फुकटात काही मिळालं की आनंदाचं भरतं येतं त्यांना! आणि मिखाईल-याकोव यांच्या बाबतीत म्हणशील तर..."

त्यांचा विचार तिने हाताच्या फलकाऱ्यासरशी मनातून काढून टाकला आणि क्षणभर ती गप्प झाली.

"अल्योशा, ही फार गुंतागुंतीची जाळी आहे," आपल्या तपकिरीच्या डबीकडे पहात ती पुढे म्हणाली. "एखाद्या आंधळ्या जखिणीनं बनवावी तशी! तुला आणि मला तिचा आगा-पिछा समजला नाही तर त्यात नवल काही नाही. पण एकदा का वान्याला चोरी करताना त्यांनी पकडलं, तर मात्र त्याला मरेपर्यंत मारतील..."

पुन्हा थोडा वेळ ती गप्प झाली आणि बोलायला सुरुवात केली तेव्हा तिचा स्वर खूप मऊ झाला होता.

"कायदे खूप आहेत आपल्याकडं, पण त्यांना सत्याचा आधारच नाही!.."

दुसऱ्या दिवशी मी त्सिगानोकला खूप विनवून सांगितले की, यापुढे चोरी करू नको.

"तुला ते मरेपर्यंत मारतील..."

"ते मला मुळी पकडूच शकणार नाहीत. मी निसटून जाईन, मी चतुर आहे आणि माझा घोडा वेगात धावतो," तो हसून म्हणाला. पण लगेच त्याच्या कपाळाला आठ्या पडल्या आणि त्याचा चेहरा उतरला. "चोरी करणं वाईट आहे, धोक्याचं आहे हे मला ठाऊक आहे. मी उगीच गंमत म्हणून चोरी करतो. आणि मी काही पैसे साठवून ठेवत नाही. आठवडाभराच्या दरम्यान तुझे मामा मला पुरता साफ करतात. पण मला त्याची पर्वा नाही– खुशाल घेऊ देत त्यांना पैसे! मला पोटापुरतं भरपूर मिळतं."

अचानक त्याने मला वर उचलले आणि हळूच गदगदा हलविले.

"तू बारकुळा आणि वजनानं हलका आहेस, पण तुझं हाडपेर चांगलं आहे. मोठेपणी तू चांगला दमदार गडी बनशील. माझं ऐक – गिटार वाजवायला शीक. तुझ्या याकोवमामाला शिकवायला सांग. थट्टा नाही करीत! तू अजून फार लहान आहेस एवढीच एक अडचण आहे. आहेस छोटा पण तुझ्यात पाणी आहे! तुझा आजोबा तुला आवडत नाही, होय की नाही?"

"मला ठाऊक नाही."

"आजी सोडून कुणीही कशीरिन मल वडत नाही. फक्त सैतानालाच अशी माणसं आवडणं शक्य आहे."

"आणि मी?"

"तू कशीरिन नाहीस. तू पेश्कोव आहेस. तुझं रक्त वेगळं, तुझी कुळी वेगळी!"

एकदम त्याने मला गच्च धरले आणि विव्हळत्या सुरात तो म्हणाला:

"देवा रे, मला गाता आलं असतं तर किती छान झालं असतं! लोकांची काळजं हलवून टाकली असती! बराय बंधू. आता कामाला लागलं पाहिजे."

त्याने मला खाली ठेवले, मूठभर खिळे तोंडात धरले आणि कुठलेतरी ओले काळे कापड तो मोठ्या चौकोनी बोर्डावर अडकवू लागला.

त्यानंतर लौकरच तो ठार झाला!

त्याचे असे घडले: आमच्या आवाराच्या कुंपणाला टेकून फाटकापाशीच एक भला मोठा ओकच्या लाकडाचा क्रूस पडला होता. त्याला टोकाशी जाडजूड चौथरा होता. बरेच दिवस तो क्रूस तेथे तसाच पडून होता. मी प्रथम त्या घरात जेव्हा रहायला आलो तेव्हा तो क्रूस पाहिल्याचे मला आठवते. त्यावेळी तो नवा होता आणि पिवळा दिसायचा. आता शरदातल्या पावसाने तो काळवंडला होता आणि ओकच्या मुरलेल्या लाकडाचा झणझणीत वास त्याच्यामधून येऊ लागला होता. आमच्या छोट्या, अनेक वस्तू दाटलेल्या आवारात त्याची फार अडगळ होत होती.

याकोवमामाने आपल्या बायकोच्या थडग्यावर पुरण्यासाठी तो क्रूस विकत आणला होता. तिच्या पहिल्या श्राद्धाच्या दिवशी, स्वतःच्या खांद्या-वरून तो क्रूस स्मशानात वाहून नेण्याची त्याने प्रतिज्ञा केली होती.

हिवाळ्याच्या सुरवातीला शनिवारी त्याच्या बायकोच्या मृत्यूचा वर्ष-दिवस येत होता. खूप थंडी होती, वारे सुटले होते आणि छपरांवरून बर्फाचे लोट उधळत होते. वर्षदिनाच्या क्रियाकर्मांना हजर राहण्यासाठी आजी, आजोबा आणि इतर तीन नातवंडे घोड्याच्या घसरगाडीतून आधीच स्मशानभूमीत गेली होती. बाकी सारे बाहेर आवारात गेले होते. मी काहीतरी गुन्हा केला होता त्याची शिक्षा म्हणून मला घरातच बसवून ठेवण्यात आले होते.

माझ्या मामांनी एकसारखे काळे कोट घातले होते. त्यांनी क्रूसाची वरची बाजू उचलली व त्याचा एक हात याकोवच्या खांद्यावर आणि दुसरा मिखाईलच्या खांद्यावर ठेवला. ग्रिगोरी यांनी आणि एका तिऱ्हाईत माणसाने मिळून मोठ्या कष्टाने अवजड चौथऱ्याची बाजू उचलली व त्सिगानोकच्या रुंद खांद्यांवर ठेवली. तो लटपटला आणि तोल सांभाळण्यासाठी त्याने पाय फाकले.

"तुला जमेल का?" ग्रिगोरींनी विचारले.

"ठाऊक नाही. फार जड आहे."

"ए आंधळ्या, फाटक उघड," मिखाईलमामा गरजला.

"वान्या, तुला शरम वाटली पाहिजे," याकोवमामा म्हणाला. "आम्ही दोघं तुझ्यापेक्षा वजनानं कमी आहोत."

पण फाटक उघडून ग्रिगोरी वान्याकडे वळून ताकीद देण्याच्या सुरात म्हणाले :

"फार ताण बसणार नाही अशी काळजी घे. देव तुझं रक्षण करो!"

"चूप रे लूतभऱ्या म्हाताऱ्या!" रस्त्यावरून मिखाईलमाना ग्रिगोरींवर खेकसला.

आवारातील सारेजण हसले आणि मोठमोठ्या आवाजात बोलू लागले. जणू क्रूसाची अडगळ बाजूला केल्यामुळे त्यांना आनंद झाला होता.

ग्रिगोरींनी माझा हात धरला आणि ते मला वर्कशॉपमध्ये घेऊन गेले. "आज तुझे आजोबा कदाचित तुला चोपणार नाहीत. आज त्यांचा नूर चांगला दिसतोय," ते म्हणाले.

रंगविण्यासाठी तयार ठेवलेल्या लोकरीच्या ढिगावर त्यांनी मला बसवले आणि हळुवारपणे त्यांनी ती लोकर माझ्या अंगाभोवती गुंडाळली. बरण्यां-मधून येणारी वाफ हुंगून पाहता पाहता गंभीरपणे ते माझ्याशी बोलू लागले.

"बेटा, तुझ्या आजोबांना मी सदतीस वर्षं ओळखतो. या धंद्याची सुरुवात मी पाहिलीय आणि त्याची अखेर आता पाहतोय. आम्ही चांगले मित्र होतो, धंद्यात बरोबरीनंच शिरलो, जोडीनं मिळूनच या धंद्याचा विचार केला. तुझे आजोबा म्हणजे मोठा चलाख माणूस! इथं ते मालक झाले बघ! मला ते जमलं नाही. पण आपणा कुणाहीपेक्षा देव जास्त चलाख असतो. नुसता एकदा हसला म्हणजे शहाण्यातल्या शहाणा माणूसही वेड्यासारखा डोळे मिचकावत उभा राहतो! प्रत्येक गोष्ट कशी आणि का घडते हे अजून तुला समजत नाही, पण तुला सारं माहीत असणं योग्य आहे. अनाथाचं आयुष्य सोपं नाही. तुझा बाप, माक्सिम साव्वातेयेविच हा एक्का माणूस होता. त्यांना सारं काही समजायचं. म्हणून तुझ्या आजोबाना ते आवडायचे नाहीत आणि त्यांच्याशी काही व्यवहार करायचे नाहीत...."

तिथे बसून अशा तऱ्हेचे त्यांचे दयाळू शब्द ऐकायला आणि चुलाण्यामधील लाल-सोनेरी जाळाचा नाच पहायला खूप मजा वाटत होती. बरण्यांमधून वाफेचा दुधाळ ढग उमटत होता आणि उतरत्या छताच्या लाकडी फळ्यांवर थिजत होता. एका वेड्यावाकड्या फटीतून मला आकाशाची निळी फीत दिसली. वारा पडला होता, सूर्य प्रकाशत होता आणि सबंध आवारभर फरशीची काच विखुरल्याचा भास होत होता. रस्त्यावरून घसरगाड्यांच्या पट्ट्यांखाली चुरचुरणाऱ्या बर्फाचे आवाज येत होते. घरांच्या धुरांड्यांमधून निळ्या धुराच्या वाकड्या रेषा उमटत होत्या आणि बर्फावरून हलक्या सावल्या झरझर सरकत जात होत्या. जणू त्यासुद्धा आपली गोष्ट सांगत होत्या.

उंच, हडकुळे, लांब दाढीचे आणि मोठ्या कानांचे ग्रिगोरी तेथे टोपीशिवाय उभे राहून रंग उकळीत असताना आणि मला धडे देत असताना एखाद्या दयाळू जादुगाराप्रमाणे भासत होते.

"नेहमी लोकांच्या डोळ्यात सरळ पहा. तुझ्या पाठीशी लागलेला कुत्रासुद्धा तू त्याच्या डोळ्यात सरळ पाहिलंस तर जागच्या जागी थांबेल..."

त्यांच्या जाडजूड चष्म्याच्या काचा त्यांच्या नाकाच्या हाडावर जोरात दाबल्या गेल्यामुळे माझ्या आजीप्रमाणेच त्यांच्या नाकाचा शेंडा निळसर बनला होता.

"काय झालं?" एकदम थांबून ते म्हणाले. क्षणभर त्यांनी कान देऊन ऐकले आणि पायाने चुलाण्याची झडप बंद करून वेगाने ते आवारात पळाले. मी त्यांच्या पाठोपाठ धावलो.

स्वैपाकघरातल्या फरशीवर मधोमध त्सिगानोक पाठीवर उताणा पडला होता. खिडकीतून प्रकाशाचे दोन रुंद कवडसे चमकत होते. एक त्याच्या डोक्यावर आणि छातीवर पडला होता व दुसरा त्याच्या पावलांवर. त्याचे कपाळ विचित्र प्रकाशाने चमकत होते. त्याच्या भुवयांची कमान झाली होती. त्यांचे उतरते डोळे काजळलेल्या छताकडे टक लावून पहात होते. त्याचे काळसर ओठ थरथरत होते आणि त्यांच्यामधून गुलाबी फेस बाहेर पडत होता. त्याच्या तोंडाच्या कोपऱ्यांमधून रक्ताचे बारीक ओघळ वहात येत होते. त्या रक्ताच्या धारा त्याच्या मानेवरून उतरून खाली फरशीवर पडत होत्या आणि त्याच्या अंगाखाली रक्ताचे थारोळे जमले होते. इवानचे पाय लुळे पडले होते आणि त्याची रुंद विजार ज्या पद्धतीने फरशीला चिकटली होती त्यावरून ती चिंब भिजल्याचे स्पष्ट दिसत होते. खोलीतली लाकडी फरशी वाळूने एवढी जोरात घासली होती की, सूर्यप्रकाशात ती चकचकायची. रक्ताचे ओघळ दाराच्या दिशेने धावत होते आणि जेथे सूर्याची किरणे पडली होती तेथे ते टसटशीतपणे चमकत होते.

त्सिगानोक संपूर्ण निपचित पडला होता. फक्त त्याच्या पसरलेल्या हातांची बोटे फरशी खरवडत होती. रंगाचे डाग पडलेली त्याची नखे उन्हात चमकत होती.

येवगेन्या मोलकरीण इवानशेजारी वाकून बसली होती आणि त्याच्या हाती मेणबत्ती देण्याचा प्रयत्न करीत होती. पण त्याला मेणबत्ती पकडता येत नव्हती. मेणबत्ती खाली पडली आणि तिची ज्योत रक्तामध्ये भिजून विझली. येवगेन्याने पटकन मेणबत्ती उचलली, पुसली आणि पुन्हा एकदा त्याच्या थरथरत्या बोटांमध्ये तिला ठेवायचा प्रयत्न केला. स्वैपाकघरात एक दबते उत्तेजक वातावरण पसरले होते. त्या वातावरणाने मला वाऱ्या-सारखे दाराशी भिरकावून दिले होते, पण मी दाराच्या मुठीला गच्च पकडून तेथेच उभा होतो.

"तो अडखळला," निर्जीव आवाजात याकोवमामा म्हणाला. तो

डोक्याला हिसके देत होता. तोसुद्धा कमालीचा विटका आणि सुरकुतलेला दिसत होता. निस्तेज डोळ्यांची सारखी उघडझाप करीत होता.

"तो पडला आणि क्रूसाखाली चिरडला. त्याच्या पाठीत दणका बसला. आम्ही वेळीच बाजूला झालो नसतो तर आम्हीही त्याच्याखाली सापडलो असतो."

"म्हणजे तुम्ही त्याला चिरडलंत," ग्रिगोरी घोगऱ्या आवाजात म्हणाले.

"तुम्हाला काय वाटतं की आम्ही..."

"होय. तुम्ही!"

रक्त वहातच होते. दारापाशी एव्हाना त्याचे थारोळे जमले होते, त्याला काळसर रंग चढला होता. आणि त्याची पातळी उंचावत होती. जणू झोपेत आवाज करावेत तसे आवाज करीत त्सिगानोक तेथे पडला होता. त्याच्या तोंडामधून गुलाबी फेस सतत येत होता, त्याचे शरीर हळू हळू विरघळून जात होत, सपाट होत होते. जणू फरशीमध्ये तो एकजीव होत चालला होता.

"मिखायलोनं घोडा घेतला आणि बाबांना आणायला तो चर्चमध्ये गेलाय" याकोव अस्पष्टपणे म्हणाला. "मी त्याला द्रोश्कीत टाकलं आणि इथं घाईनं घेऊन आलो... बरं झालं मी चौथरा उचलला नव्हता, नाहीतर आता मी कुठं असतो..."

येवगेन्याने पुन्हा एकदा त्सिगानोकच्या हाती मेणबत्ती ठेवली. त्याच्या पंजावर तिचे अश्रू आणि वितळणारे मेणाचे थेंब सांडत होते.

"येडपटे, त्याच्या डोक्यापाशी मेणबत्ती चिकटवून ठेव!" ग्रिगोरी खेकसले.

"अस्सं! आता बरोबर!"

"त्याची टोपी काढ!"

येवगेन्याने त्याची टोपी खेचून काढली आणि इवानचे डोके फरशीवर आपटल्याचा हलकासा आवाज झाला. आता त्याचे डोके वळविले असल्याने त्याच्या तोंडामधून रक्ताचा लोंढा जास्त वाहू लागला. मात्र एकाच कोपऱ्यातून रक्त वहात होते. हे असे खूप वेळ चालत राहिले. प्रथम मला वाटले की, त्सिगानोक थोडा वेळ पडून विश्रांती घेईल, मग उठून बसेल, संतापून थुंकेल आणि नेहमीप्रमाणे म्हणेल:

"छचा: ! काय गरम होतंय !"

रविवारी वामकुक्षी संपल्यानंतर नेहमी तो असे म्हणायचा. पण आता उठून बसण्याऐवजी तो तसाच पडून होता आणि विरघळून चालला होता. सूर्याची किरणे खोलीतून मागे सरली होती. आता फक्त खिडकीच्या तावदानांवर ऊन चमकत होते. त्सिगानोकचा चेहरा आणि त्याचे हात काळवंडले होते. त्याच्या हाताची बोटे इत:पर हलत नव्हती आणि तोंडामधून फेसाचे बुडबुडे येणे थांबले होते. त्याच्या डोक्याशी तीन मेणबत्त्या पेटवून ठेवलेल्या होत्या. त्यांच्या सोनेरी ज्योतींनी त्याचे निळे-काळे दाट केस, त्याच्या नाकाचे चिमटलेले टोक, त्याचे रक्तमाखले दात उजळून टाकले होते. त्याच्या काळसर गालांवर ज्योतींच्या प्रकाशाच्या सावल्या थरथरत होत्या.

येवगेन्या त्याच्या शेजारी बसून रडत होती.

"अरे माझ्या गरीब पाखरा! किती रे चांगला होतास तू ऽ ऽ!" ती अस्पष्टपणे विव्हळली.

तेथे थंड होते आणि भयानक वाटत होते. मी टेबलाखाली लपून बसलो होतो. मग रॅकून प्राण्याच्या केसाळ कातडी कोटातले माझे आजोबा धडपडत स्वैपाकघरात येऊन पोचले. त्यांच्या पाठोपाठ कॉलरला छोटचा केसाळ शेपटचा लावलेल्या कोटातली माझी आजी आत आली. त्यांच्या बरोबरच मिखाईलमामा, मुले आणि अनेक परकी माणसे आली.

आजोबांनी कोट फरशीवर फेकला आणि ते ओरडले :

"अक्करमाशांनो! या पोराचं असं वाटोळं केलंत! अरे आणखी पाच वर्षांत हा सोन्याच्या मोलाचा झाला असता रे!"

फरशीवर पडलेल्या कपडयांमुळे मला आता इवान नीट दिसत नव्हता. त्याला व्यवस्थित पाहता यावे म्हणून बरी जागा शोधण्यासाठी मी सरपटत चाललो असताना नेमका आजोबांच्या वाटेत आडवा आलो. त्यांनी मला लाथेने बाजूला ढकलले आणि माझ्या मामांवर आपली छोटी लाल मूठ वळवून ते ओरडले :

"लांडगे आहात शुद्ध लांडगे!"

मग ते बाकडयावर खाली कोसळले आणि बोटांनी बाकडे गच्च धरून हुंदके देत किरकिऱ्या आवाजात बडबडू लागले :

"मला माहीत आहे—तुम्हाला तो सलत होता. अरे अरे वान्या, मूर्ख

पोरा! आता आम्ही काय करणार रे? मी म्हणतो, आता आम्ही काय करणार? घोडं म्हातारं झालंय, खोगीर विकलंय... कारभारणी, आपले अखेरचे दिवस देव आपल्याला काही बरे दाखवणार नाही! काय ग? काय म्हणतेस?"

आजीने स्वतःला फरशीवर इवानशेजारी झोकून दिले होते. ती त्याचा चेहरा, त्याचे डोके, त्याची छाती चाचपून पहात होती; त्याच्या डोळ्यां-मध्ये फुंकरा घालीत होती; त्याचे हात उचलून चोळत होती. सगळ्या मेणबत्त्या तिने पाडल्या होत्या. सरतेशेवटी ती जडपणे उठून उभी राहिली. तिची काळी आकृती भव्य दिसत होती, तिचा काळा पोषाख चमकत होता. खालच्या आवाजात ती बोलली तेव्हा तिचे काळे डोळे विचित्रपणे गरागरा फिरले:

"चालते व्हा सारे इथून! पापी कुठले!"

आजोबांशिवाय सारेजण तिथून पसार झाले.

कसलाही गाजावाजा न होता, चुपचाप रीतीने त्सिगानोकला पुरण्यात आले.

४

एका रुंद बिछान्यावर मी पडलो होतो, अंगाभोवती जाडजूड दुलई गुंडाळली होती आणि माझ्या आजीची प्रार्थना मी ऐकत होतो. ती गुडघे टेकून बसली होती, तिचा एक हात तिने छातीवर दाबून धरला होता आणि दुसऱ्या हाताने सावकाशपणे अधूनमधून क्रूसाचे चिन्ह करीत होती.

खिडकीबाहेरची कोरड्या बर्फाची चुरचुर मला ऐकू येत होती. खिडकीच्या गोठलेल्या तावदानाच्या जाळीदार नक्षीमधून हिरवट चांदणे खोलीत झिरपत होते. त्या फॉस्फरसप्रमाणे चमकणाऱ्या प्रकाशात आजीच्या प्रेमळ चेहऱ्यावरील ठसठशीत नाक आणि तिचे काळे डोळे उजळून निघत होते. आजीच्या डोक्यावरचा रेशमी रुमाल धातूसारखा चकाकत होता. तिच्या अंगातला चुणीदार काळा पोषाख खांद्यापासून खाली फरशीवर तिच्या सभोवार ओघळला होता.

प्रार्थना संपल्यानंतर शांतपणे तिने कपडे उतरविले आणि कोपऱ्यातील

ट्रंकेवर व्यवस्थित घडी करून ठेवले. नंतर ती बिछान्यापाशी आली तेव्हा मी गाढ झोपल्याचे सोंग केले.

"ए डांबरट पोरा, उगीच ढोंग करू नको," ती हळूच म्हणाली. "तू अजून झोपलेला नाहीस, होय की नाही? चल, तुझं थोडं पांघरुण मला दे बघू!"

त्यानंतर पुढे काय घडणार हे माहीत असल्याने मला हसू आवरले नाही. मग ती ओरडली:

"अच्छा! म्हणजे तुझ्या आजीची गंमत करायचा तुझा इरादा आहे तर?"

तिने दुलईचे एक टोक धरून एवढ्या जोराने आणि अशा खुबीने खेचले की, मी हवेत उंच उडालो आणि गरगरत परत पिसांच्या मऊ बिछान्यावर कोसळलो. ती खो खो हसत सुटली.

"एका लबाड मुलाची कशी जिरली! तुला वाटलं पांघरुण सुटणार नाही?"

काहीवेळा मात्र ती इतका वेळ प्रार्थना करीत बसायची की, मला झोप लागायची आणि ती बिछान्यात केव्हा यायची ते मला समजायचे नाही.

ज्या दिवशी काहीतरी बिनसायचे, भांडणे आणि मारामाऱ्या व्हायच्या, त्या दिवशी रात्री आजीच्या प्रार्थना खूप वेळपर्यंत चालायच्या. काय काय घडले त्याचा तपशील आजी देवाला सांगायची ते ऐकणे मोठे गंमतीदार असायचे. डोंगरासारखा तिचा अवाढव्य देह गुडघे टेकून बसायचा आणि भरभर अस्पष्ट आवाजात प्रार्थना सुरू करता करता तिचा आवाज पुढे भरदार मोठा होत जायचा:

"देवा, तुला माहीतच आहे की, प्रत्येकाला स्वतःचं जास्त चांगलं व्हावं असं वाटत असतं. मिखाईल सर्वांत मोठा असल्यामुळं त्यानं इथं शहरात राहणं योग्यच आहे. नदीपलिकडं नव्या जागी त्याला पाठवणं बरोबर ठरणार नाही, कारण यापूर्वी तिथं कुणीच धंदा केलेला नाही, त्यामुळं कसं काय चालेल याचा कुणालाच अंदाज नाही. पण वडील याकोवला जवळ ठेवू बघतात. वडलांनी मुलांच्या प्रेमात भेदभाव ठेवणं चांगलं का? ते हट्टी आहेत आणि म्हातारे झालेत. देवा, त्यांना तू थोडी अक्कल दिलीस तर फार बरं होईल."

तिच्या देवाला ती सल्ला देऊ लागायची तेव्हा आपल्या टपोऱ्या, चकाकत्या डोळ्यांनी काळ्या पुतळ्यांकडे नजर टाकायची.

"देवा, त्यांना चांगलं स्वप्न पाड आणि मुलांना कशी वाटणी करून द्यायची ते दाखव."

ती क्रूसाचे चिन्ह करायची आणि तिच्या दाट भुवया गालिचाला टेके-पर्यंत ओणवी वाकायची. मग पुन्हा सरळ बसून खात्री पटवून देणाऱ्या आवाजात बोलू लागायची:

"आणि वार्वाराला थोडं सुख का देत नाहीस? तुझी अवकृपा घडावी असं तिनं काय केलंय बरं देवा? इतरांपेक्षा तिचं नशीब जास्त वाईट का? अशा तरण्याताठ्या, भक्कम बाईला अशा दुःखात का बरं रहायला लागावं? आणि ग्रिगोरींची जरा काळजी घे देवा— दर दिवसाला त्यांचे डोळे जास्त बिघडत चाललेत. जर ते आंधळे झाले तर पोटासाठी त्यांना भीक मागत फिरावं लागेल. ते बरं दिसेल का? त्यांनी आपली सगळी ताकद आजोबांच्या धंद्यात ओतली... पण म्हातारा त्यांना काही मदत करणार नाही... देवा... अरे लाडक्या देवा..."

मान खाली घालून हात लोंबते ठेवून जणू झोपी गेल्याप्रमाणे खूप वेळपर्यंत ती तशीच गप्प बसून राही.

"आणखी काय बरं?" सरतेशेवटी कपाळाला आठ्या घालून ती म्हणायची. "प्रामाणिक लोकांबर दया कर. आणि माझ्यासारख्या मूर्ख बाईला क्षमा कर. मी कशी आहे ते तुला ठाऊकच आहे. माझ्या मूर्ख मनामुळं माझ्याकडून पाप घडतं. माझं काळीज दुष्ट नाही."

मग एक दीर्घ उसासा टाकून अत्यंत खुषीने समाधानकारक आवाजात ती म्हणायची:

"पण देवा, तुला तर सारं काही माहीत असतं. तुला सारं काही समजतं पवित्र बापा!"

माझ्या आजीचा देव मला फार आवडायचा. तो तिच्या अगदी जवळचा आणि तिचा लाडका भासायचा. अनेकदा मी म्हणत असे:

"आजी, मला तुझ्या देवाबद्दल सांग."

देवाविषयी बोलताना तिची एक खास तऱ्हा होती. अशावेळी ती नेहमी खाली बसायची, डोळे मिटून घ्यायची आणि विचित्र रीतीने शब्द उच्चारीत

हळू आवाजात बोलायची. ती कसे शब्द उच्चारायची, कशी बसायची. डोक्यावर रुमाल कशी टाकायची आणि मला झोप लागेपर्यंत स्वतःच्या कल्पना लढवीत कशा गोष्टी सांगायची ते मला अजूनही आठवते.

"सभोवती स्वर्गातल्या कुरणांनी वेढलेल्या एका टेकडीवर देव बसतो. रूपेरी लिंबोणीच्या झाडांखाली इंद्रनील मण्यांच्या सिंहासनावर तो बसतो. ही लिंबोणीची झाडं सबंध वर्षभर फुललेली असतात, कारण स्वर्गात हिवाळा नाही किंवा शरदाचा मोसम नाही. त्यामुळं वर्षाचे बाराही महिने तिथं फुलं फुलतात आणि स्वर्गातल्या संतपुरुषांना आनंद देतात. आणि देवाभोवती देवदूतांचा प्रचंड थवा सारखा उडत असतो. हा थवा बर्फासारखा किंवा मधमाशांच्या थव्यासारखा दाट असतो, किंवा पांढऱ्या कबूतरांसारखा असतो. हे देवदूत स्वर्गातून पृथ्वीवर उड्डाण करतात आणि इथं खाली राहणाऱ्या आपल्यासारख्या माणसांबद्दल माहिती गोळा करून परत स्वर्गात जाऊन देवाला सांगतात. आपल्या प्रत्येकासाठी एकेक देवदूत आहे — तुझ्यासाठी, माझ्यासाठी, आजोबांसाठी! कारण देव सर्व प्राण्यांशी समभावानं वागतो. म्हणजे तुझा देवदूत देवाला जाऊन सांगतो: 'अलेक्सेयनं आपल्या आजोबांना जीभ वेडावून दाखवली.' तेव्हा मग देव आज्ञा करतो: 'तर आजोबांकडून त्याला मार द्यायला लावा!' असं प्रत्येकाच्या बाबतीत घडत असतं. प्रत्येकाला आपल्या कर्माप्रमाणं सुखाचं किंवा दुःखाचं फळ मिळतं. देवदूत आपले पंख फडफडवीत आनंदानं गात असतात, 'आकाशातल्या बापा, तुला आमचे नमन असो!' तेव्हा खूप छान वाटतं. देव नुसता हसून पहात राहतो. जणू तो म्हणत असतो: 'माझ्या लाडक्यांनो, तुम्हाला आवडतं तर खुशाल गाणी गा!'"

माझी आजी स्वतःशीच हसायची आणि मान डोलवायची.

"हे सारं तू पाहिलं आहेस?" मी विचारले.

"मी पाहिलेलं नाही, पण मला ठाऊक आहे," तंद्रीत तिने उत्तर दिले.

जेव्हा जेव्हा ती देव, स्वर्ग आणि देवदूत यांच्याबद्दल बोलायची तेव्हा तेव्हा ती लहान व नम्र बनायची. तिच्या चेहऱ्यावरचे वयाचे वण पुसून जायचे, तिच्या ओलसर डोळ्यांमधून एक प्रेमळ प्रकाश पाझरू लागायचा. तिच्या रेशमी जाडजूड वेण्या मी माझ्या गळ्याभोवती गुंडाळून स्तब्ध बसत

असे. तिच्या त्या कथांनी मी मोहून जायचा आणि कितीही गोष्टी ऐकल्या तरी माझे समाधान व्हायचे नाही.

"मर्त्य लोकांना देवाचा चेहरा पाहता येत नाही. त्यांनी तो पाहिला तर ते आंधळे होतील. फक्त संतपुरुष देवाला सताड उघड्या डोळ्यांनी पाहू शकतात. पण देवदूत मात्र मी पाहिलेत. तुमचं अंतःकरण शुद्ध होतं तेव्हा ते दृष्टीला पडतात. एकदा मी चर्चमध्ये प्रार्थनेसाठी उभी होते आणि तिथं वेदीवर मी त्यांना पाहिलं. धुक्यासारखे होते, त्यांच्या आरपार पाहू शकत होते. खूप तेजस्वी होते, त्यांचे नक्षीदार आणि जाळीदार पंख फरशी-पर्यंत लांब होते. सिंहासनाशी वावरत फादर इल्यांना ते मदत करत होते. आपले थकलेले हात प्रार्थनेसाठी त्यांनी वर उचलले म्हणजे देवदूत त्यांचे हाताचे कोपरे उचलून धरायचे. फादर इल्या एवढे म्हातारे आणि आंधळे होते की, सगळ्या गोष्टींवर ते आपटायचे. पुढं लौकरच ते वारले. त्या देवदूतांना पाहून मला एवढा आनंद झाला होता की मला जवळ जवळ चक्करच आली. माझं काळीज जवळ जवळ फुटायच्या बेतात होतं आणि डोळ्यांमधून घळघळ पाणी वहात होतं. काय आनंद होता म्हणून सांगू! अल्योशा, माझ्या कबूतरा, स्वर्गात देवापाशी सारं सारं किती सुंदर आहे रे! आणि इथं खाली पृथ्वीवरसुद्धा कित्ती सुरेख आहे सारं!"

"इथं आपल्या घरातसुद्धा?"

"होय, सगळीकडं! पवित्र मेरीमातेचा विजय असो!" क्रूसाचे चिन्ह करीत आजी उत्तरली.

मी बुचकळ्यात पडलो. आमच्या घरात दर दिवसागणिक संबंध ताणले जात होते अशा परिस्थितीत तिथे सारे काही छान होते, असे मान्य करणे फार कठीण होते.

एकदा मला आठवते की, मिखाईलमामाच्या खोलीवरून मी सहज जात असताना उघड्या दारामधून मला नताल्यामामी ओझरती दिसली होती. ती पांढरीफटक पडली होती आणि छातीवर हात दाबून खोलीभर पळत, रडत, भेदरलेल्या खालच्या सुरात म्हणत होती:

"देवा, मला इथून घेऊन जा. जाऊं दे मला इथून..."

मला तिची प्रार्थना समजली होती आणि ग्रिगोरी स्वतःशी पुटपुटत तेही मला समजले होते:

"लौकरच मी आंधळा झालो म्हणजे भीक मागायला जाईन आणि ते यापेक्षा बरं असेल!"

ते लौकर आंधळे व्हावे अशी मी आशा करीत होतो. म्हणजे मी त्यांचा वाटाड्या बनलो असतो आणि आमच्या भाकरीसाठी सबंध जगभर भीक मागत हिंडलो असतो. एकदा मी त्यांना माझ्या मनातले हे विचार बोलून दाखविले. ते दाढीतल्या दाढीत हसून म्हणाले:

"ठीक आहे, आपण बरोबर जाऊ. आणि सगळ्यांना ऐकू जाईल अशा आवाजात मी रस्त्यावर ओरडेन: 'रंगाच्या कारखान्याचे मालक वसीली कशीरिन यांचा हा नातू आहे हो ऽऽ!' म्हणजे खूप गंमत येईल की नाही?"

नताल्यामामीचे ओठ अनेकदा सुजलेले असत आणि तिच्या पिवळट चेहऱ्यावर काळे-निळे वण उठलेले असत, असे माझ्या ध्यानात आले होते.

"मामा तिला मारतो?" मी आजीला विचारले.

"गुपचूप मारतो. तळपट होवो मेल्याचं!" उसासा टाकीत ती म्हणाली. "तुझ्या आजोबांना ते आवडत नाही, म्हणून तो रात्रीचा ते काम करतो. तो अगदी दुष्ट आहे आणि तिला कणाच नाही."

मग ती स्वतःची गोष्ट सांगू लागे:

"पण आमच्या काळी मारायचे तसं आजकाल मारत नाहीत! एखादे-वेळी थोबाडात नाहीतर कानफटात मारली किंवा एक-दोन मिनिटं वेणी खेचून धरली तर काही विशेष नाही! पण आम्हाला तासन तास छळायचे! एकदा तुझ्या आजोबांनी ईस्टरच्या आठवड्याच्या पहिल्या दिवशी सकाळ-पासून सूर्यास्तापर्यंत मला बडवलं होतं. मारायचे – थांबून विश्रांती घ्यायचे – पुन्हा मारायला सुरवात करायचे! घोड्याच्या लगामानं किंवा हाती सापडेल त्या वस्तूनं मारायचे."

"कशाबद्दल?"

"आता कारण आठवत नाही. एकदा त्यांनी मला अर्धमेली होईपर्यंत मारहाण केली आणि पाच दिवसपर्यंत उपाशी ठेवलं. त्यावेळी मी कशीबशी वाचले त्यातून. नाहीतर पुन्हा..."

अशा गोष्टी ऐकून मी गारच पडलो. माझी आजी माझ्या आजोबांच्या दुप्पट आकाराची होती. तरीसुद्धा ते तिच्यावर अधिकार कसे गाजवायचे हे मला समजायचे नाही.

"तुझ्यापेक्षा आजोबा एवढे ताकदवान आहेत?"

"ताकदवान नाहीत, पण ते वयाने वडील आहेत. शिवाय ते माझा नवरा आहेत. देवानं त्यांच्या ताब्यात मला दिलंय आणि त्यांची मालकी सहन करायची आज्ञा केलीय."

पुतळयांवरची धूळ झटकून त्यांच्या चौकटी ती साफ करीत असे, तेव्हा पहायला मला खूप आवडे. आमच्या पुतळया मोठ्या कलाकुसरीने बनविलेल्या होत्या. मोती आणि मौल्यवान खडे बसवून तयार केल्या होत्या व चांदीत जडवल्या होत्या. ती कुशलपणे त्यांना हाताळायची.

"किती गोड चेहरा!" हाताचा क्रूस करून ती पुटपुटायची आणि पुतळयांचे चुंबन घ्यायची.

"सगळी धूळ आणि काजळी धरलीय! सर्वशक्तिमान देवाची माता अवर्णनीय आनंद प्रकट करतेय! अल्योशा, माझ्या कबूतरा, बघ हे चित्र किती सुरेख आहे पहा. किती छोटी छोटी बोटं, पण प्रत्येक बोट वेगळं वेगळं आहे. फ्योदोरोवस्कींची मेरीमाता मध्यभागी असलेलं हे चित्र 'बारा सण' म्हणून ओळखतात. किती सुंदर प्रेमळ बाई! आणि हे – 'हे माते, माझ्या थडग्याशी रडू नको...'"

काही वेळा तर मला असे भासायचे की, माझी गरीबडी मामेबहीण कातेरीना जशी आपल्या बाहुल्यांशी खेळत बसायची, तशी माझी आजी त्या पुतळयांशी रंगात येऊन खेळत रहायची.

अनेकदा तिला सैतान दिसत. तिला एकटादुकटा सैतान भेटे, त्याचप्रमाणे सैतानांच्या झुंडीही दिसत.

"लेन्टच्या उपवासाच्या दिवसात एकदा मी रूडॉल्फच्या घरावरून रात्रीची चालले होते. सगळीकडं चकचकीत चांदणं पडलं होतं. अचानक मला धुरांड्यापाशी एक काळी आकृती धडपडताना दिसली. भलीमोठी केसाळ आकृती होती ती आणि तिची शिंगं धुरांड्यात वाकली होती. नाकानं घुर्रर्र घुर्रर्र असा मोठमोठ्यानं आवाज करीत होती आणि छपरावर जोरजोरानं शेपटी आपटत होती. तिच्या मोठ्या पावलांचा सळसळ आवाज स्पष्ट ऐकू येत होता. मी क्रूसाचं चिन्ह करून म्हणाले: 'ख्रिस्त देवाच्या शत्रूंचा नायनाट करायला उठून उभा राहील!' एकदम त्या आकृतीनं बारीक किंचाळी

फोडली आणि अंगणात उडी मारली. तो सैतान खलास झाला होता! शक्यता आहे की, रूडॉल्फ मंडळी काहीतरी उपवासाचे पदार्थ शिजवीत असावीत आणि तो वासानं तिथं आला..."

सैतानाने छपरावरून अंगणात कोलांटी उडी कशी मारली असेल ह्या विचाराने मला हसू आले आणि आजीही माझ्याबरोबर हसण्यात सामील झाली.

"लहान मुलांसारखं खोड्या करायला सैतानांनाही आवडतं! एका रात्री मध्यरात्रीपर्यंत मी न्हाणीघरात धूत होते. एकदम चुलाण्याचं दार थाडदिशी सताड उघडलं आणि ते बाहेर आले! अगदी छोटे छोटे! तांबडे, हिरवे, काळे–झुरळांसारखे! मी दाराकडं धावायचा प्रयत्न केला, पण ते मला जाऊ देईनात. त्या न्हाणीघरभर लाखो सैतानांबरोबर मी अडकून पडले होते. माझ्या पायांखाली, पायांवर ते फिरत होते, चिमटे घेत होते, चावत होते, नांग्या मारत होते. काही केल्या त्यांना घालवून देण्यासाठी मला क्रूसाची खूण करता येईना. छोट्या मांजराच्या पिल्लांसारखे ते मऊ, उबदार आणि केसाळ होते. आपल्या मागच्या पायांवर उभे रहायचे, धपा-धपा पडायचे, उंदरासारखे बारीक दात विचकायचे. त्यांचे बारीक हिरवे डोळे चमकायचे, शिंगांची डोकी हलवायचे, डुकरासारख्या बारक्या शेपट्या वळवळून दाखवायचे... अरे देवा, काय भयंकर प्रसंग माझ्यावर ओढवला होता! मी बेशुद्ध पडले. आणि जेव्हा शुद्धीवर आले तेव्हा मेणबत्ती जवळ जवळ जळून गेली होती, कपडे धुवायचं पाणी सगळं गार पडलं होतं आणि धुण्याचे कपडे न्हाणीघराच्या फरशीवर अस्ताव्यस्त पडले होते. मनात म्हटलं, 'मेल्या सैतानांनो, तुमचं प्लेगनं निःसंतान होवो!'"

मी डोळे मिटले आणि माझ्या नजरेसमोर चुलाण्याचे राखाडी दगडी दार उघडलेले दिसू लागले. त्या दारातून न्हाणीघरामध्ये भुतांचा लोंढा बाहेर पडत होता, ती भुतें मेणबत्तीवर फुंकर घालीत होती आणि त्यांच्या लालभडक जीभा बाहेर वळवळत होत्या. ते दृश्य मोठे मजेदार होते आणि भयानकही होते. माझ्या आजीने डोके हलविले आणि मिनिटभर ती गप्प बसली. पण पुन्हा तिच्या कल्पनेला पंख फुटले:

"शापाची बाधा झालेली माणसंही मी पाहिलीत. त्यावेळीही हिवाळ्याची रात्र होती. बर्फाचं वादळ घोंघावत होतं. मी द्युकोव ओहोळ ओलांडत होते.

याकोव आणि मिखायलो तुझ्या वडलांना तिथं तळयाच्या बर्फाच्या भोकात बुडवून ठार मारू बघत होते, असं मी तुला सांगितलेलं आठवतं? तर तीच ही जागा होती. मी रस्त्यावरून त्या ओहळाच्या पायथ्याशी पोचले न पोचले तोच एकदम कर्कश्य शिटचा वाजल्या आणि खरखर ओरबाडल्यासारखा आवाज मी ऐकला! मान उचलून वर पाहते तो काळया घोडयांची एक त्रोयका * बेफामपणं माझ्या अंगावर चालून येत होती. गाडीवानाच्या जागी टोकदार लाल टोपी घातलेला गोल अंगाचा छोटा सैतान होता, बैठकीवर तो दोन्ही हात पसरून उभा होता आणि घोडयांना लगामाऐवजी त्यानं साखळया बांधल्या होत्या. घोडयांना जेव्हा नाला ओलांडता येईना तेव्हा बर्फाच्या ढगात ते सरळ तळयाकडं निघाले. घसरगाडीतसुद्धा सैतान बसले होते. शिटचा काय वाजवत होते, ओरडत काय होते, टोप्या काय उडवत होते! आगीच्या बंबांसारख्या सात त्रोयका एकीपाठोपाठ एक माझ्या अंगावरून भरवेगानं गेल्या. त्या सगळींचे घोडे एकजात काळे कुळकुळीत होते आणि त्यात बसलेली सगळी माणसं आपल्या आई-बापांचे शाप बाधलेली होती. अशा माणसांना छळायला सैतानाला फार आवडतं. मौज करण्यासाठी म्हणून सैतान त्या लोकांना रात्रीचं बाहेर काढतात आणि त्रोयकांमध्ये घालून बेफाम घोडे पिटाळतात. मला वाटतं त्या रात्री मी सैतानाच्या लग्नाची मिरवणूक पाहिली..."

आजी एवढया साधेपणाने आणि खात्रीने बोलायची, की तिच्यावर विश्वास न ठेवणे अवघड जायचे.

पण सर्वांत सुरेख ती पवित्र मेरी मातेची कवने गायची. "दरोडेखोरांची राणी" येन्गालीचेवा हिने रशियन लोकांना लुटू नये आणि झोडपू नये म्हणून तिचे मन वळविण्यासाठी मेरी माता या जगामधून काटयांची वाट तुडवीत कशी गेली, याबद्दलची कहाणी सांगणारी कवने आजी फार छान म्हणायची. तसेच ईश्वराचा प्रेषित अलेक्सेय, महान योद्धा इवान यांच्याविषयीची कवने गायची. शहाण्या वसिलीसाच्या, बोकड धर्मगुरूच्या आणि देवस्वरूप धर्मपुत्राच्या गोष्टी सांगायची. पोसादनित्सा मार्फा, दरोडेखोरांचा नायक बाबा

---

*तीन घोडे जुंपलेली बर्फावरून जाणारी रशियन धाटणीची घसरगाडी. **—अनु.**

ऊस्त्या, ईजिप्तची पापी मरीया, यांच्याविषयीच्या भयंकर दंतकथा सांगी. दरोडेखोराच्या आईच्या दुःखाची कहाणी सांगी. तिच्यापाशी गोष्टींचा, दंतकथांचा आणि कवनांचा अफाट साठा होता.

माणसांची तिला भीती वाटत नसे. एवढेच काय पण माझ्या आजोबांची किंवा सैतानांची, किंवा इतर कुठल्याही भूत-पिशाच्चांची तिला भीती वाटत नसे. पण झुरळांना मात्र ती विलक्षण घाबरायची आणि अगदी लांबूनच त्यांचे अस्तित्व तिला जाणवायचे. काहीवेळा अगदी मध्यरात्री ती मला जागे करायची आणि हळूच म्हणायची :

"अल्योशा लाडक्या, तिथं एक झुरळ फिरतंय. ख्रिस्ताच्या भल्यासाठी त्याला ठार मार बघू!"

मी अर्धवट जागा व्हायचा, मेणबत्ती पेटवायचा आणि हाता-पायांवर रांगतच शत्रूच्या शोधावर निघायचा. पण नेहमीच माझे प्रयत्न फळाला येत नसत.

"इथं मुळीच नाहीत," मी म्हणायचा. पण डोक्यावर दुलई पांघरून ती निपचित पडलेल्या अवस्थेत 'ओय्' असा आवाज काढायची.

"ओय्! आहे, आहे तिथं! तुझ्या पाया पडते, त्याला शोधून काढ! मला ठाऊक आहे, ते आहे तिथं!"

आणि नेहमी ती बरोबर ठरायची. बहुतेक करून बिछान्यापासून दूर कुठेतरी मला झुरळ सापडायचे.

"मारलंस त्याला? ईश्वरा, तुझी थोरवी महान! शहाणा रे तू माझा बाळ," डोक्यावरून दुलई उडवून देत ती हसून म्हणायची.

पण मला जर झुरळ सापडले नाही तर रात्रभर तिला नीट झोप यायची नाही. अशा वेळी रात्रीच्या शांततेत जराशी सळसळ झाली तरी तिचे अंग थरथर कापत असलेले मला जाणवायचे आणि श्वास रोखल्या अवस्थेत ती पुटपुटायची :

"आता ते दारापाशी आहे... आता ट्रंकेखाली गेलं..."

"तुला झुरळांची एवढी भीती का वाटते?" मी विचारायचा.

"काय उपयोग आहे त्यांचा?" ती शहाण्या माणसासारखी उत्तर द्यायची. "नुसती सरपटत राहतात! काळे सैतान कुठली! देवानं प्रत्येक प्राण्याला काही ना काही उद्देश दिलाय — कोळी दाखवतो की, घराला ओल

आलीय ; ढेकूण सांगतात की भिंती घाण झाल्यात ; ऊ सापडली म्हणजे तुम्ही आजारी पडणार ! हे सारं स्पष्ट समजतं ! पण झुरळांच्या बाबतीत काहीच समजत नाही. मग त्यांना जगायचा काय अधिकार ?"

एकदा ती अशीच गुडघ्यांवर बसून देवाशी गप्पा मारण्यात दंग झाली असताना आजोबा धाडकन दार उघडून आत आले आणि घोगऱ्या आवाजात ओरडले :

"अहो, तुमचा देव भेटीला आलाय ! वर्कशॉपला आग लागलीय !"

"काय ?" धडपडत उठून उभे राहण्याचा प्रयत्न करीत आजी किंचाळली. अंधारातच दोघे मोठ्या दिवाणखान्याकडे धावली.

"येवगेन्या, पुतळ्या बरोबर घे ! नताल्या, मुलांना कपडे घाल !" खंबीर, मोठ्या आवाजात आजीने हुकूम सोडले.

"अरे अरे ऽ अरे ऽऽ !" आजोबा विव्हळले.

मी स्वैपाकघरात पळत गेलो. खिडकीमधून अंगण सोन्यासारखे चकाकत होते. फरशीवर सोन्याचे पट्टे धडपडत होते, सरकत होते. याकोवमामाने अनवाणी पायांवरच बूट चढवले आणि जणू टाचा भाजत असल्याप्रमाणे जागच्या जागी उड्या मारीत तो ओरडू लागला :

"अस्सं ! ही आग मिखाईलनं लावली तर ! आग लावली आणि बेटा पळून गेला !"

"श्शूः, तू चूप बैस मेल्या !" आजीने त्याला एवढ्या जोराने दाराबाहेर ढकलले की, तो जवळ जवळ कोलमडला.

खिडकीच्या गोठलेल्या तावदानामधून वर्कशॉपचे पेटलेले छप्पर मला दिसत होते. उघड्या दारामधून ज्वाळा भडकत होत्या. निवांत रात्रीच्या वातावरणात आगीची लाल फुले धुराविना फुलत होती. फक्त उंच हवेत धुराचा ढग घोटाळत होता. पण आकाशगंगेचा रूपेरी पट्टा मात्र त्याच्यामुळे झाकला गेला नव्हता. ज्वालांमुळे बर्फ लालभडक चकाकत होते. वर्कशॉपमध्ये आग धडाडून पेटली होती आणि त्याच्या फटींमधून आगीच्या लवलवत्या जिभा बाहेर झेपावत होत्या. निमुळती मातीची चिमणी जेथे बसविली होती त्या ठिकाणी छपरावर कोरड्या फळ्या ठोकलेल्या होत्या. आगीच्या लालसोनेरी फिती चटकन छतापर्यंत पोहोचल्या होत्या आणि चिमणीतून धुराची

बारीक रेषा हवेत उमटत होती. खिडकीच्या तावदानावर हळूच कडकड आवाज होत होता, रेशमी सळसळ ऐकू येत होती. आग वाढली आणि चर्चमधील प्रकाशमान पुतळ्यांप्रमाणे तिने वर्कशॉपचे रूप उजळून टाकले. पाहणारा मंत्रमुग्ध होत होता.

एक जाडजूड मेंढकातडी कोट मी डोक्यावर टाकला, कुणाचेतरी बूट पायात चढवले आणि व्हरांड्यातून धडपडत बाहेर पोर्चमध्ये जाऊन उभा राहिलो. आगीच्या तेजापुढे मी मुग्ध झालो. आगीचा धडाका आणि आजोबा, मामा, ग्रिगोरी यांच्या आरोळ्या, यामुळे कानांचे पडदे बधीर झाले होते. आजीचे वागणे पाहून मी घाबरलो होतो. तिने डोक्यावर रिकामे पोते धरले, घोड्याच्या ब्लँकेटात अंग गुंडाळले आणि पेटलेल्या वर्कशॉपकडे धावत जात ती ओरडली:

"अरे मूर्खांनो, गंधकाम्ल काढा! त्याचे स्फोट होतील!"

"ग्रिगोरी, तिला अडव!" आजोबा ओरडले. "अरे ती खलास होईल!"

पण तोवर आजी परतसुद्धा आली होती. तिच्या ब्लँकेटातून धूर येत होता, तिने डोक्यावर गंधकाम्लाचा बरणा उचलून आणला होता.

"अहो, घोडं बाहेर काढा!" खोकत खोकत घोगऱ्या आवाजात ती ओरडली. "माझ्या अंगावरून हे ब्लँकेट लौकर काढा. मी पेटलेय ते दिसत नाही का?"

धुमसणारे ब्लँकेट ग्रिगोरींनी तिच्या खांद्यांवरून खस्सदिशी ओढून काढले. मग फावडे उचलून ते खाली वाकले आणि बर्फाची मोठी ढेकळे वर्कशॉपच्या दारावर मारू लागले. मामा हातात कुऱ्हाड घेऊन भोवताली उड्या मारीत होता. आजोबा आजीच्या मागे धावत तिच्या अंगावर बर्फ टाकीत होते. तिने बरणा बर्फाच्या ढिगामध्ये पुरला आणि फाटक उघडायला ती धावली.

"शेजाऱ्यांनो, धान्याचं कोठार वाचवा!" धावत येणाऱ्या लोकांपुढे नम्रपणे वाकून ती ओरडली. "आग कोठारापर्यंत आणि गवताच्या गंजींपर्यंत पसरली तर आमचं सारं घर पेटेल आणि तुमच्या घरापर्यंत आग भडकेल. छप्पर तोडा आणि गंजी बागेत फेका. ग्रिगोरी, बर्फ उंचावर मारा. जमिनीवर मारून काय उपयोग? याकोव, तुझी निष्कारण पळापळ पुरे

झाली. लोकांना फावडी आणि कुऱ्हाडी दे. भल्या माणसांनो, जुटीनं काम करा. देव आपल्या पाठीशी आहे!"

आगीप्रमाणेच आजीही मोहक दिसत होती. आगीच्या ज्वालांनी ती उजळून निघाली होती. त्या ज्वाला जणू तिच्यावर प्रहार करणार असे भासत होते. सबंध आवारभर तिची काळी आकृती वेगाने फिरत होती. एकाचवेळी ती सर्व ठिकाणी होती, सर्वत्र लक्ष ठेवून होती आणि प्रत्येकाला सूचना देत होती.

शाराप धावत अंगणात आला आणि मागल्या पायांवर उभा राहिला. आजोबा तोल जाऊन खाली पडले. घोड्याचे गरगर फिरणारे डोळे आगीच्या उजेडात लालबुंद चमकत होते. तो फुरफुरत होता, थयथय नाचत होता, बिचकत होता. आजोबांना तो आवरेनासा झाला. शेवटी लगाम सोडून देत ते आजीला म्हणाले:

"त्याला धर ग!"

दोन पायांवर झेपावणाऱ्या घोड्यासमोर ती हात पसरून ताठ उभी राहिली. घोडा खिंकाळला आणि एकदम चारी पायांवर उभे रहात आगीकडे कटाक्ष टाकू लागला.

"घाबरू नको," घोड्याच्या मानेवर प्रेमाने थोपटत आजी भरदार आवाजात म्हणाली आणि तिने लगाम हाती धरले. "अशा धोक्याच्या वेळी मी तुला सोडून जाईन का? वेडा पिटुकला उंदीर कुठला!"

तिच्यापेक्षा आकाराने तिप्पट असलेला तिचा तो 'पिटुकला उंदीर' तिच्या मागोमाग आज्ञाधारकपणे फाटकाबाहेर गेला. तिच्या तांबड्यालाल चेहऱ्याकडे बघत तो खिंकाळत होता.

येवगेन्याने सर्व मुलांना कपड्यांमध्ये गुंडाळून बाहेर आणले. मुले बडबड करीत होती.

"वसीली वसिल्येविच, मला अलेक्सेय सापडत नाही!" ती ओरडली.

"बाहेर पड! बाहेर पड!" आजोबा उत्तरले. येवगेन्याने मला तेथून लांब घेऊन जाऊ नये म्हणून मी पोर्चच्या पायऱ्यांखाली दडलो.

वर्कशॉपच्या छपराला मोठे भगदाड पडले. धुराचा लोट उसळला. पेटलेले वासे आकाशाच्या पार्श्वभूमीवर चमकू लागले. वर्कशॉपच्या आतमधून तांबड्या, हिरव्या, निळ्या ज्वालांचे स्फोट अंगणापर्यंत चाटत आले. ही

प्रचंड शेकोटी बर्फाने विझवण्याचा प्रयत्न करणारी अंगणातील माणसे मागे सरली. बरण्यांमधील द्रव खदखदून उकळत होते. धुरांचे आणि वाफांचे दाट लोट त्यांच्यामधून उमटत होते. आवारात विचित्र वास पसरला होता आणि सर्वांचे डोळे चुरचुरुन त्यातून पाणी वहात होते. मी पायऱ्यांखालून बाहेर आलो आणि आजीच्या पायांशी उभा राहिलो.

"लांब पळ!" ती ओरडली. "चिरडशील! पळ इथून!"

तुरेदार धातूचे शिरस्त्राण घातलेला एक घोडेस्वार जोरात अंगणात घुसला. त्याच्या तांबूस घोड्याच्या तोंडाला फेस आला होता. हातातील चाबूक वर उचलीत तो घोडेस्वार धमकावणीच्या सुरात ओरडला:

"रस्ता द्या!"

छोट्या घंटा मजेने वाजत होत्या. सारे काही छान उत्सवासारखे वाटत होते. एवढ्यात आजीने मला पोर्चामध्ये ढकलले.

"ऐकलं नाहीस मला? इथून चालता हो म्हणून सांगितलं ना मी तुला?"

त्या क्षणाला तिचे न ऐकणे अशक्य होते. मी स्वैपाकघरात गेलो आणि खिडकीशी पुन्हा पूर्वीची जागा घेतली. पण लोकांच्या जमावामुळे मला आगीचे दृश्य नीट दिसत नव्हते. फक्त काळपट हिवाळी टोप्यांच्या गर्दीत काही पोलादी शिरस्त्राणे तेवढी मधून मधून चमकताना दिसत होती.

आगीला झोडपून आणि तिच्यावर पाणी ओतून तिला विझविण्यात आले. पोलिसांनी लोकांना दूर हटविले आणि सरतेशेवटी आजी स्वैपाकघरात आली.

"कोण आहे? तू झोपला नाहीस? घाबरलास? घाबरू नकोस. सारं संपलंय आता!"

ती माझ्या शेजारी बसली व एकही शब्द न बोलता मागेपुढे डोलू लागली. पुन्हा एकदा शांत रात्र आणि काळोख झाल्यामुळे प्रसन्न वाटत होते. पण आग नाहीशी झाली म्हणून त्याचवेळी मला वाईटही वाटत होते.

आजोबा दारात येऊन उभे राहिले.

"कारभारणी?"

"काय?"

"भाजलं काय?"

"फारसं नाही."

त्यांनी गंधकाची काडी ओढली आणि निळ्या ज्योतीने त्यांचा काजळमाखला काळा खारीसारखा चेहरा उजळला. टेबलावरची मेणबत्ती त्यांनी पेटवली आणि आजीशेजारी फतकल घालून ते बसले.

"तुम्ही आंघोळ करा," ती त्यांना म्हणाली. तीसुद्धा काजळीने माखून निघाली होती आणि तिच्या अंगाला धुराचा वास येत होता.

"काहीवेळा देव अशी दया दाखवतो," निश्वास टाकीत आजोबा म्हणाले. "एकदम ताळ्यावर आणायला झटके देतो."

आजीच्या खांद्यावर थोपटत ते पुढे हसून म्हणाले:

"काही थोडी मिनिटंच, थोड्या वेळापुरते झटके देतो. पण चांगले सणसणीत देतो!"

आजीही हसली. ती काहीतरी बोलण्याच्या बेतात होती, पण आजोबा कपाळाला आठ्या घालीत मध्येच म्हणाले:

"त्या ग्रिगोरीची ब्याद घालवली पाहिजे. हे सगळं त्याच्या हलगर्जीपणापायी घडलं. तो बाप्या आता पुरता निकामी झालाय. बाहेर व्हरांड्यात याकोव रडत बसलाय. वेडा कुठला! त्याची जाऊन जरा समजूत घाल..."

ती उठून बाहेर गेली. एक हात वर धरून ती बोटांवर फुंकरी घालीत होती.

"अगदी सुरवातीपासून सगळं पाहिलंस?" माझ्याकडे न बघताच आजोबांनी विचारले. "काय वाटतं तुला तुझ्या आजीबद्दल? आँ? ती म्हातारी झालीय हे विसरू नको... चेपलीय, मोडलीय... तुझ्यासाठी तिला काही वाटतं! बाकीच्यांकडं ती ढुंकून बघत नाही – छ्या: ऽ!"

ते खाली वाकले आणि थोडा वेळ काहीच बोलले नाही. मग उठून त्यांनी मेणबत्तीच्या जळलेल्या वातीचा तुकडा मोडला आणि विचारले:

"घाबरला होतास?"

"नाही."

"छान. त्यात घाबरण्यासारखं काही नव्हतं."

त्रासल्यासारखे करीत त्यांनी अंगातून सदरा काढला आणि कोपऱ्यातल्या नळाकडे ते गेले.

"आग लागणं मूर्खपणाचं आहे!" पाय आपटीत मोठ्या आवाजात ते म्हणाले. "ज्याच्याकडं आग लागेल त्याला मूर्ख किंवा चोर ठरवून भर

चौकात झोडपून काढण्यात यावं! अशा लोकांशी असं वागलं म्हणजे कधी आगी लागायच्या नाहीत! .. जा, जाऊन झोप! इथं कशाला बसून राहिलायस?"

मी बिछान्यावर जाऊन पडलो, पण त्या रात्री पुन्हा मला झोप लागली नाही. मी पांघरुणात शिरत होतो न होतो तेवढ्यात एका अमानुष किंचाळीने विजेचा झटका बसल्याप्रमाणे ताडकन उठलो. पुन्हा एकदा पळत स्वैपाक्-घरात गेलो. खोलीच्या मध्यभागी हातात मेणबत्ती धरून आजोबा सदऱ्या-विना उभे होते. मेणबत्ती थरथरत होती. त्यांच्या पायांची चाळवाचाळव चालली होती, पण ते जागचे मात्र हलत नव्हते.

"अरे काय झालं रे?" धसकल्या आवाजात त्यांनी विचारले.

मी चुलाण्यावर उडी मारली आणि कोपऱ्यात अंग चोरून बसलो. आग लागली होती त्यावेळी घरभर जसा गोंधळ उडाला होता, तसाच गोंधळ पुन्हा एकदा झाला. भिंतींवर आणि छतावर किंचाळ्यांचे आवाज एका तालासुरात आपटत होते. किंकाळ्या जास्त मोठ्याने आणि सारख्या ऐकू येऊ लागल्या होत्या. आजोबा आणि याकोवमामा वेड्यासारखे धावपळ करीत होते, आजी ओरडत होती, चुलाण्यात लाकडे खुपसताना ग्रिगोरी मोठमोठ्याने आवाज करीत होते. त्यांनी पाण्याचे काही बंब भरले आणि अस्त्राखानच्या उंटाप्रमाणे मान हलवीत येरझाऱ्या घालू लागले.

"पहिल्यांदा आग पेटवा!" आजीने हुकूम दिला.

लाकडे पेटविण्यासाठी ग्रिगोरी चुलाण्यावर चढले. त्यांचा माझ्या पायाला स्पर्श झाला तेव्हा घाबरून ते ओरडले:

"कोण आहे? हात्तिच्या, काय घाबरवलंस रे मला! नेहमी नको तिथं तू तडमडत असतोस!"

"काय होतंय?"

"तुझी नताल्यामामी बाळंत होतेय," चुलाण्यावरून खाली उडी मारीत ते शांतपणे म्हणाले.

माझी आई बाळंत झाली होती तेव्हा अशी ओरडत नव्हती, याची मला आठवण झाली.

ग्रिगोरींनी पाण्याचे बंब चुलाण्यावर चढविले आणि नंतर वर चढून ते माझ्यापाशी येऊन बसले. आपल्या खिशातून त्यांनी चिलीम काढली.

"डोळे बरे व्हावेत म्हणून तंबाखू ओढायला सुरुवात केलीय," चिलीम दाखवीत ते मला म्हणाले. "तुझी आजी मला तपकीर ओढायला सांगत होती. पण त्यापेक्षा तंबाखू ओढणं चांगलं असा मी विचार केला."

मेणबत्तीच्या अपुऱ्या प्रकाशाकडे टक लावून पहात चुलाण्याच्या कडेशी ते पाय हलवीत बसले. त्यांच्या कानावर आणि गालावर काजळी लागली होती, त्यांचा सदरा फाटला होता. त्यातून कड्यांप्रमाणे त्यांच्या बरगड्या बाहेर आलेल्या मला ओझरत्या दिसल्या. त्यांच्या काळ्या चष्म्याची एक काच तडकली होती व मोठा काचेचा तुकडा पडला होता. त्या रिकाम्या जागेतून त्यांचा ओलसर लाल डोळा अर्धवट दिसत होता.

चिलमीत त्यांनी पत्ती तंबाखू ठासून भरली आणि बाळंतिणीचे विव्हळणे ऐकत एखाद्या दारुड्याप्रमाणे ते स्वत:शीच बड्बडू लागले.

"तुझ्या आजीला भाजलेलं दिसतंय. आता ती सुईणपण कसं करणार? तुझी मामी कशी ओरडतेय ऐकलंस? सगळे तिला विसरूनच गेले होते. आग भडकली तेव्हाच तिनं कण्हायला सुरुवात केली होती... घाबरली होती... एखादा नवा जीव या जगात आणणं किती अवघड आहे बघ. पण तरीसुद्धा कुणीही बाईला किंमत देत नाही. खरं म्हणजे बाईचा – आईचा – आदर केला पाहिजे. तू ही गोष्ट कधीही विसरू नको!"

मला डुलकी लागली होती. पण दारांच्या आदळआपटीने, मिखाईल-मामाच्या दारुड्या ओरड्यामुळे आणि घरातील एकूण कोलाहलामुळे मला जाग आली. वेगळेच शब्द मी ऐकत होतो:

"राजद्वारं* सताड उघडी झालीत..."

"रम आणि काजळी घालून तिला थोडं दिव्याचं तेल द्या. अर्धा ग्लास तेल, अर्धा ग्लास रम आणि चमचाभर काजळी..."

"मला तिला बघू दे," मिखाईलमामाने सारखा लकडा लावला होता. तंगड्या पसरून तो त्यांच्या मधल्या जागेत थुंकत फरशीवर फतकल

---

*रशियन जुन्या समजुतीनुसार, अवघड प्रसूतीमधून सुटका होण्यासाठी चर्चमधील वेदीकडे जाणारी राजद्वारे उघडणे आवश्यक मानले जात असे.– **अनु.**

मारून बसला होता, हातांनी फरशी बडवीत होता. चुलाण्यावर फारच गरम होऊ लागले म्हणून मी खाली उतरलो. पण मी मामापाशी पोचलो तेव्हा त्याने माझ्या पायाला धरून एवढ्या जोरात खेचले की, मी तोल जाऊन खाली पडलो आणि माझे डोके फरशीवर आपटले.

"मूर्ख!" मी ओरडलो.

चटकन उडी मारून तो उठला आणि मला हवेत उचलून धरीत तो गरजला.

"या चुलाण्यावर आपटून चुरा करीन तुझा!"

मी शुद्धीवर आलो तेव्हा दिवाणखान्यात आजोबांच्या मांडीवर निजलेला आढळलो. पुतळ्या होत्या त्या कोपऱ्यात बसून ते मला मागे पुढे डोलवीत होते, त्यांचे डोळे छताकडे रोखून पहात होते आणि ते पुटपुटत होते :

"आम्हा कुणालाही याची क्षमा घडणार नाही, आमच्यापैकी कुणालाही..."

त्यांच्या डोक्यावर पुतळ्यांसमोरचा दिवा ढणढणा पेटत होता आणि खोलीच्या मध्यभागी टेबलावर मेणबत्तीही जळत होती. खिडकीमधून हिवाळ्यातील सकाळचा धूसर प्रकाश येत होता.

"कायं दुखतंय?" माझ्यावर वाकून आजोबांनी विचारले.

सारं अंग दुखत होते. माझे डोके ओले झाले होते, अंग शिसासारखे जड झाले होते. पण त्याबद्दल बोलण्याची माझी इच्छा नव्हती. खोलीमधील खुर्च्यांवर अपरिचित माणसे बसली होती. जांभळ्या झग्यातले एक धर्मगुरु होते, चष्मा लावलेले लष्करी गणवेषातील एक म्हातारे गृहस्थ होते, आणि खूप माणसे होती. सारेजण स्तब्ध, लाकडी पुतळ्यांप्रमाणे गोठून बसले होते आणि कुठेतरी जवळच ऐकू येणाऱ्या पाण्याच्या सपकाऱ्यांचा आवाज मोठ्या आतुरतेने ऐकत होते. पाठीशी हात धरून याकोवमामा दारामध्ये ताठ उभा होता.

"याकोव, याला बिछान्यावर नेऊन निजव," आजोबा म्हणाले.

मामाने हाताने मला येण्याची खूण केली आणि आम्ही दोघे हलक्या पावलांनी आजीच्या खोलीत गेलो. मी बिछान्यात शिरल्यानंतर तो हळूच म्हणाला :

"तुझी नताल्यामामी वारली..."

मला त्या बातमीचे आश्चर्य वाटले नाही. कारण गेले काही दिवस ती घरात वावरताना दिसली नव्हती, स्वैपाकघरात आली नव्हती किंवा जेवणासाठी टेबलाशीही आली नव्हती.

"आजी कुठाय?"

"तिथं आहे," हाताच्या हालचालीनेच त्याने उत्तर दिले. तो आला होता तसाच अनवाणी पायांनी हलकी पावले टाकीत बाहेर गेला.

अस्वस्थपणे सभोवार पहात मी तेथे बिछान्यात पडून होतो. खिडकीच्या तावदानाला आंधळे, पांढऱ्या केसांचे चेहरे चिकटलेले दिसत होते. कोपऱ्यात ट्रंकेवर माझ्या आजीचा पोषाख टांगलेला होता हे मला ठाऊक होते, पण आता तो पोषाख मला एखाद्या जिवंत प्राण्यासारखा वाटत होता. एक डोळा दारावर रोखून मी उशीत डोके खुपसले. उडी मारून तेथून पळून जावेसे वाटत होते. खोलीत गरम होत होते आणि घरभर एक घुसमटवून टाकणारा वास सुटला होता. त्सिगानोक कसा मेला होता आणि दाराशी त्याच्या रक्ताचे थारोळे कसे जमले होते, याची त्या वासामुळे मला आठवण होत होती. माझे डोके किंवा कदाचित माझे काळीज मोठे होत असल्याचा मला भास झाला. हिवाळ्यातील वादळी रस्त्यावरून घसरगाडीतून फरपटत, दाबत जावे त्याप्रमाणे त्या घरात मी पाहिलेल्या सर्व गोष्टी माझ्या मनामधून खेचत फरपटत चालल्या होत्या...

हळूच खोलीचे दार उघडले गेले आणि माझी आजी आत आली. खांद्यानेच दार ढकलून ती त्याला टेकून काही वेळ उभी राहिली. पुतळ्यांसमोरील दिव्याच्या निळ्या ज्योतीकडे तिचे हात पसरलेले होते.

"अगं आई गं... काय हात ठणकताहेत..." शोकपूर्ण बालिश आवाजात ती हळूच उद्गारली.

## ५

त्या वसंतामध्ये इस्टेटीची वाटणी करण्यात आली. याकोव शहरात राहिला, मिखाईल नदीपलिकडे गेला. आजोबांनी पोलेवाया रस्त्यावर एक छान नवे घर विकत घेतले. त्या घराच्या पहिल्या मजल्यावर दारूचे दुकान

होते, अगदी वरच्या मजल्यावर एक छोटी आरामशीर खोली होती, समोर बाग होती व बागेपलिकडे वाळुंजीच्या झुडपांची दरी पसरली होती.

बागेची पहाणी करायला नरम, बर्फ वितळणाऱ्या वाटांवरून आम्ही चालत होतो तेव्हा डोळा मिचकावीत आजोबा गंमतीने मला म्हणाले: "चिक्कार छडया आहेत इथं! आता लौकरच मी तुला मुळाक्षरं शिकवायला सुरवात करणार आहे. तेव्हा या छडया खूप उपयोगाला येतील."

ते सबंध घर भाडेकरूंनी गजबजलेले होते. स्वत:साठी आणि आल्या-गेल्या पाहुण्यांसाठी म्हणून आजोबांनी वरच्या मजल्यावर एक मोठी खोली ठेवली होती, तर माझा आणि आजीचा मुक्काम पोटमाळ्यावरच्या खोलीत होता. आमच्या खोलीची खिडकी रस्त्याच्या दिशेला होती. त्या खिडकीतून वाकून पाहिले म्हणजे संध्याकाळच्या वेळांना किंवा सणावारी दारूच्या दुकाना-मधून झिंगून बाहेर पडणारी माणसे मला बघायला मिळायची. ती माणसे रस्त्यावरून लटपटत, ओरडत जायची, गटारात लोळायची. काहीवेळा त्यांना पिठाच्या पोत्याप्रमाणे दारूच्या दुकानामधून रस्त्यावर फेकून देण्यात येत असे. पण ती माणसे पुन्हा रांगत दारूच्या दुकानाच्या दारापाशी जात. त्यांच्या तोंडावर दार धाडदिशी बंद व्हायचे आणि काच थरथरल्याचा व गंजलेल्या कप्पीच्या चाकाचा कर्कश्य आवाज यायचा. मग मारामारी सुरू व्हायची. या सर्व गोष्टी वरून बघायला खूप गंमत यायची. दररोज सकाळी आजोबा आपल्या मुलांच्या कारखान्यांमध्ये जायचे आणि धंदा सुरू करून द्यायला त्यांना मदत करायचे. संध्याकाळी ते घरी परत येत तेव्हा कंटाळलेले, निराश झालेले, चिडलेले असत.

आजी दिवसभर शिवणकाम करायची, जेवण रांधायची, बागेत खणा-यची. अदृश्य स्प्रिंगा असलेल्या एखाद्या प्रचंड भोवऱ्यासारखी सतत काम करीत ती फिरायची. मधून मधून तपकीर ओढायची, मनापासून सणसणीत शिंकायची आणि घामेजला चेहरा पुशीत म्हणायची:

"संतांची आणि देवदूतांची थोरवी अखंड आहे! अल्योशा, माझ्या कबूतरा, सरतेशेवटी आपल्याला निवांत जगणं लाभलं बाबा! आता आपलं सारं कसं छान आहे. पवित्र मेरीमातेची कृपा!"

पण मला मात्र आमचे आयुष्य मुळीच निवांत वाटत नव्हते. सकाळ-पासून रात्रीपर्यंत आवारामध्ये भाडेकरूंची पळापळ चालू असायची. शेजारी

डोकावून जायचे. ते नेहमी गडबडीत असायचे, नेहमी त्यांना कुठेतरी जायला उशीर झालेला असायचा, नेहमी कशाच्या तरी तयारीत असायचे.

"अकुलीना इवानोव्ना!" माझ्या आजीला ते हाक मारीत.

आणि अकुलीना इवानोव्ना तपकिरीची चिमूट नाकात कोंबीत, आपल्या लाल चौकडीच्या मोठ्या रुमालाने नीटपणे तोंड पुशीत, हसऱ्या चेहऱ्याने आणि लक्षपूर्वक त्या सर्वांचे बोलणे ऐकून घेत असे.

"ऊवांच्या कटकटीतून सुटायचं आहे का?" ती म्हणायची. "ऊवा काढून टाकायच्या असल्या तर न्हाणीघरात वारंवार आंघोळ केली पाहिजे आणि सर्वांत उत्तम म्हणजे पेपरमिंटच्या तेलाची वाफ घेतली पाहिजे. पण अंगावर ऊवा पडल्या असल्या तर मात्र बदकाची चरबी–अगदी शुद्ध चरबी बरं का–चमचाभर घ्या, चमचाभर परामिश्रित चुन्याची निवळी आणि तीन थेंब पारा; हे सगळं सात वेळा चिनीमातीच्या खलबत्त्यात मिसळा आणि चोळा. हाडाचा किंवा लाकडी चमचा कधीही वापरायचा नाही, कारण पारा बिघडेल. तसंच तांब्याचा किंवा चांदीचा त्याला स्पर्श करू नका–ते धोक्याचं आहे."

काहीवेळा बराच विचार करून ती म्हणायची:

"भल्या बाई ग, तू आपली मठातल्या असाफला जाऊन विचार. तुझ्या प्रश्नाचं उत्तर देणं माझ्या अकलेला झेपण्यासारखं नाही."

ती सुईण म्हणून काम करायची, घरगुती भांडणांमध्ये मध्यस्थाचे काम करायची, आजारी मुलांवर उपचार करायची; "शुभ शकुन" मिळावा म्हणून बायका तिच्याकडून 'मेरी मातेचे स्वप्न' तोंडपाठ म्हणायला शिकायच्या आणि घरगुती बाबतीत ती सल्ला द्यायची:

"काकड्यांना केव्हा खारवायला घालायचं ते त्यांनाच चांगलं माहीत असतं. जेव्हा त्यांना मातीचा वास येईनासा होतो तेव्हाच त्यांना मीठ चोळायला घ्यायचं. चांगलं क्वास* करायचं तर त्याचं मिश्रण ढवळलं पाहिजे. क्वाससारख्या गोष्टी गोड काही टिकवून घेत नाहीत. त्यात चमचाभर किंवा भांडंभर बेदाणे किंवा थोडी साखर टाका. वारेनेत्सची** चव वेगवेगळी

---

*पाव, धान्य, फळे यांना एकत्र आंबवून केलेले रशियन पेय. –**अनु.**

**वारेनेत्स–वाफावलेले दही. –**अनु.**

असते, दान्यूब पद्धतीनं ते बनवतात, गिश्पानिश पद्धतीनं बनवतात, कॉकेशियन पद्धतीनं बनवतात..."

सारा दिवस मी तिच्या मागे मागे असायचा. मग ती आवारात असो, बागेत असो किंवा शेजाऱ्यांच्या घरी चहा पीत तासन् तास गोष्टी सांगत बसलेली असो. जणू काही मी तिच्या व्यक्तिमत्वाचाच एक भाग बनलो होतो. माझ्या आयुष्याच्या त्या कालखंडात त्या प्रेमळ, परिश्रमी म्हाताऱ्या बाईशिवाय मला दुसरे काहीच आठवत नाही.

काहीवेळा माझी आई थोड्या वेळापुरती येऊन जायची. अजूनही ती मानी आणि खंबीर होती. हिवाळयातील थंडया आणि राखाडी उन्हाप्रमाणे ती थंड नजरेने सर्व गोष्टी पहायची. ती कधीही जास्त वेळ थांबली नाही आणि स्वतःची काहीही आठवण न ठेवता निघून गेली.

एक दिवस मी आजीला विचारले:

"तू चेटकीण आहेस?"

"का रे बाबा, असा विचार तुझ्या मनात का आला?" ती हसून म्हणाली. पण एकदम तेवढीच गंभीर होऊन पुढे म्हणाली: "मी कसली चेटकीण होणार! चेटूकविद्या करायला खूप शिक्षण असावं लागतं आणि इथं तर मला धड अक्षरओळख नाही. तुझे आजोबा बघ कसे शिकले-सवरलेले आहेत आणि पवित्र मेरीमातेनं मला मात्र शहाणं बनवलं नाही."

मग तिने आपल्या आयुष्यातील आणखी एक कहाणी मला विश्वासात घेऊन सांगितली:

"मी अनाथ म्हणूनच लहानाची मोठी झाले. माझ्या आईला नवरा नव्हता आणि ती अपंग होती. ती कुमारी होती तेव्हा तिच्या मालकाची तिला फार भीती वाटायची. एका रात्री तिने खिडकीमधून उडी मारली आणि त्यात तिचा उजवा खांदा दुखावून उजवा हात निकामी झाला. त्याआधी ती विणकाम करण्यात कुशल होती. ती अपंग झाल्यानंतर तिच्या मालकाला तिचा काही उपयोग नव्हता, म्हणून त्यानं तिला सोडून दिलं. पण एका हातानं ती कशी जगणार होती? म्हणून ती भिकारीण बनली. त्यावेळी बालाखनाची माणसं श्रीमंत होती, जास्त चांगली होती. तिथं चांगले सुतार होते, लेस विणणारे होते, एकाहून सरस कारागीर होते. तर मी आणि माझी आई अशा दोघीजणी शरदाच्या आणि हिवाळयाच्या

मोसमात शहरातून भीक मागत फिरत असू. पण मुख्य देवदूत गावरीलोने तलवार उपसून थंडी पळवली आणि पृथ्वीवर वसंत आला की, पाय नेतील तिकडं आम्ही भटकत जायच्या. आम्ही मुरोमला गेलो, युर्येवेत्सला गेलो. सगळी वोल्गा फिरलो, निवांत ओका नदी पालथी घातली. वसंतामध्ये आणि उन्हाळयात चालायला जमीन किती छान असते. माती मऊ असते आणि गवत मखमालीसारखं वाटतं. मैदानांमध्ये मेरी मातेनं तुमच्या आनंदासाठी फुलांची पखरण केलेली असते. मोठमोठी मैदानं पाहून काळीज आनंदानं भरून येतं! अशावेळी माझी आई आपले निळे डोळे अर्धवट मिटून घ्यायची आणि तिचं गाणं पार आकाशापर्यंत भिरभिरत जायचं. एवढा मऊ आणि गोड आवाज होता तिचा! ती गाऊ लागली म्हणजे सारा परिसर नि:स्तब्ध होऊन ऐकत रहायचा. त्यावेळी आयुष्य किती छान होतं! पण मला जेव्हा दहावं वरीस लागलं तेव्हा भीक मागायला मला बरोबर घेऊन जायला आईला लाज वाटायला लागली. तसं वागणं शरमेचं होतं, म्हणून तिनं बालाखनामध्येच मुक्काम ठोकला. तिथं ती एकटीच घरोघर भीक मागायला जायची. रविवारी चर्चच्या व्हरांड्यात उभी रहायची. दरम्यान मी घरी बसून लेस विणायला शिकले. मला माझ्या गरीब आईला मदत करायची घाई झाली होती, पण तेवढ्या लौकर मला विणकाम शिकायला जमत नव्हतं. जेव्हा एखादा प्रकार विणायला जमायचा नाही, तेव्हा मी रडायची. दोन वर्षांहून थोड्या जास्त वेळात मी झकास लेस विणायला शिकले आणि माझं नांव सगळ्या शहरभर पसरलं. काही खास काम पाहिजे असलं की माणसं माझ्याकडं यायची—'चल अकूल्या, तुझी बॉबिन चालवू लाग बरं!' ती म्हणायची. पण मला तेवढ्याचाही आनंद व्हायचा. माझ्या कसबापेक्षा आईच्या शिकवण्याला ते श्रेय होतं. एका हातानं तिला काम जरी करता येत नव्हतं तरी शिकवायची खुबी मात्र तिला चांगली अवगत होती आणि चांगला शिक्षक हा केव्हाही दहा कामगारांच्या जोडीचा असतो. मला खूप अभिमान वाटू लागला. मी म्हणाले 'आई, आता तू भीक मागायचं बंद कर! मी काम करून तुला खाऊ घालू शकेन.' पण आई म्हणाली, 'चूप! त्या पैशातून तुला तुझा हुंडा जमवला पाहिजे!' त्यानंतर लौकरच तुझे आजोबा भेटले. लक्षात राहण्यासारखा तरुण माणूस होता. अवघा बावीस वर्षांचा आणि तेवढ्या वयात बुर्लाकांचा मुकादम! त्यांच्या आईनं मला

पाहिलं. माझी गरिबी पाहिली. एका भिकारणीची मी मुलगी होते. तेव्हा मी कर्तव्यदक्ष गृहिणी चांगली होईन् हे तिनं हेरलं. हं... ती स्वतः बनपाव विकायची. महाखाष्ट बाई होती... पण जाऊं दे. मेलेल्या माणसाबद्दल वाईट कशाला बोला? आपल्या मदतीशिवाय देव सारं काही पहातच असतो. देव पहात असतो, सैतानाला गरज असते..."

ती मनापासून खळखळून हसली. तिचे नाक गंमतीदार रीतीने थरथरले आणि स्वप्नाळू डोळयांनी तिने मला गोंजारले. तिच्या डोळयांनी मला तिच्या शब्दांपेक्षा खूप काही सांगितले.

एक निवांत संध्याकाळ मला आठवते. आजोबांच्या खोलीत बसून मी आणि आजी चहा पीत होतो. आजोबांना त्या दिवशी बरे वाटत नव्हते म्हणून ते उघडया अंगानेच पलंगावर बसले होते आणि खांद्यावरच्या लांब टॉवेलने मधून मधून कपाळावरचा घाम पुशीत होते. त्यांच्या श्वासाची घरघर ऐकू येत होती, त्यांचे हिरवे डोळे निस्तेज दिसत होते आणि त्यांचा चेहरा लालबुंद होऊन सुजला होता. त्यांचे तिखट छोटे कान जास्त लालभडक दिसत होते आणि जेव्हा चहाचा पेला ते उचलायला जात तेव्हा त्यांचा हात कमालीचा कापत होता. त्यादिवशी ते अगदीच नरम होते. खरे म्हणजे असे नरमपणे बसण्याचा त्यांचा मुळीच स्वभाव नव्हता.

"तू मला थोडी साखर का देत नाहीस?" लाडावलेल्या मुलाप्रमाणे ते आजीपाशी कुरकुरले.

"कारण मध त्यापेक्षा जास्त चांगला तुम्हाला," ती शांत पण खंबीर आवाजात म्हणाली.

खूप कटकट आणि बडबड करीत त्यांनी तो गरम चहा घशाखाली ओतला.

"मी मरणार नाही एवढी काळजी घे," ते म्हणाले.

"काळजी करू नका. चांगलं लक्ष आहे माझं तुमच्यावर."

"मग ठीक. आत्ता जर मी मेलो तर आजवरच्या जगण्याला काही अर्थच राहणार नाही. सगळंच वाया जाईल."

"पडून रहा आणि बडबडायचं बंद करा."

आपले निळे पडलेले ओठ चाटीत एक मिनिटभर ते स्वस्थ पडून राहिले. एकदम कुणी चिमटा घ्यावा त्याप्रमाणे उडी मारून ते उठून बसले.

"याकोव आणि मिखाईल यांची लौकरात लौकर लग्नं करून टाकली पाहिजेत. कदाचित बायका आणि काही मुलं यांच्यामुळं तरी ते ताळयावर येतील. कसं?"

शहरातील लग्नाच्या योग्य अशा मुलींची नांवे ते आठवू लागले. दरम्यान काहीही भाष्य न करता आजी चहाचे पेले रिचवीत बसली. काहीतरी खोडी मी केली होती म्हणून मला आजोबांनी बाहेर जायला मनाई केली होती. मी खिडकीत बसून अस्ताला जाणारा सूर्य पहात होतो. घरांच्या खिडक्यांवर चमकणारी मावळतीची किरणे न्याहाळीत होतो.

खाली बागेत भोजाच्या झाडांभोवती किडयांचे थवे गुणगुण करीत होते. शेजारच्या आवारात पिंप ठोकून दुरुस्त करण्याचा आवाज येत होता. जवळच कुठेतरी कात्र्यांना धार लावणाऱ्या यंत्राचा आवाजही कानांवर पडत होता. बागेपलिकडच्या घळीत दाट झुडुपांमध्ये खेळणाऱ्या मुलांच्या आरोळया ऐकू येत होत्या. त्या मुलांमध्ये जाण्याची मला जोराची इच्छा होत होती. संधिप्रकाशातील उदासपणामुळे माझे अंतःकरण जड झाले होते.

अचानक आजोबांनी एक नवे कोरे पुस्तक बाहेर काढले, आपल्या हाताच्या पंजावर जोरजोराने आपटले आणि प्रसन्नपणे मला हाक मारली:

"हे पोरटचा, कोबीच्या कानाच्या, इकडं ये! बैस इथं तातारतोंडचा! ही खूण बघितलीस? हा 'अ' अननसातला. म्हण 'अ' अननसातला. 'ब' बदकातला. 'क' कमळातला. हे काय?"

"'ब' बदकातला."

"बरोबर. आणि हे?"

"'क' कमळातला."

"चूक! 'अ' अननसातला. आता लक्ष देऊन बघ. 'ड' डमरूतला. 'ई' ईडलिंबूतला. 'फ' फडताळातला.—हे काय?"

"'ई' ईडलिंबूतला."

"बरोबर. आणि हे?"

"'ड' डमरूतला."

"शाब्बास. आणि हे?"

"'अ' अननसातला."

आजीने मध्येच अडथळा आणला.

"जरा स्वस्थ पडा पाहू तुम्ही."

"चूप! काळज्या विसरायला मला नेमकं हेच पाहिजे होतं. बोल पुढं अलेक्सेय!"

आपला गरम, ओलसर हात त्यांनी माझ्या मानेभोवती टाकला आणि अक्षरांवर ते बोट ठेवून मला प्रश्न विचारू लागले. दुसऱ्या हाताने त्यांनी ते पुस्तक माझ्या अगदी नाकासमोर धरले होते. त्यांच्या तोंडामधून आंम्ट, घामट, कांद्याचा भपकारा येत होता आणि त्यामुळे मी अक्षरशः गुदमरलो होतो. ते कमालीचे उत्तेजित झाले होते आणि माझ्या कानात ओरडत होते :

"'क' कमळातला. 'ल' लसणीतला!"

ते शब्द मला परिचित होते, पण स्लाव लिपी त्या शब्दांशी मुळीच जुळत नव्हती. 'ल' हा लसणीसारखा दिसण्याऐवजी किड्यासारखा भासत होता; 'फ' फडताळाऐवजी कुबड आलेल्या ग्रिगोरींसारखा दिसत होता. फुगीर 'ब' माझ्यासकट माझ्या आजीची आठवण करून देत होता, तर सगळी अक्षरे काहीशी आजोबांसारखी दिसत होती. ते माझ्याकडून मूळाक्षरे पुनःपुन्हा घोकून घेत होते. एकदा ओळीने विचारायचे, तर एकदा अधून मधून विचारायचे. त्यांच्या उत्तेजित मनःस्थितीची मलाही बाधा झाली आणि मीही घामेघूम होत तारस्वरात ओरडू लागलो. त्यांना याची गंमत वाटली आणि हसता हसता त्यांना खोकल्याची उबळ आली.

"पाहिलंस का गं कसं हुबेहूब उचलतो ते!" छाती आणि पुस्तक हाताने आवळीत धाप टाकीत ते म्हणाले. "अरे तुझ्या मारी, अस्त्राखानचा प्लेग कुठला! एवढा ओरडतोस कशाला?"

"तुम्हीच ओरडता आहात..."

त्यांना आणि टेबलावर हाताचे कोपर टेकून व गालांवर मुठी ठेवून मंदपणे हसत आम्हाला पहात असलेल्या आजीला बघण्यात मला मोठा आनंद होत होता.

"बेबीच्या देठापासून तुमचं ओरडणं पुरे!" ती म्हणाली.

आजोबा माझ्याकडे वळून प्रेमाने खुलासा करीत म्हणाले:

"मी ओरडतोय, कारण मी आजारी आहे. पण तू कशाला ओरड-तोयस?"

मग आपले घामेजलेले डोके हलवीत ते आजीला म्हणाले :

"याची स्मरणशक्ती चांगली नाही असं पूर्वी नताल्या म्हणायची, ते अगदी चुकीचं होतं. अगदी घोड्यासारखी स्मरणशक्ती आहे बेट्याची! बोल पुढं, नकट्या!"

शेवटी गंमतीने त्यांनी मला बिछान्यावरून ढकलले.

"पुरे आता. पुस्तक पुन्हा पुन्हा बघ. उद्या एकही चूक न करता तू मला सगळी मूळाक्षरं म्हणून दाखवायची. त्यासाठी मी तुला पाच कोपेक बक्षीस देईन."

मी पुस्तक घ्यायला पुढे झालो तेव्हा त्यांनी मला आपल्याजवळ ओढून घेतले आणि खिन्नपणे ते म्हणाले :

"बेटा, तुला टाकून एकटीनं निघून जाण्याचं तुझ्या आईला काय कारण होतं?"

"अहो आता तसं बोलण्यात काय अर्थ आहे," आजी चटकन उद्‌गारली.

"ते दुःख काळजाला बोचत राहिलं नसतं तर बोललो नसतो त्याबद्दल... अरेरे. कशी पोरगी अशी वाकड्या मार्गाला गेली!"

झटकन त्यांनी मला दूर सारले.

"बाहेर पळ खेळायला! पण रस्त्यावर मात्र जायचं नाही हां! फक्त आवारात नाहीतर बागेत, समजलं?"

बागेतच जायला माझा जीव कासावीस झाला होता. बागेच्या टोकाशी मी पोचलो रे पोचलो, की पलिकडल्या घळीतली पोरे मला खडे मारू लागली असती आणि त्यांना त्याच पद्धतीने उत्तर देण्यात मला कमालीचा आनंद व्हायचा.

"आला रे आला चपट्या!" मला पाहताच ती ओरडायची. "लगाव त्याला!" आणि ती घाईघाईने दारुगोळा जमवू लागायची.

'चपट्या' म्हणजे 'चपट्या नाकाचा कुत्रा' हे मला त्यावेळी माहीत नव्हते. त्यामुळे त्या नांवाचा मला अपमान वाटत नसे. पण एवढ्या मुलां-विरुद्ध मी एकटा लढत द्यायचा आणि अचूक नेम धरून खडा मारला म्हणजे शत्रू कसा धूम पळायचा किंवा झुडुपांमागे लपायचा, हे पहायला मला खूप आवडायचे. अशा मारामाऱ्यांमागे कोणताही दुष्टावा नव्हता किंवा त्यामुळे नंतर मनात कुठलाही आकस रहात नसे.

मी मूळाक्षरे लौकर शिकलो. त्यामुळेच कदाचित* आजोबा माझ्याकडे जास्त ध्यान देऊ लागले. त्यांनी मला वारंवार चोपणेही बंद केले. वस्तुत: माझ्या मताप्रमाणे मला पूर्वीपेक्षा जास्त तिंबून काढणे आवश्यक होते. कारण मी जसजसा अधिक धीट आणि वयाने मोठा होत गेलो, तसतसा आजोबांच्या नियमांना व आज्ञांना धाब्यावर बसवू लागलो. पण ते फक्त मला रागे भरायचे किंवा हाताच्या मुठी उगारून दम द्यायचे.

अनेकदा काही कारण नसताना त्यांनी मला मारले होते असे मला जाणवले आणि एक दिवस मी तसे त्यांना बोलून दाखविले.

त्यांनी मला एक हलकीशी चापट मारली आणि माझ्या डोळ्यात रोखून पहात म्हणाले :

"का ऽऽ य म्हणाला ऽ स ?" पुढे गालातल्या गालात हसून म्हणाले : मोठा पंडित लागून गेलास रे! तुला किती वेळा तिंबून काढणं आवश्यक होतं ते ठरवणारा तू कोण रे? तो अधिकार फक्त माझ्या एकट्याचा आहे! उनाड कुठला!"

पण मी जसा जायला वळलो तसा त्यांनी माझा खांदा धरला आणि पुन्हा एकदा माझ्या डोळ्यात रोखून पाहिले.

"लबाडी करतोस का खरंच साधेभोळेपणानं विचारतोस?"

"मला ठाऊक नाही."

"ठाऊक नाही काय? ठीक आहे तर. मी सांगतो तुला. धूर्तपणं वाग. साधं असण्यापेक्षा ते जास्त चांगलं. वासरू साधंबागडं असतं. समजलं? आता पळ खेळायला."

लौकरच 'स्तोत्रांचे पुस्तक' मी अक्षर लावून वाचू लागलो. सर्वसाधारणपणे आम्ही संध्याकाळी चहानंतर अभ्यासाला बसत असू आणि दरवेळी मला संपूर्ण स्तोत्र वाचावे लागे.

"'भ' भटजीतला, 'भ' ला कान्हा 'भा', 'ग', 'य', 'ग्य', 'व' ला कान्हा 'वा' 'न'– भाग्यवान," माझी वाचनाची गाडी अशी चालायची. "भाग्यवान तो जो..." हाताचे बोट अक्षरांवरून फिरवीत मी वाचू लागे. त्या वाचनातील कंटाळ्यापायी नाना तऱ्हेचे प्रश्न डोक्यात निर्माण होत.

"भाग्यवान कोण? याकोवमामा?"

"तुझ्या टाळक्यावर एक खारीक वाजवतो म्हणजे समजेल तुला भाग्यवान कोण ते!" रागाने फूत्कारत आजोबा उत्तरले. पण त्यांच्या राग खरा नव्हता हे मला जाणवले. केवळ सवय म्हणून आणि सभ्यपणापायी ते असे रागावत.

माझा अंदाज चुकला नव्हता. एक मिनिटभराने माझे अस्तित्व विसरून आजोबा कडाडले :

"हं... गाणंबजावणं आणि खेळणं असलं म्हणजे राजेश्री अगदी राजा डेव्हिडचा अवतार, पण काम करायच्या वेळी मात्र आवेस्सालोम * पेक्षा वाईट. नुसता गवय्या, जादूगार, विदूषक – छी : ऽऽ! असं नुसतं तंगड्या उडवीत नाचून आयुष्यात कुठवर पोचशील? काही फार लांब नाही!"

त्यांचे बोलणे ऐकण्यासाठी मी वाचायचा थांबलो. त्यांच्या आठ्या पडलेल्या, चिंताग्रस्त चेहऱ्याकडे मी कटाक्ष टाकला. त्यांचे आकुंचन पावलेले डोळे दूर अज्ञातात कुठेतरी बघत होते आणि नेहमीच्या कठोरपणाऐवजी त्यांच्यात खेद भरला होता. त्यांच्या सोनेरी भुवया थरथरत होत्या आणि टेबलावर अस्वस्थपणे ते टिचक्या मारीत होते तेव्हा त्यांची रंगाने डागाळलेली नखे चकाकत होती.

"आजोबा!"

"अं?"

"मला गोष्ट सांगा ना."

"आळशा, तू पुढं वाच बघू," ते गरजले. जणू काही नुकतेच झोपेतून उठावे त्याप्रमाणे त्यांनी डोळे चोळले व म्हणाले, "स्तोत्राचं पुस्तक वाचायचं सोडून बाकी सगळ्या परीकथा ऐकत बसशील!"

त्यांनीसुद्धा स्तोत्रांचे पुस्तक वाचण्यापेक्षा परीकथा ऐकणे जास्त पसंत केले असते, असा माझा तर्क होता. पण स्तोत्रांचे पुस्तक त्यांना तोंडपाठ होते; रोज रात्री अंथरुणावर पडण्यापूर्वी त्यातला काही भाग मोठ्याने म्हणायचा त्यांनी नेम केला होता. चर्चमध्ये पाद्री स्तोत्रे म्हणत त्याप्रमाणे तालासुरावर आजोबा स्तोत्रे म्हणत.

---

* यहुदी राजा डेव्हिड याचा मुलगा. सत्ता काबीज करण्यासाठी त्याने बापाविरुद्ध बंड पुकारले होते. – सं.

पण गोष्ट सांगण्याचा मी त्यांच्यापाशी फारच हट्ट धरला, तेव्हा म्हातारबाबा एकदाचे राजी झाले.

"ठीक आहे. सारं आयुष्यभर पुढं तू स्तोत्रं म्हणणारच आहेस. पण लौकरच मी मात्र माझ्या निर्मात्यासमोर निवाड्यासाठी उभा रहायला जाईन."

जुन्या आरामखुर्चीवर ते डोके टेकवून मागे रेलले, त्यांनी नजर आढ्याला लावली आणि जुन्या काळच्या आठवणींमध्ये ते बुडून गेले: एकदा बालाखनामधील झायेव नांवाच्या व्यापाऱ्याचे दुकान लुटण्यासाठी दरोडेखोरांची टोळी आली होती. धोक्याची सूचना देण्यासाठी माझ्या पणजोबांना घंटेकडे धावत जायचे होते. पण दरोडेखोरांनी त्यांना अर्ध्या वाटेतच गाठले, तलवारींनी त्यांचे तुकडे केले आणि घंटेच्या बुरुजावरून त्यांच्या शरीराचे तुकडे खाली फेकले.

"मी अगदी लहान मुलगा होतो त्यावेळी. काय घडलं ते मी पाहिलं नव्हतं आणि मला ते आठवतही नाही. फ्रेंच आले त्या काळापासून– म्हणजे १८१२ सालापासून मला आठवतं. त्यावेळी मी अवघा बारा वर्षांचा होतो. बालाखनात सुमारे तीस कैदी आणले होते. सगळे लहान आणि हडकुळे होते. हाती मिळतील ते कपडे त्यांनी घातले होते. भिकाऱ्यांपेक्षा त्यांची जास्त दैना होती. हाडांपर्यंत थंडी लागून थरथरा कापायचे. थंडीनं हात-पाय गोठल्यानं त्यांच्यापैकी काहीजणांना तर ताठ उभंही राहता यायचं नाही. बाप्ये लोक त्यांना ठार मारायला निघाले होते, पण सरकारी रक्षकांनी तसं करू दिलं नाही. मग शिबंदीतले सैनिक आले आणि त्यांनी बाप्ये लोकांना त्यांच्या झोपड्यांमध्ये पिटाळून लावलं. नंतर बाप्यांची आणि कैद्यांची एकमेकांना सवय झाली. फ्रेंच माणसं मोठी धूर्त, चलाख आणि गंमत्या स्वभावाची होती. रंगात आली म्हणजे गाणी म्हणायची. त्यांना पाहण्यासाठी नीझ्नीहून बडी मंडळी त्रोयकांमध्ये बसून यायची. त्यांच्यापैकी काहीजण फ्रेंचांना शिव्याशाप मोजायचे, हातांच्या मुठी वळवून धमक्या घालायचे किंवा त्यांना मारहाणही करायचे. पण काहीजण मात्र त्यांच्याशी प्रेमळपणं त्यांच्याच भाषेत बोलायचे, त्यांना जुने कपडे अणि पैसे द्यायचे, उल्हसित करू बघायचे. एक म्हातारा भला गृहस्थ मला आठवतो–आपलं तोंड हातांनी झाकून तो रडायलाच लागला: 'त्या क्रूर नेपोलियननं फ्रेंचांची काय

दुर्दशा केली बघा!' तो म्हणाला. कल्पना कर की, एक भला रशियन कनवाळू माणूस त्या तशा प्रकारच्या परक्या माणसांची कीव करत होता..."

डोळे मिटून आपल्या केसांवरून हात फिरवीत क्षणभर ते गप्प राहिले. मग भूतकाळातील आपल्या आठवणी धुंडाळीत ते सावधपणे पुढे बोलू लागले.

"हिवाळ्याचे दिवस. बर्फाची तुफान वादळं चालू होती. झोपड्या पार गारठलेल्या. ती फ्रेंच माणसं धावत आमच्या खिडकीपाशी यायची आणि माझ्या आईला हाका मारायची. ती बनपाव बनवून विकत असे. खिडकीशी ठोठावीत, थंडी घालविण्यासाठी उड्या मारीत, बनपावासाठी ते फ्रेंच आरडा-ओरडा करीत. आई त्यांना झोपडीत येऊ देत नसे. ती खिडकीमधूनच त्यांना बनपाव देई. गरमागरम पाव ते फ्रेंच खेचून घ्यायचे आणि सदऱ्यां-खाली, त्यांच्या गारठलेल्या अंगांशी, अगदी काळजांपाशी घट्ट दाबून धरायचे. त्यांच्यातले बरेचसे थंडीनं गारठून मेले. उबदार हवेच्या देशातली माणसं — त्यांना इथला थंडीचा कडाका सोसला नाही. त्यांच्यातले दोघं आमच्या बागे-तल्या हमामखान्यात रहायचे. एक अधिकारी आणि त्याचा मिरोन नांवाचा मदतनीस. तो अधिकारी उंच आणि हडकुळा होता. त्याच्या अंगावर मांस नव्हते, नुसती हाडंच! गुडघ्यापर्यंतचा एक बायकी झगा घालून तो फिरायचा. तो स्वभावानं चांगला माणूस होता, पण नंबर एकचा दारुड्या! माझी आई जोडधंदा म्हणून बीयर बनवून विकायची. तो बीयर विकत घेऊन झिंगेपर्यंत प्यायचा आणि गाणी म्हणायला सुरुवात करायचा. आमच्या भाषेत मोडकं-तोडकं बोलायला तो शिकला होता. म्हणायचा, 'तुमची जमीन पांढरी नाही. ती काळी आणि कठोर आहे.' तो फारच मोडकं बोलायचा, पण त्याला काय म्हणायचं होतं ते समजायचं आणि त्याचं बोलणं खरं होतं. आपल्या उत्तरेकडच्या भागात नरम-गरम काहीच नाही. वोल्गाच्या खालच्या अंगाला जाल तसं जमीन उबदार आणि मऊ होत जाते. खाली कास्पियन समुद्राशी तर बर्फच नाही. याची खात्री पटवून घ्यायची असली तर ख्रिस्त चरित्राचं निरूपण वाच, किंवा 'करार' वाच किंवा स्तोत्रं वाच. त्यात कुठंही बर्फाचा किंवा हिवाळ्याचा उल्लेख नाही. त्या प्रदेशात ख्रिस्त राहिला होता... लौकरच आपण स्तोत्रं संपवू आणि दोघं मिळून ख्रिस्त चरित्राचं निरूपण वाचायला सुरवात करू."

पुन्हा ते गप्प झाले आणि डुलकी घेत आहेत असा भास झाला. एखाद्या

गोष्टीवर त्यांचे मन एकाग्र झालेले असले म्हणजे डोळे बारीक करून खिडकीबाहेर कुठेतरी टक लावून पहात. त्यांचे सारे अंग आकसून जाई आणि ते कमालीचे दक्ष बनत.

"पुढं सांगा ना," मी हळूच त्यांना विनवले.

"अरे हो!" दचकून ते म्हणाले. "मी काय सांगत होतो बरं? फ्रेंचांबद्दल ना? तर तीसुद्धा माणसंच होती, आम्हा पाप्यांपेक्षा काही फार वाईट नव्हती. माझ्या आईला ते 'मादाम मादाम' म्हणून हाका मारीत. त्यांच्या भाषेत त्याचा अर्थ 'माझी लाडकी' असा होता. पण त्यांची ही 'लाडकी' पाठीवर पाच पूड वजनाचं पिठाचं पोतं टाकून घरी यायची. बैलासारखी बळकट होती. मी वीस वर्षांचा होईपर्यंत सरळ माझ्या झिंज्या उपटून मला बदडून काढायची. आणि त्यावेळी मीसुद्धा दुबळा नव्हतो. तो मिरोन घोड्यांचा हौशी होता. प्रत्येक घराच्या अंगणात जाऊन तो खुणा करून विचारायचा: 'तुमच्या घोड्याची मी देखभाल करू का?' पहिल्यांदा माणसं त्याला घाबरायची. शेवटी काही झालं तरी शत्रू तो! घोड्यांना बरंवाईट केलं तर? पण नंतर बाप्ये लोक स्वतःच त्याच्या ताब्यात आपली घोडी देत. तो मोठ्या खुषीनं धावत जाऊन त्यांच्या घोड्यांची खिदमत करायचा. त्याचे केस गाजरासारखे लाल होते, नाक मोठ्ठं होतं आणि ओठ जाड होते. तो चांगल्यापैकी साईस होता आणि घोड्यांचे अनेक आजार बरे करायचा. पुढं तो नीझ्नीमध्ये साईस बनला. पण काही दिवसांनी त्याचं डोकं फिरलं आणि बंबवाल्यांनी त्याला जबरदस्त मारहाण केल्यानं तो मेला. तो अधिकारी वसंताच्या मोसमाच्या दरम्यान खंगत गेला आणि सेंट निको-लायच्या दिनादिवशी शांतपणं मेला. हमामखान्याच्या खिडकीशी डोकं टेकून बसला होता तिथंच बसल्याजागी खलास झाला. मला त्याच्याबद्दल फार वाईट वाटलं. थोडा रडलोसुद्धा. फार प्रेमळ माणूस होता. माझ्या कानात स्वतःच्या भाषेत काहीतरी गुलगुलीत बोलायचा. मला त्याचे शब्द समजायचे नाहीत, पण ऐकायला छान वाटायचं. ह्या जगात दयाळू माणसं मुळात कमी. त्याची भाषा कशी बोलायची ते एकदा त्यानं मला शिकवायला सुरुवात केली. पण माझ्या आईनं मला बंदी केली. एवढंच नाही तर ती मला धर्मगुरूकडं घेऊन गेली, त्यानं मला मार द्यायचा हुकूम केला आणि त्या फ्रेंच अधिकाऱ्याविरुद्ध तक्रार नोंदवली. बंधू, त्या काळात माणसं

फार कडक **होती !** आम्हाला जे सोसावं लागलं ते तुम्हाला सोसावं लागलं नाही – दुसऱ्यांनी तुमच्यासाठी आधीच सोसलंय आणि हे कधी विसरू नका ! आता माझंच उदाहरण घे – किती सोसलंय मी !"

अंधार पडला होता. अंधारात माझ्या आजोबांचा आकार आश्चर्यकार-करीत्या वाढला होता. मांजरासारखे त्यांचे डोळे चमकत होते. आपली कहाणी ते, शांतपणे, सावधपणे, आठवून आठवून सांगत होते. पण स्वतःबद्दल ते बोलू लागले म्हणजे उत्तेजित होत आणि बढाया मारू लागत. त्यांनी स्वतः-बद्दल बोललेले ऐकायला मला आवडत नसे आणि त्यांच्या सतत ताकीदीही मला आवडायच्या नाहीत.

"हे लक्षात ठेव !" "ते विसरू नको !"

त्यांनी सांगितलेल्या अनेक गोष्टी खरे म्हणजे मला विसरून जायला आवडल्या असत्या. पण त्यांनी ताकीद न देतासुद्धा त्या माझ्या मनात वेदना देणाऱ्या कपचांप्रमाणे खुपत राहिल्या आहेत. त्यांनी मलापरीकथा कधीच सांगितल्या नाही. फक्त घडलेल्या हकीकती सांगितल्या होत्या. त्यांना प्रश्न केलेले आवडत नसत असे माझ्या लक्षात आले होते आणि मी हमखास प्रश्न विचारीत असे :

"कोण जास्त चांगलं – रशियन किंवा फ्रेंच ?"

"कोण सांगू शकणार ? मी फ्रेंच माणसं त्यांच्या देशात जाऊन पाहिलेली नाहीत," त्रस्त होऊन त्यांनी उत्तर दिले आणि पुढे म्हणाले :

"उंदीरसुद्धा स्वतःच्या बिळात चांगला ठरतो."

"रशियन चांगले आहेत ?"

"काही आहेत – काही नाहीत. भूदास होते – घडीव लोखंडासारखे – तेव्हा चांगले होते. आता त्यांच्या पायांमधल्या बेड्या सुटल्यात, पण त्यांना खायला धड मिळत नाही. धनीमंडळी कठोर काळजाची आहेत हे खरं, पण बाप्यांपेक्षा त्यांना जास्त अक्कल आहे. सगळ्या धनिकांबद्दल सांगू शकणार नाही, पण एखादा भला माणूस चांगला म्हणजे तो चांगलाच वागणार ! काही मात्र कमालीचे मूर्ख, अगदी पोत्यांसारखे ! त्यांच्यात काय कोंबाल ते साठवून ठेवतील ! आमच्यात रिकाम्या टाळक्याचे काय कमी आहेत ? पहिल्या नजरेत माणसासारखा दिसतो, पण जरा बारकाईनं पाहिलं तर किड्यांनी सगळा मगज खाल्लेला – नुसतीच रिकामी खोपडी. आम्हाला

शिक्षणाची गरज आहे, बुद्धीला धार देण्याची गरज आहे. पण धार द्याय-लाच जवळपास काही नाही..."

"रशियन बळकट आहेत?"

"काही आहेत, पण नुसती ताकद उपयोगी पडत नाही. जोडीला कौशल्य लागतं. नुसता बलवान माणूस घोड्यापेक्षा दुबळा असतो."

"फ्रेंचांनी आपल्याशी लढाई का केली?"

"अरे बाबा युद्धं हा झार लोकांचा विषय आहे. आपल्यासारख्या सामान्य माणसांना युद्धं का खेळतात ते नाही समजत!"

बोनापार्त कोण होता असे मी विचारले तेव्हा आजोबांनी दिलेले उत्तर मी कधीही विसरणार नाही.

"सबंध पृथ्वी जिंकू पाहणारा तो एक शूर माणूस होता. सर्वांनी सारखं रहावं, उमराव असू नयेत, अधिकारी असू नयेत—तर सगळे समान असावेत अशी त्याची इच्छा होती. माणसांची नांवं वेगळी राहिली असती, पण प्रत्येकाला सारखेच हक्क मिळाले असते. सगळ्यांचा एकच धर्म ठरला असता. अर्थात त्यात काही फारसा अर्थ नव्हता. सगळे सारखे फक्त खेकडे असतात. आता माशांचंच उदाहरण घे: त्यांच्यातसुद्धा वेगवेगळ्या जाती असतात. सामन हा कॅटफिशचा मित्र नाही, स्टर्जनचं हेरिंगशी पटत नाही. आपल्याकडं-सुद्धा असे बोनापार्त होऊन गेले. उदाहरणादाखल सांगायचं तर राझिन स्तेपान तिमोफेयेव आणि पुगाच येमेल्यान इवानोव. त्यांच्याबद्दल पुन्हा कधी-तरी सांगीन..."

काहीवेळा ते माझ्याकडे डोळे फाडफाडून टक लावून बघत बसत. जणू त्यापूर्वी त्यांनी मला कधी पाहिलेच नव्हते त्याप्रमाणे! आणि त्यांचे तसे पाहणे मला अगदी अप्रिय वाटे.

मात्र माझ्या वडिलांबद्दल आणि आईबद्दल ते माझ्यापाशी कधीच बोलले नाही.

काहीवेळा आजी आमच्या संभाषणात सामील होत असे. एका कोपऱ्यात शांतपणे बसून बराच वेळपर्यंत ती ऐकत राही आणि अचानक आपल्या मधुर आवाजात प्रश्न करी:

"मेरी मातेची प्रार्थना करायला आपण मुरोमला यात्रेला गेलो होतो

ते तुम्हाला आठवतं का हो? किती छान होतं नाही? कोणत्या साली बरं आपण गेलो होतो?"

"नक्की आठवत नाही, पण कॉलऱ्याच्या साथीपूर्वी. त्या वर्षी अलोन्चानां-साठी त्यांनी सारं जंगल धुंडाळून काढलं होतं."

"बरोबर. त्यांची आपल्याला केवढी धास्ती बसली होती ते मला आठवतं..."

"हं..."

अलोन्चान कोण होते आणि जंगलात ते का लपून बसले होते, असे मी विचारले. अनिच्छेने आजोबा उत्तरले:

"अलोन्चान तसे साधे बाप्ये लोक होते. कारखान्यांमधलं काम सोडून पळालेले भूदास."

"त्यांना कसं पकडलं?"

"काय कल्पना आहे तुझी? मुलं खेळतात त्यावेळी होतं तसं—काही पळतात, बाकीची त्यांना पकडतात. एकदा का ते सापडले म्हणजे चाबकांनी आणि चामड्याच्या वादींनी त्यांना सोलून काढतात. त्यांच्या नाकपुड्यासुद्धा चिरून काढायचे. आणि त्यांना शिक्षा झाली हे कळावं म्हणून त्यांच्या कपाळांवर तापलेले डाग द्यायचे."

"कशाबद्दल?"

"कुणाला ठाऊक? तो सगळा मामला फार वाईट होता आणि कुणाचा दोष ते सांगणं कठीण होतं. जे पळाले ते वाईट किंवा जे पकडणारे ते वाईट, हे सांगणं अवघड होतं."

"अहो तुम्हाला आठवतं..." मध्येच पुन्हा एकदा आजी म्हणाली, "मोठ्या आगीनंतर काय परिस्थिती झाली होती?"

"कुठली मोठी आग?" अचूकपणाचा आग्रह धरणाऱ्या आजोबांनी विचारले.

आपल्या आठवणींमध्ये ती दोघे एवढी रमली, की माझे अस्तित्वच ती विसरून गेली. एवढ्या शांतपणे आणि तालासुरात ती दोघे बोलत होती, की काहीवेळा तर गाणे म्हणताहेत असे भासावे. आगी, आजारपणे, लोकांना झालेली मारझोड, अपघाती मृत्यू, धूर्त अफरातफरी, धर्मवेडे,

वरच्या वर्गांमधील तामसी माणसे – अशा वेगवेगळ्या विषयांवरचे हे भयानक गाणे होते.

"किती किती आपण पाहिलं! कशा कशामधून पार पडलो!" आजोबा पुटपुटले.

"आणि आयुष्य वाईट होतं का?" आजीने विचारले. "वार्वारा जन्मली त्या वर्षी वसंताचा मोसम किती छान होता!"

"ते ४८ साल होतं. त्या वर्षी हंगेरीवर आपण स्वारी केली. वार्वाराचा नामकरण विधी झाला आणि दुसऱ्याच दिवशी तिच्या धर्मपित्याला – तीखोनला – ते घेऊन गेले..."

"आणि तो कधीच परत आला नाही," उसासत आजी म्हणाली.

"कधीच परतला नाही. तराफ्यावरचं पाणी वाहून जावं तशी त्या दिवसापासून देवाची आपल्यावरची मर्जी फिरली! अरेरे, वार्वारा..."

"पुरे हो तुमचं..."

"का म्हणून पुरे?" ते रागाने म्हणाले. "तू आपल्या मुलांकडं कशीही पहात असलीस तरी ती वाईट निघाली हेच खरं! आपली खर्चलेली सारी शक्ती वाया गेली. तुला-मला वाटलं होतं की, भरभक्कम टोपलीत आपण वस्तू भरतोय. पण देवानं आपल्या हाती टोपलीऐवजी चाळण दिली..."

जणू काही त्यांना तापलेला डाग द्यावा त्याप्रमाणे ते खोलीभर धावपळ करीत ओरडत राहिले, विव्हळत राहिले, आपल्या मुलांना दूषणे देत राहिले, माझ्या आजीसमोर आपली हडकुळी छोटी मूठ नाचवीत राहिले.

"आणि हे सारं तू त्यांना लाडावून ठेवल्यामुळं झालं! तुझ्या अतिप्रेमानं अनर्थ घडला! चेटकीण कुठली!"

त्यांच्या दुःखाचा एवढा कडेलोट झाला, की ते शेवटी पुतळ्या होत्या त्या कोपऱ्यात गेले आणि आपल्या हडकुळ्या, पोकळ छातीवर हात बडवून घेत अश्रूभरल्या आवाजात विव्हळले :

"का रे देवा? दुसऱ्या कुणाहीपेक्षा मी एवढा वाईट आहे का रे?"

त्यांच्या आसवांनी भरलेल्या डोळ्यांमध्ये वेदना आणि तिरस्कार उमटला होता. त्यांचे सारे अंग कापत होते.

आजी अंधाऱ्या कोपऱ्यात स्वस्थ बसून क्रूसाची चिन्हे करीत होती. शेवटी ती उठून आजोबांपाशी गेली.

"कशाला स्वत:चा असा छळ करून घेता?" आर्जवी सुरात ती म्हणाली. "देवाला काय करायचं ते चांगलं ठाऊक आहे. आपल्या मुलांपेक्षा जास्त चांगली मुलंच जगात कदाचित नसतील. सगळीकडं सारखंच! भांडणं, मारामाऱ्या, धुसफूस! सारे आईबाप त्यांची पापं त्यांच्या आसवांनी धुवून काढतात. तुम्ही काही एकटेच नाही तसे..."

काहीवेळा तिच्या शब्दांनी ते शांत होत आणि थकूनभागून अंथरुणावर जाऊन पडत. अशावेळी आजी आणि मी चोरपावलांनी पोटमाळ्यावरच्या आमच्या खोलीत जात असू.

पण एकदा मात्र असेच प्रेमळपणे बोलत ती त्यांच्यापाशी गेली असताना ते गर्रकन मागे फिरले आणि तिच्या तोंडावर त्यांनी जोरात गुद्दा मारला. आजी हेलकावली आणि आपल्या ओठांवर तिने हात दाबून धरला. जेव्हा तिचा पुरेसा तोल सावरला तेव्हा शांत निवांत स्वरात ती म्हणाली:

"मूर्ख..." आणि आजोबांच्या पायांशी रक्त थुंकली. त्यांनी हात उंचावले आणि दोनदा ते किंचाळले:

"तुला ठार मारायच्या आधी चालती हो इथून!"

"मूर्ख!" दाराकडे जाण्यापूर्वी आजी पुन्हा उद्‌गारली. ते तिच्यामागे धावले, पण ती मुळीच घाई न करता उंबरठ्यापलिकडे गेली आणि त्यांच्या तोंडावर तिने धाडदिशी दरवाजा आपटला.

"म्हातारी थेरडी," आजोबा फिस्कारले. त्यांचा चेहरा निखाऱ्याप्रमाणे फुलला होता. दाराच्या मुठीला धरून ते नखांनी खरवडत होते.

चुलाण्याजवळच्या लाकडी पेटीवर मी एखाद्या प्रेतासारखा बसून होतो. माझ्या डोळ्यांवर माझा विश्वास बसत नव्हता. माझ्या उपस्थितीत पहिल्या प्रथमच आजोबांनी आजीला मारले होते आणि त्या किळसवाण्या प्रकाराला पाहून माझ्या मनाचा पुरता चोळामोळा झाला होता. त्यांच्या ह्या कृतीने त्यांच्यातला एक नवाच पैलू मला दिसला होता. त्या कृतीचे कशाही प्रकारे समर्थन करण्यासारखे नव्हते. माझ्या उरावर प्रचंड बोजा ठेवल्याप्रमाणे मला भासत होते. दाराच्या मुठीशी ते तसेच उभे राहिले आणि राखेत मिसळून जावेत तसे आकसत, पांढुरके होत गेले. एकदम ते खोलीच्या मध्यभागी जाऊन गुडघ्यांवर बसले आणि हातांचा आधार घेऊन पुढे आडवे

झाले. मग सरळ उभे राहिले आणि दोन्ही हातांनी स्वतःची छाती बडवून घेत ओरडले...

"देवा रे देवा..."

लाकडी पेटीच्या उबदार फळ्या मला बर्फासारख्या थंडगार भासू लागल्या. मी हळूच घसरत उतरलो आणि बाहेर पळालो. वरच्या मजल्यावर आजी तोंड चोळत मागे-पुढे येरझाऱ्या घालीत होती.

"दुखतंय?" मी तिला विचारले.

ती कोपऱ्यात गेली आणि सांडपाण्याच्या बादलीत तिने पाण्याची चूळ भरली.

"ठीक आहे," शांतपणे ती उत्तरली. "माझे दात अखंड राहिलेत. फक्त ओठ जरा चिरला."

"असं का केलं त्यांनी?"

"सहनशीलता सुटली त्यांची," खिडकीबाहेर पहात ती उत्तरली. "त्यांना सारं दुर्दैव पचवणं जड जातंय, आता वय झालंय त्यांचं... तू झोप आता आणि सारं विसरून जा..."

मी तिला आणखी काहीतरी विचारले. सहसा कधी मला माहीत नसलेल्या अशा तिखट आवाजात ती म्हणाली:

"तू ऐकलंस की नाही? मुकाट झोप! काय वांड कारटा बनलाय..."

खिडकीशी बसून ती ओठ चोखत राहिली व सारखी रुमालात थुंकत राहिली. मी कपडे काढता काढता तिच्याकडे बघत होतो. तिच्या डोक्यावरच्या काळोख्या आकाशाच्या चौकटीत ताऱ्यांची पखरण झालेली दिसत होती. बाहेर सारे निवांत होते, आत सारे काळोखले होते.

मी बिछान्यात पडल्यानंतर ती माझ्यापाशी आली आणि हळुवारपणे माझे कपाळ थोपटू लागली.

"झोप शांत..." ती म्हणाली. "मी खाली त्यांच्यापाशी जातेय... माझ्या कबूतरा, माझ्याबद्दल वाईट वाटून घेऊ नकोस... त्यात बराच दोष माझा आहे... झोप!"

तिने माझी पापी घेतली आणि गुदमरवून टाकणाऱ्या दुःखात तिने मला एकटे सोडले. गरम नरम बिछान्यातून उडी मारून मी खिडकीपाशी गेलो आणि असह्य वेदनेने बधीर झालेल्या मनःस्थितीत रिकाम्या रस्त्याकडे पहात उभा राहिलो.

६

पुन्हा एकदा आयुष्य म्हणजे एक महाभयानक वाईट स्वप्न बनले. एके दिवशी संध्याकाळी, चहापान संपवून मी आणि आजोबा स्तोत्रांचे पुस्तक वाचत होतो आणि आजी भांडी विसळीत होती, तेवढ्यात याकोवमामा पळत पळत आला. त्याचा नेहमीप्रमाणे विस्कटलेला अवतार होता आणि एखाद्या झडलेल्या झाडूसारखा तो दिसत होता. आपली टोपी त्याने कोपऱ्यात भिरकावली आणि कुठलेही उपचार न पाळता सरळ जोरजोराने हातवारे करीत तो बोलू लागला.

"मिखाईल मोकाट सुटलाय बाबा! आमच्या घरी जेवायला आला होता, खूप झिंगेपर्यंत प्यायला आणि पिसाळला. बश्या फोडल्या, एका गिऱ्हाईकानं रंगवायसाठी दिलेला लोकरीचा पोषाख फाडला, खिडकी फोडली, मला आणि ग्रिगोरींना शिवीगाळ केली. आता तो इकडं येतोय आणि तुमची नरडी धरणार म्हणून ओरडत होता. 'बाबाच्या दाढीतला केसन् केस उपटून काढीन' असं म्हणाला. 'त्याला ठार मारीन' म्हणून किंचाळत होता. तुम्ही आपले सावध रहा त्याच्यापासून..."

आजोबा टेबलावर किंचित कलले आणि हळू हळू ताठ उठून उभे राहिले. त्यांचा सारा चेहरा आकसला होता व नाक तेवढे उठून दिसत होते. त्यांची मुद्रा कमालीची उग्र भासत होती.

"ऐकलंस का ग?" ते किनऱ्या स्वरात ओरडले. "काय वाटतं तुला? आपल्या स्वतःच्या बापाला ठार मारायला येतोय! वा रे तुझा पोरगा! आता घटका भरत आली... मंडळी, घटका भरत आली..."

खांदे ताठ करून ते खोलीत येरझाऱ्या घालू लागले. मग दाराशी जाऊन त्यांनी भलामोठा कोयंडा आडवा लावला.

"मला ठाऊक आहे, तुम्ही दोघंही अजून वार्वाराच्या हुंड्याच्या पैशामागं आहात," याकोवकडे वळून ते म्हणाले. "वाट बघा मिळायची!" असे बोलून त्यांनी मामाला हाताचा अंगठा दाखविला.

"तुम्ही माझ्यावर कशाला उखडता बाबा?" याकोव मागे सरत दुखावल्या आवाजात बोलला.

"तुलासुद्धा मी चांगला ओळखून आहे!"

कपाटामध्ये कप घाईघाईने ठेवीत असताना आजी काहीही बोलली नाही.

"मी तुमच्या रक्षणासाठी आलोय!" याकोव म्हणाला.

"वा वा!" खवटपणे हसत आजोबा म्हणाले. "हे बाकी छान! धन्यवाद पोरा तुला! अगं ए, या कोल्ह्याच्या हातात काही दे – लोखंडाची मळी नाहीतर इस्त्री! आणि आपण याकोव वसील्येव, तुमचा भाऊ हे दार फोडून आत आला रे आला, की तुम्ही हाणाल एक तडाखा – माझ्या टाळक्यावर!"

मामाने स्वत:च्या खिशांमध्ये हात कोंबले आणि एका बाजूला अंग चोरले.

"आता तुम्हाला जर माझ्यावर विश्वास ठेवायचा नसला...."

"तुझ्यावर विश्वास?" पाय आपटीत आजोबा ओरडले. "मी मांजरावर, नाहीतर उंदरावर, नाहीतर कांगारूवर विश्वास ठेवीन, पण तुझ्यावर नाही! मला ठाऊक आहे – तूच त्याला दारू पाजून चिथावलंस! आता बडव त्याला! निवड तूच कर – त्याला मारायचं का मला मारायचं!"

माझ्याकडे वळून आजी हळूच म्हणाली:

"वरच्या मजल्यावर पळ आणि खिडकीमधून मिखाईलमामा दिसतो का बघ. तुला तो दिसला रे दिसला की आम्हाला येऊन सांग. लौकर पळ!"

मी तात्काळ वर जाऊन खिडकीत ठाण मांडले. माझा संतापलेला मामा इथे आल्यानंतर काय गोंधळ घालील या विचाराने मी थोडा अस्वस्थ होतो. पण एवढे जबाबदारीचे काम माझ्यावर सोपविल्याबद्दल माझी छाती अभिमानाने फुलून आली होती. रुंद रस्त्यावर धुळीचा जाडजूड थर बसला होता आणि अधूनमधून फरसबंदी दगडांची वेटोळी डोकावत होती. तो रस्ता डावीकडे दूरवर पसरत गेला होता आणि घळ ओलांडून अस्त्रोझनाया चौकात पोचला होता. त्या चौकात चिकणमाती जमिनीवर चार मिनार भक्कम उभे असलेली जुन्या तुरुंगाची करड्या रंगाची इमारत होती. त्या इमारतीमध्ये एक प्रकारचे उदास सौंदर्य होते आणि भव्यपणाही होता. उजव्या अंगाला आमच्या घरापासून तीन घरे सोडून रस्ता सेन्नाया चौकाला जाऊन मिळत होता. त्या दुसऱ्या बाजूला कैद्यांवर पहारा करणाऱ्या सैनिकांच्या पिवळ्या बराकी होत्या. आणि एक उंचच्या उंच बंबखान्याचा मिनार होता. साखळी बांध-

लेला कुत्रा फिरावा त्याप्रमाणे एक टेहळ्या त्या मिनाराच्या टोकावर सारखा गरगर फिरत राही. त्या चौकात अनेक नाले आणि डबकी होती. त्यातल्या एका डबक्यात हिरव्या शेवाळाचा गाळ साचला होता, तर उजव्या हाताला चुकोव तळे होते. माझ्या आजीने माहिती सांगितली होती की, माझ्या मामांनी माझ्या बाबांना एकदा तिथेच बर्फाच्या खड्डयात फेकून दिले होते. माझ्या खिडकीसमोरच एक छोटी गल्ली जात होती व छोटचा घरांचा एक पुंजका तिथे उभा होता. तीन संतांच्या चर्चपाशी ती गल्ली संपत होती. चर्चची भक्कम इमारत जमिनीवर ओणवी झाल्यासारखी भासायची. खिडकीतून अगदी सरळ नजर टाकली तर फळबागांच्या हिरव्या लाटांवर बोटी उपडचा व्हाव्यात त्याप्रमाणे घरांची छपरे दिसायची.

प्रदीर्घ हिवाळी वाऱ्यांनी झोडपल्यामुळे, अखंड शारदीय पावसांनी धुवून काढल्यामुळे, आमच्या रस्त्यावरची विटकी, धुळकट घरे चर्चच्या व्हरांडचात आशाळभूत नजरांनी घोळका करून राहणाऱ्या भिकाऱ्यांसारखी वाटायची. मी जसा कुणाचीतरी वाट पहात होतो त्याप्रमाणे आपल्या बेंड आलेल्या खिडक्यां-मार्फत ती कुणाचीतरी वाट पाहताहेत असे भासायचे. मला रस्त्यावरून येणारी जी माणसे दिसत होती ती चुलाण्यावर चढणाऱ्या जडावल्या झुरळां-प्रमाणे सुस्तपणे चालत येत होती. माझ्या खिडकीपर्यंत घुसमटून टाकणारी उष्णतेची गरम झळ येत होती आणि तिच्याबरोबर वासंतिक कांद्याच्या व गाजरांच्या समोशांचा उबग आणणारा घमघमाट येत होता. आजही तो वास मला असह्य होतो.

एकूण दृश्य निराशाजनक होते. त्या निराशेचे दडपण असह्य झाले होते. माझ्या छातीत जणू शिसाचा रस भरल्यासारखे वाटत होते. त्याचा दाब छातीत आणि बरगडचांना विलक्षण जाणवत होता व शवपेटीसारखे छत असलेल्या त्या छोटचा खोलीमधून न मावणाऱ्या फुग्यासारखा मी बाहेर उडविला जाईन, असे वाटत होते.

एवढचात अचानक मिखाईलमामा माझ्या दृष्टीस पडला. गल्लीच्या कोपऱ्याच्या राखाडी रंगाच्या घरामागून तो डोकावून पहात होता. त्याने टोपी खाली ओढून घेतल्यामुळे त्याचे कान उभे राहिल्यासारखे दिसत होते. आखूड तपकिरी कोट त्याच्या अंगात होता आणि संपूर्ण धुळीने माखलेले गुडघ्यापर्यंतचे बूट पायात होते. त्याच्या चौकडीच्या पँटीच्या खिशात त्याचा

एक हात खुपसलेला होता आणि दुसऱ्या हाताने त्याने स्वतःची दाढी धरली होती. मला त्याचा चेहरा दिसत नव्हता, पण तो अशा काही पवित्र्यात उभा होता की, जणू रस्त्यावर झेप घेऊन आपले काळे, केसाळ पंजे आजोबांच्या घराच्या नरडीत खुपसू पहात होता. खरे म्हणजे खाली पळत जाऊन तो आल्याचे त्यांना सांगणे भाग होते, पण खिडकीपासून माझा पायच हलेना. आपले राखी बूट घाण होतील अशी भीती वाटावी त्याप्रमाणे चोरपावलांनी तो रस्ता ओलांडत असल्याचे मी पाहिले व त्यानंतर दारूच्या दुकानाचे दार त्याने उघडल्यावर काचेचा आणि बिजागरींचा कर्कश्य आवाज मी ऐकला.

मी खाली धावलो आणि आजोबांच्या खोलीचे दार ठोठावले.

"कोण आहे?" दार न उघडताच कठोर आवाजात ते ओरडले. "तू होय? काय? दारूच्या दुकानात गेला म्हणतोस? ठीक आहे. आता आलास तिथं परत जाऊन बैस!"

"मला भीती वाटते..."

"काही इलाज नाही!"

मी वर गेलो. अंधार पडत चालला होता. रस्त्यावरची धूळ जास्त दाट आणि गडद होत चालली होती. खिडक्यांमधून मेणचट पिवळे दिवे लुकलुकू लागले होते. रस्त्यापलिकडल्या घरामध्ये कुणीतरी तंतूवाद्यावर सुरेख करुण संगीत छेडत होते. दारूच्या दुकानात कुणीतरी गात होते. जेव्हा जेव्हा दारूच्या दुकानाचे दार उघडले जाई तेव्हा तेव्हा मला एक थकलेला, भसाडा आवाज ऐकू येई. तो आवाज माझ्या परिचयाचा होता. एकडोळ्या भिकारी निकीतुश्काचा तो आवाज होता. त्याचा डावा डोळा घट्ट मिटलेला होता आणि उजवा निखाऱ्यासारखा लालभडक दिसायचा. दार धाडदिशी बंद झाले म्हणजे कुऱ्हाडीचा घाव बसल्याप्रमाणे खटदिशी त्याचा आवाज ऐकू येणे बंद व्हायचे.

आजी त्या भिकाऱ्याचा हेवा करायची. जेव्हा जेव्हा ती त्याचे गाणे ऐकायची तेव्हा तेव्हा उसासा टाकून म्हणायची:

"कित्ती छान छान गाणी येतात त्याला! मोठा नशीबवान आहे."

काहीवेळा ती त्याला आमच्या आवारात बोलवून घ्यायची. आपल्या काठीवर रेलून तो व्हरांड्यात बसायचा, गाणी गायचा, कविता म्हणायचा;

तर त्याच्या शेजारी ऐकत बसलेली माझी आजी अधूनमधून एखादा प्रश्न विचारून अडथळा आणायची.

"पवित्र मेरीमाता ऱ्याझानमध्ये होती असं म्हणतोस ?"

"ती सगळीकडं होती—सगळ्या गुबेर्नियांमध्ये..." तो खात्रीपूर्वक सांगायचा.

सबंध रस्त्यावर एक झोपाळू थकलेपणा नकळतपणे पसरला होता. त्याचे माझ्या काळजावर ओझे पडले होते आणि माझेही डोळे मिटू लागले होते. आजी आली असती तर कित्ती बरे झाले असते! किंवा आजोबासुद्धा चालले असते! माझे वडील कोणत्या प्रकारचे गृहस्थ असावेत बरे! माझ्या मामांना आणि आजोबांना ते आवडत नव्हते, तर आजी, ग्रिगोरी आणि येवगेन्या मोलकरीण त्यांच्याबद्दल चांगले बोलत. आणि माझी आई कुठे होती ?

अलिकडे मी माझ्या आईविषयी जास्त जास्त विचार करू लागलो होतो. माझ्या आजीच्या सर्व गोष्टींची आणि दंतकथांची नायिका म्हणजे माझी आईच आहे, अशी कल्पना मी करीत असे. माझी आई आपल्या घरच्या माणसांबरोबर रहायला तयार नव्हती, या एकाच वस्तुस्थितीने तिच्याबद्दल माझ्या मनात अतीव आदर निर्माण झाला होता. मी कल्पना करायचा की, वाटसरूंना लुटणाऱ्या टोळीबरोबर ती एखाद्या पथिकाश्रमात रहात होती. ते दरोडेखोर श्रीमंतांना लुटून ती संपत्ती गरीबांना वाटायचे. किंवा कदाचित ती जंगलात एखाद्या गुहेत रहात होती. अर्थात पुन्हा एखाद्या दयाळू दरोडेखोरांच्या टोळीबरोबर. त्यांना ती शिजवून घालीत होती आणि चोरलेल्या सोन्याची राखण करीत होती. किंवा आणखी एक कल्पना म्हणजे "दरोडेखोरांची राजकन्या" येन्गालीचेवाप्रमाणे ती पृथ्वीवरचे खजिने मोजत फिरत होती आणि मेरी माता "दरोडेखोरांच्या राजकन्ये" बरोबर फिरत तिला सांगत होती त्याप्रमाणे माझ्या आईबरोबर फिरत तिला म्हणत होती :

अगं लोभी पोरी, असं करू नको,
या धरतीचं सोनं-रूपं लुटू नको ;
अगं आधाशी पोरी, असं करू नको,
धरतीच्या खजिन्यांखाली शरम दडवू नको !

आणि माझी आई "दरोडेखोर-राजकन्ये" प्रमाणे उत्तरली :

हे निष्कलंक मेरी माते क्षमा कर,
माझ्या पापी आत्म्यावर दया कर,
लुटत नाही मी माझ्यासाठी,
सारं काही माझ्या लाडक्या बाळासाठी...

मग माझ्या आजीसारखीच दयाळू असलेली मेरी माता माझ्या आईला क्षमा करीत म्हणाली :

अगे कैदाशिणी मार्यूश्का,
अगे कोडग्या तातार स्त्रिये,
जायचेच असेल जर तुझ्या मार्गाने,
निवड वाट ; दयाबुद्धीनं वाग.
रशियन भूमीच्या लेकरांना धक्का नको लावू,
जंगलातून जाताना मोर्दोवियनाला झोड,
राखाडी स्तेपभूमीत काल्मीकाला काप...

खालच्या हॉलमधून आणि आवारामधून ऐकू येणाऱ्या गोंधळामुळे व आरडाओरडीमुळे मी दचकून जागा झालो. स्वप्नात विरून जाव्यात तशा ह्या दंतकथांच्या आठवणी माझ्या मनातून नाहीशा झाल्या. मी खिडकीतून वाकून खाली पाहिले. आजोबा, याकोवमामा आणि दारू-दुकानदाराकडे काम करणारा गंमत्या मेल्यान असे तिघेजण मिळून मिखाईलमामाला फाट-कातून रस्त्यावर ढकलून देत होते. तो धडपडत परत येत होता, पण त्यांनी त्याला लाथा हाणल्या ; त्याच्या हातांवर, खांद्यांवर, पाठीवर बदडले. शेवटी तो रस्त्यावरच्या धुळीत कोसळला. फाटक धाडडिशी बंद झाले, कुलुप-कडी लागली, मिखाईलमामाची चिंध्या झालेली टोपी रस्त्यावर भिर-कावण्यात आली व सारे काही शांत झाले.

थोडा वेळ धुळीत निपचित पडून राहिल्यानंतर, विस्कटलेला, मार खाल्लेला मिखाईलमामा उठून बसला. त्याने एक फरसबंदी दगड उचलला आणि फाटकावर भिरकावला. पिंपाच्या तळावर बुक्की मारल्यानंतर येतो तसा बद्द आवाज झाला. दारूच्या दुकानामधून काळपट चेहऱ्याची माणसे

झिंगत बाहेर पडली. ती ओरडत होती, हातवारे करीत होती. घरांच्या खिडक्यांमधून माणसांची मुंडकी डोकावली. आरडयाओरडयामुळे आणि हसण्यामुळे रस्ता एकदम सचेत बनला. हेसुद्धा परीकथेप्रमाणेच आकर्षक होते, पण अप्रिय होते, भेदरवून टाकणारे होते.

अचानक सारे काही संपले, सारे निघून गेले आणि सारीकडे निवांत झाले.

दाराजवळच्या ट्रंकेवर माझी आजी कुबड काढून नि:स्तब्ध बसली होती. मी तिच्या समोर उभा राहून तिच्या गरम, ओल्या गालांवरून हळुवार हात फिरवत होतो. पण त्याचे तिला भान नसावे. ती खिन्नपणे स्वत:शीच पुटपुटत बसली होती :

"हे देवा, माझ्या आणि माझ्या मुलांच्या बाबतीत थोडी सुबुद्धी दिलीस तर बरं नाही का होणार? देवा, सांभाळ रे बाबा..."

पोलेवाया रस्त्यावरच्या ह्या घरात माझे आजोबा एका वसंतापासून दुसऱ्या वसंतापर्यंत, म्हणजे जेमतेम वर्षभरच राहिले. पण एवढ्या थोड्या अवधीतही ते घर कुप्रसिद्ध बनले. जवळ जवळ दर रविवारी पोरे आमच्या फाटकाशी धावत येत व येताना आनंदाने आख्ख्या आळीला ओरडून सांगत :

"कशीरिनांच्या घरी आज आणखी नवं भांडण लागलंय!"

मिखाईलमामा संध्याकाळच्या सुमाराला यायचा आणि सबंध घराला रात्रभर आणीबाणीच्या परिस्थितीत ठेवायचा, घरातल्या माणसांना धास्तावल्या अवस्थेत ठेवायचा. काहीवेळा तो आपल्याबरोबर कुनाविनो वर्कशॉपमधले दोन-तीन दांडगट मदतनीस घेऊन यायचा. घळ चढून ते बागेत उतरायचे आणि त्यांच्या झिंगल्या अवस्थेत मन मानेल तसा धुडगुस घालायचे. रासबेरीची आणि मनुक्याची झुडपे ओरबाडून काढायचे. एका रात्री त्यांनी न्हाणीघराचा सत्यानाश केला, तिथे मोडता येण्यासारखे जे काही होते ते मोडून ठेवले. फडताळे, बाकडी, बंब या सर्वांची वाट लावली. त्यांनी चुलाण्यावरच्या लाकडी फळ्या खेचून काढल्या, दाराच्या चिरफाळ्या. उडविल्या, मूठीच्या ठिकऱ्या केल्या.

आपल्या मालमत्तेची नासधूस पहात आजोबा खिडकीशी मान खाली घालून स्वस्थ उभे होते. आजी आवारात धावत गेली आणि अंधारात गायब झाली. पण तिचा आर्जवी स्वर ऐकू येत होता :

"मिखाईल, अरे बाबा, काय खेळ मांडलायसं हा! जरा विचार कर!"

तिला उत्तर म्हणून अत्यंत अश्लील रशियन शिव्यांची सरबत्ती उडाली. जे पशू त्या शिव्यांची लाखोली वहात होते त्यांना त्यांचा अर्थ आकलन होण्याच्या पलिकडे त्यांची अवस्था होती.

अशा क्षणी आजीची सोबत करण्याचा विचार करणेही शक्य नव्हते. पण तिच्याविना खूप भीतीही वाटत होती. मी आजोबांच्या खोलीत गेलो.

"नतद्रष्टा, चालता हो इथून!" घोगऱ्या आवाजात ते माझ्यावर ओरडले.

मी पोटमाळ्यावरच्या खोलीत पळत गेलो व बागेतल्या अंधारात डोळे फाडफाडून बघू लागलो. आजी नजरेआड होऊ नये म्हणून माझा प्रयत्न चालला होता. मी रडत होतो, तिला हाका मारीत होतो. ते तिला ठार मारतील अशी मला भीती वाटत होती. ती काही आली नाही, पण माझा आवाज ऐकून माझ्या झिंगलेल्या मामाने माझ्या आईला उद्देशून काही घाणेरड्या शिव्या हासडल्या.

अशाच एका संध्याकाळी माझ्या आजोबांना बरे नव्हते. बिछान्यात पडून ते शोक करीत रडत तळमळत होते:

"यासाठीच मी एवढा जगलो का, पापं केली, पैसे साठवले? मला शरम वाटते म्हणून... नाही तर पोलिसांना बोलावून त्यांना पकडलं असतं आणि गव्हर्नरच्या हवाली केलं असतं... केवढी लाजिरवाणी परिस्थिती! आपल्या पोरांना पकडून द्या असं पोलिसांना कुणी आई-बाप कधी सांगतात का? तेव्हा म्हाताऱ्या... मुकाट पडून रहा... तू काही करू शकत नाहीस!"

एकदम ते बिछान्यावरून उडी मारून उठले आणि धडपडत खिडकी-पाशी गेले.

"अहो, चाललात कुठं?" त्यांच्या दंडाला पकडीत आजी ओरडली.

"मला थोडा उजेड दे!" धापा टाकीत त्यांनी हुकूम केला.

आजीने मेणबत्ती पेटवून दिल्यानंतर त्यांनी ती स्वत:समोर बंदुकीसारखी धरली व खिडकीमधून उपहासाच्या सुरात ते ओरडले:

"हात् तुझी मीश्का, रात्रीचा चोर कुठला, लूतभरला पिसाळलेला कुत्रा!"

तात्काळ खिडकीचे वरचे तावदान खळ्ळदिशी फुटले व आजीसमोरच्या टेबलावर विटकरीचा अर्धा तुकडा येऊन पडला.

"चुकला नेम!" आजोबा किंचाळले व अर्धवट हसू-रडू लागले.

जणू मला उचलावे तसे आजीने आजोबांना बकोटीला धरून उचलले आणि घाबरल्या आवाजात ती पुटपुटली:

"अहो तुम्ही तरी काय असं करताय? जर काही वेडंवाकडं घडलं तर त्याच्या नशीबी सैबेरिया येईल. आणि अशा अवस्थेत सैबेरियाचा अर्थ त्याला समजेल असं वाटतं तुम्हाला?"

ओक्साबोक्शी हुंदके देत पाय झाडीत आजोबा पडल्या पडल्या म्हणाले: "मारू दे मला ठार..."

बाहेरून ओरडा आणि आदळआपट ऐकू आली. मी टेबलावरचा विटकरीचा तुकडा घेऊन खिडकीशी धावलो. पण तेवढ्यात आजीने मला धरले आणि कोपऱ्यात दाबून बसवीत ती फूत्कारली:

"ए मूर्ख कारटचा!"

आणखी एकदा मिखाईलमामा मागच्या व्हरांड्यात चढला होता आणि आत येण्याच्या दारावर दंडुक्याचे तडाखे मारीत होता. माझे आजोबा मदतीला दोन दंडुकेधारी भाडेकरूंना घेऊन हॉलमध्ये उभे राहिले होते आणि मामा दार फोडून आत केव्हा येतो त्याची वाट पहात होते. त्यांच्या जोडीला दारू-दुकानदाराची अवाढव्य बायकोही चिमटा घेऊन उभी होती. त्या सर्वांच्या मागे आजी उभी होती.

"मला त्याच्यापाशी जाऊ द्या," तिने हॉलमधील माणसांची विनवणी केली. "मला त्याच्याशी बोलू द्या."

माझे आजोबा दंडुका उंच धरून एक पाय पुढे टाकून पवित्र्यात उभे होते. 'अस्वलाची शिकार' ह्या चित्रात बाप्या जसा भाला घेऊन उभा असतो त्या थाटात! आजी त्यांच्यापाशी धावत गेली तेव्हा काही न बोलता त्यांनी तिला पायाने आणि कोपराने मागे सारले. ते चौघेही अपेक्षेने वाट पहात भयानक पवित्रे धरून उभे होते. त्यांच्या डोक्यावरच्या दिव्याची वात थरथरत त्यांचे चेहरे उजळीत होती. मी पोटमाळ्याच्या जिन्यावर उभा राहून तो सारा प्रकार पहात होतो. आजीला बरोबर घेऊन जायला मी अधीर होतो.

मामा दारावर जोरजोराने धडका मारीत होता. खालची बिजागरी आधीच मोडली होती आणि तिची कर्कश्य करकर होत होती. दार जेमतेम वरच्या

बिजागरीवर तगून होते आणि तीही बिजागरी तुटण्याच्या बेतात होती. आजोबा त्या बिजागरीसारख्याच करकरत्या आवाजात आपल्या साथीदारांना म्हणाले :

"लक्षात ठेवा, त्याच्या हाता-पायांवर मारा. पण डोक्यावर मात्र नाही!"

दरवाजाशेजारीच एक छोटी खिडकी होती. तिच्यामधून जेमतेम डोके बाहेर काढता येई. मामाने त्या खिडकीची काच आधीच फोडली होती. तिथे आता काळे भगदाड पडले होते व सभोवताली फुटक्या काचांची कडा राहिली होती. डोळ्याच्या रिकाम्या खोबणीसारखी ती खिडकी भासत होती.

आजी त्या खिडकीपाशी धावली आणि हात बाहेर काढून मिखाईलला उद्देशून ओरडली :

"मीशा, अरे देवाची शपथ घालते, इथून जा! तुला ही माणसं जन्माचा पांगळा करून ठेवतील! जा लौकरच!"

त्याने दंडुक्याने तिच्या हातावर जोराने फटका मारला. खिडकीतून काहीतरी अवजड वस्तू चमकली आणि आजीच्या हातावर कोसळली, एवढे मी पाहिले. दुसऱ्याच क्षणी आजी फरशीवर कोसळली आणि तिच्या तोंडून जेमतेम शब्द उमटले "पळ मीशा..." नंतर ती लोळागोळा होऊन निपचित पडली.

"अरेच्चा, तू काय करून बसलीस!" घाबरल्या आवाजात आजोबा विव्हळले.

दार उघडले गेले आणि काळ्या भगदाडातून मामा उडी मारून आत आला. पण फावड्यातून घाण फेकून द्यावी तसा दुसऱ्याच क्षणी बाहेर फेकला गेला.

दारू-दुकानदाराची बायको आजीला माझ्या आजोबांच्या खोलीत घेऊन गेली. लौकरच आजोबा त्यांच्या मागोमाग गेले.

"हाड मोडलं?" आजीपाशी जाता जाता रंजीस आलेल्या सुरात त्यांनी विचारले.

"मोडलंय असं वाटतं," डोळे न उघडता ती उत्तरली. "पण त्याचं तुम्ही काय केलंत—"

"ए बाई, आता तरी थोडी शुद्धीवर ये!" रागाने आजोबा ओरडले. "मी पशू आहे असं वाटतं काय तुला? आम्ही त्यालां बांधून शेडमध्ये ठेवलंय. त्याच्यावर बादलीभर पाणी ओतलं. असा कसा क्रूर कारटा निपजला कुणास ठाऊक!"

आजी कण्हली.

"हाडवैद्याला मी बोलावणं धाडलंय. थोडा वेळ सहन कर," तिच्या-शेजारी बसत आजोबा म्हणाले. "ही पोरं म्हणजे आपले यमदूत आहेत. आपली घटका भरायच्या आधीच थडग्यात लोटणारं ती आपल्याला!"

"देऊन टाका त्यांना सगळं."

"आणि वार्वाराचं काय?"

बराच वेळ ती दोघे बोलत होती. आजी शांत, करुण सुरात आणि आजोबा मोठमोठ्यांदा व रागाने.

मग एक छोटी कुबडी म्हातारी तेथे आली. तिचे तोंड या कानापासून त्या कानापर्यंत पसरलेले होते. तिचा खालचा जबडा थरथरत होता, माशा-प्रमाणे तिचे तोंड उघडे होते आणि तिच्या वरच्या ओठाचे धारदार नाकाने दोन भाग पाडले होते. तिचे डोळे दिसतच नव्हते, तिला आपले पाय जवळ जवळ हलविता येत नव्हते. कुबड्या घेऊन, काखेतल्या छोट्या गाठोड्याचा खुळखुळ आवाज करीत फरशीवरून ती सरकत होती.

मला वाटले की, ही बाई म्हणजे माझ्या आजीचा मृत्यू होती. मी त्या म्हातारीच्या अंगावर धावून जात बेंबीच्या देठापासून ओरडलो:

"चालती हो इथून!"

आजोबांनी मला पकडले आणि अत्यंत अपमानकारक पद्धतीने पोटमाळ्यावरच्या खोलीत हाकलून लावले.

## ७

अगदी लहान वयातच मला समजले होते की, माझ्या आजोबांचा एक देव होता आणि माझ्या आजीचा देव दुसरा होता.

सकाळी उठल्यानंतर आजी बिछान्यातच बसून आपले विपुल केस नेहमी विंचरत असे. डोक्याला हिसके देत, त्या लांबसडक काळ्या रेशमी झुपक्यांना

खेचताना दात आवळून, मी जागा होणार नाही अशा बेताने ती खालच्या आवाजात त्या केसांना शिव्याशाप मोजत असे :

"तुला देवी येवोत, तुला प्लेग लागो, तुझं तळपट होवो!"

केसांचा गुंता सोडवून झाला म्हणजे ती वेणी घालायची आणि घाई-घाईने खसाखसा तोंड धुवायची. पण तिच्या मोठ्या चेहऱ्यावरचा त्रासलेपणा काही पाण्याने धुतला जात नसे. झोपेमुळे तिच्या तोंडावर खूप सुरकुत्या पडत आणि तशाच अवस्थेत ती पुतळ्यांसमोर गुडघे टेकून बसे. आणि सकाळच्या पूजेनंतर मात्र ती ताजी टवटवीत होई.

पाठ ताठ करून आणि मान वर करून अत्यंत प्रेमाने ती कझानच्या मेरी मातेच्या गोल चेहऱ्याकडे कटाक्ष टाकी आणि मनोभावे क्रूसाचे चिन्ह करून पुटपुटत असे :

"पवित्र मेरी माते, येणाऱ्या दिवसावर तुझ्या कृपेची वृष्टी कर..."

मग ती पार जमिनीला नाक टेकेपर्यंत वाकून नमस्कार करी, हळू हळू पुन्हा उठे आणि वाढत्या भक्तिभावाने पुटपुटू लागे.

"साऱ्या आनंदाचं निधान, पूर्ण बहरलेल्या सफरचंदाच्या झाडासारखं अनुपम सौंदर्य..."

जवळ जवळ रोज सकाळी ती स्तुतीचे आणि भक्तीचे नवनवे शब्द हुडकून काढी. त्यामुळे तिची प्रत्येक प्रार्थना मी अगदी कान टवकारून ऐकत असे.

"माझ्या विशुद्ध, पवित्र काळजा! माझ्या आत्म्याच्या प्रकाशा, माझ्या चुलीच्या रक्षणकर्त्री, आकाशीच्या तेजस्वी, सोनेरी सूर्या, देवाच्या पवित्र माते, आमचं येणाऱ्या संकटांपासून रक्षण कर, निष्कारण बदनामीपासून आमचं रक्षण कर, आणि माझं विनाकारण घडणाऱ्या अपमानापासून रक्षण कर..."

तिच्या काळ्या डोळ्यांमध्ये खोलवर स्मित विलसत असे आणि आपल्या जाडजूड हाताने सावकाशपणे ती पुन्हा क्रूस करी तेव्हा जणू अधिक तरुण झाल्याप्रमाणे ती भासत असे.

"माझ्या येशू, देवाच्या पुत्रा, तुझ्या स्वतःच्या मातेखातर माझ्यासारख्या पापिणीवर दया कर..."

तिच्या प्रार्थना म्हणजे साध्या आणि प्रामाणिक अंतःकरणामधून उमटलेली स्तुतीपर भक्ती असायची, देवाचे कौतुक असायचे.

सकाळच्या वेळी ती प्रार्थनांची लांबण घालीत नसे. समोवार पेटविणं आवश्यक असायचे, कारण आजोबांनी घरात आता नोकरमाणूस ठेवलेले नव्हते. आणि आजीने त्यांना चहा द्यायला उशीर केला तर ऐन सकाळच्या प्रहरी तिला त्यांची रागीट बोलणी ऐकून घ्यावी लागत.

काहीवेळा जर ते आजीआधी जागे झाले असले तर पोटमाळ्यावर चढून यायचे. आजी प्रार्थनेत गढलेली त्यांना दिसायची. ते गप्प उभे राहून तिची प्रार्थना ऐकत. अशा वेळी त्यांच्या पातळ, काळसर ओठांवर तुच्छ हसू उमटलेले असे. नंतर न्याहरीच्या वेळी ते म्हणतः

"हे मठ्ठ टाळक्याच्या बाई, प्रार्थना कशी करायची ते मी तुला किती वेळा शिकवलं! पण तू आपली हट्टानं पाखंड्यासारखी वटवट करीत जातेस! देव कसं काय तुझ्याशी जमवून घेतो हे मला तरी समजत नाही बुवा!"

"देवाला समजतं," आजी विश्वासाने म्हणाली. "तुम्ही देवाला कशाही पद्धतीनं सांगा, तो हमखास सगळं समजून घेतो."

"अगदी महामूर्ख आहेस! छी: ऽऽ!"

तिचा देव सारा दिवस तिच्या सांगाती असायचा. प्राण्यांनासुद्धा ती देवाबद्दल सांगायची. सर्व प्राण्यांना – माणसे, कुत्री, पक्षी, मधमाशा आणि वनस्पतीसुद्धा – त्या देवाच्या आधीन होणे सोपे होते असे मला जाणवायचे. पृथ्वीवरच्या सर्वांशी तो सारख्याच प्रेमाने वागायचा, सारखीच दया दाखवायचा.

दारू-दुकानदाराच्या बायकोचा एक खोडकर बोका होता. तो राखाडी रंगाचा आणि सोनेरी डोक्याचा प्राणी हलकट आणि चोरून खाण्यात पटाईत असला, तरी आवारातील सर्वांचा आवडता होता. त्या बोक्याने एके दिवशी एक मैना पकडली. आजीने त्या जखमी मैनेला बोक्याच्या पंजातून सोडविले आणि रागाने ती बोक्याला म्हणाली :

"मेल्या, तुझ्या काळजात देवाबद्दल काही भीती नाही ही मोठी वाईट गोष्ट आहे!"

आजीच्या या शब्दांवर देवडीवाला आणि दारू-दुकानदाराची बायको मनसोक्त हसली. पण आजी त्यांच्यावरही खेकसली :

"जनावरांना देवाचं ज्ञान नसतं असं तुम्हाला वाटतं? तुम्हा दगडाचं काळीज असलेल्या प्राण्यांप्रमाणं, वाईटातल्या वाईट जनावरालाही देव माहीत असतो!"

लठ्ठ, सुस्त शारापला गाडीला जुंपताना ती पुटपुटायची :

"देवाच्या सेवका, असा खिन्न का? मला वाटतं, म्हातारा होत चाललास...

घोडा सुस्कारा टाकून डोके हलवायचा.

तरीसुद्धा आजोबांप्रमाणे ती सारखा देवाच्या नांवाचा उच्चार करीत नसे. आजीचा देव मला समजत असे आणि त्याची मला भीतीही वाटत नसे. पण तरीसुद्धा त्याच्यासमोर खोटे बोलायची माझी हिंमत होत नसे. तसे करायला मला शरम वाटली असती. त्या शरमेपायी, मी माझ्या आजीपाशी कधीही खोटे बोललो नाही. एवढ्या दयाळू देवापासून काहीही लपवून ठेवणे अगदी अशक्य होते. माझ्या आठवणीनुसार, तसे करण्याकडे माझा कधीही कल नव्हता.

एके दिवशी दारू-दुकानदाराच्या बायकोचे माझ्या आजोबांशी खडाजंगी भांडण झाले. त्या बाईने निंदानालस्ती करताना त्यात माझ्या भाबड्या आजीलाही गोवले आणि तिच्या अंगावर गाजर फेकून मारले.

"हे भल्या बाई, तू अगदी शतमूर्ख आहेस!" आजीने शांतपणे प्रतिटोला हाणला. पण आजीचा अपमान माझ्या मनाला फार झोंबला होता आणि त्याचा बदला घेण्याचे मी ठरविले.

त्या लठ्ठ, तांबड्या केसांच्या, दुहेरी हनुवटीच्या आणि पिचपिच्या डोळ्यांच्या बाईचा सूड कोणत्या तऱ्हेने घ्यावा, यावर मी बराच विचार केला.

आमच्या शेजाऱ्यांच्या परस्पर युद्धांमध्ये मांजरांच्या शेपट्या तोडून, कुत्र्यांना वीष घालून, कोंबड्या ठार मारून किंवा शत्रूच्या तळघरात रात्री चोरून जाऊन लोणच्यांच्या आणि मुरांब्यांच्या बरण्यांमध्ये रॉकेल ओतून किंवा क्वासच्या बाटल्यांची झाकणे काढून टाकून सूड घेतले जात असत, हे मी पाहिले होते. पण ह्यांपैकी कोणताही सूडाचा प्रकार मला समाधानकारक वाटत नव्हता. त्यापेक्षाही धाडसी आणि भयानक प्रकार शोधून काढणे आवश्यक होते.

म्हणून मी पुढील उपाय योजला : दारू-दुकानदाराची बायको जेव्हा तळघरात उतरली तेव्हा मी ताबडतोब वरचे झडपेचे दार बंद केले, त्याला कुलुप घातले, त्यावर आसुरी नाच केला आणि किल्ली छपरावर भिरकावून

दिली. नंतर धावत मी स्वैंपाकघरात गेलो. आजी स्वैंपाकात गुंतली होती. पहिल्यांदा माझ्या आनंदाचे कारण तिला उमजले नाही. पण जेव्हा तिला ते समजले तेव्हा तिने माझ्या पृष्ठभागावर चापटचा हाणल्या, मला खेचत आवारात आणले आणि किल्ली शोधून काढण्यासाठी छपरावर पाठविले. तिच्या ह्या प्रतिक्रियेने मी अगदी हिरमुसला झालो. मुकाटपणे तिला किल्ली शोधून दिली आणि आवाराच्या एका कोपऱ्यात धावत जाऊन उभा राहिलो. माझ्या आजीने कैद्याला सोडविलेले मी तेथूनच पाहिले. त्या दुष्ट बाईबरोबर चालत आजी जेव्हा माझ्या दिशेने येत होती, तेव्हा त्या दोघीही गालातल्या गालात हसत होत्या.

"याबद्दल चांगला समाचार घेईन तुझा!" आपली जाडजूड मूठ दाखवीत ती दारू-दुकानदाराची बायको मला उद्देशून म्हणाली. पण तिच्या पिचपिच्या डोळ्यांच्या तोंडावर हसू उमटलेले होते. आजीने माझी कॉलर पकडली आणि मला स्वैंपाकघरात नेले.

"कशासाठी केलंस तू तसं?" तिने विचारले.

"तिनं तुला गाजर फेकून मारलं नाही?"

"अस्सं? म्हणजे माझ्यासाठी तू असं केलंस? थांब तुला दाखवते घमेंडखोर कारट्या! तुला मी उंदरांबरोबर चुलाण्याखाली कोंडून घालते, मग थोडा ताळ्यावर येशील! मोठा वीर शोभून दिसशील! सगळ्यांना बोलावून दाखवीन: बघा रे बघा, हा फुसका फुगा फुटायच्या आधी बघा! आता हे जर मी तुझ्या आजोबांना सांगितलं तर तुझ्या पाठीची चामडी ते सोलून काढतील की नाही? जा वरच्या खोलीत आणि तुझी पुस्तकं वाचत बैस!"

त्या दिवशी बाकीचा सबंध दिवस ती माझ्याशी बोलली नाही. संध्याकाळी देवाची प्रार्थना करण्यापूर्वी ती माझ्या बिछान्यापाशी बसली. त्यावेळी तिने उच्चारलेले शब्द मी कधीही विसरलो नाही:

"बरं का बाळा, एक गोष्ट लक्षात ठेव: मोठ्या माणसांच्या भानगडींमध्ये कधीही नाक खुपसू नकोस. मोठी माणसं ही कष्टांमधून आणि मोहांमधून गेल्यानं बिघडलेली असतात. पण तू अजून त्यातून गेलेला नाहीस – अजून बिघडलेला नाहीस. तेव्हा तुझ्या बालवयाला योग्य अशा रीतीनं जगत जा. देव जोवर तुला तुझ्या आयुष्याचा रस्ता दाखवत नाही, तुझ्या

काळजाला स्पर्श करून तुझी या जगातली कामगिरी दाखवत नाही, तोवर वागडून घे. समजलं? आणि कुणाला कशाबद्दल दोषी ठरवायचं — हे तुझं काम नाही. देव ते ठरवील आणि त्याप्रमाणं शिक्षा करील. ते त्याचं काम आहे, आपलं नाही."

एक मिनिटभर ती गप्प बसली. थोडी तपकीर तिनं ओढली व उजवा डोळा बारीक करीत पुढे म्हणाली:

"कुणाला दोषी ठरवायचं त्याचा निर्णय घेणं काही वेळा देवालासुद्धा कठीण जातं."

"का? त्याला सारं काही माहीत असतं ना?" मी आश्चर्याने विचारले.

ती खेदाने उत्तरली: "जर त्याला तसं माहीत होत असतं, तर लोकांनी अनेक गोष्टी केल्या नसत्या. वर आकाशात बसून आम्हा खालच्या पाप्यांकडं तो पहात असतो आणि काहीवेळा त्याला ओक्साबोक्शी रडू फुटतं! तो रडताना म्हणत असतो: 'अरे माझ्या माणसांनो, माझ्या लाडक्यांनो! तुमच्यासाठी माझ्या काळजाची जखम भळभळा वाहतेय!'"

ती स्वत:सुद्धा रडत होती. डोळे कोरडे करण्याची तसदी न घेता तशीच ती पुतळ्यांसमोर प्रार्थना करण्यासाठी कोपऱ्यात गेली.

त्या वेळेपासून तिचा देव मला जास्त प्रिय बनला आणि जास्त समजू लागला.

आजोबा जेव्हा धडे शिकवीत तेव्हा त्यांनीसुद्धा मला सांगितले होते की, देव सर्वज्ञानी, सर्वसाक्षी, सर्वध्यानी आहे. तो माणसाला सर्व संकटांमध्ये मदत करतो. पण आजोबा आजीप्रमाणे प्रार्थना करीत नसत.

सकाळी पुतळ्यांसमोर जाण्यापूर्वी ते अत्यंत काळजीपूर्वक हात-तोंड धूत. कपडे करीत, केस आणि दाढी विंचरीत. आरशात बघून डगला नीटनेटका करीत, बंडीच्या आत काळी गळपट्टी बांधत आणि चोरपावलांनी पुतळ्यांपाशी जात. लाकडी फळीवर जेथे घोड्याच्या डोळ्यासारखी एक गुठळी होती, तिच्यापाशी ते नेमके थांबत. सैनिकाप्रमाणे हात दोन्ही बाजूंना ताठ धरत. मान खाली घालून त्यांची कृश, ताठ मूर्ती क्षणभर गप्प उभी राही आणि मोठ्या झोकदारपणे ते बोलू लागत:

"बापाच्या, मुलाच्या आणि पवित्र भुताच्या वतीनं!"

या शब्दांनंतर खोलीत विशेष शांतता पसरत असे असा मला भास व्हायचा. माशासुद्धा थोड्या अदबीने गुणगुणायच्या.

आता आजोबांची मान वर झालेली असायची, भुवया पिंजारलेल्या असायच्या, त्यांची सोनेरी दाढी फरशीशी समांतर आडवी झालेली असायची. धडा पाठ म्हणावा त्याप्रमाणे ठासून शब्द उच्चारीत ते खंबीर आवाजात प्रार्थना म्हणत. त्यांची प्रार्थना म्हणजे जोरदार मागणी केल्यासारखी वाटे.

"निर्णयाचा दिवस केव्हा उजाडतो ते कुणाही मानवाला ठाऊक नसतं, माणसांची कृत्यं उजेडात आणण्यासाठी..."

छातीवर हलकेच बुक्क्या मारीत ते देवापाशी आपले मागणे मांडत:

"केवळ तुझ्याविरुद्ध, फक्त तुझ्याविरुद्धच मी पाप केलंय... माझ्या पापांपासून तुझा चेहरा दुसरीकडं वळव..."

"ख्रिश्चन धर्मतत्त्वे" म्हणताना प्रत्येक शब्दावर ते आघात देत आणि उजव्या पायाने ठेका धरीत. अत्यंत ताठपणे, नीटसपणे आणि भव्यपणे ते उभे रहात. त्यांचे सारे शरीर पुतळ्यांकडे झुकलेले असे. ते अधिक उंच झालेत, अधिक बारीक झालेत आणि अधिक कडक झालेत असे त्यावेळी वाटे.

"हे महान धन्वन्तरी, माझ्या अंतःकरणामधून वाईट काढून टाक; माझ्या आत्म्याचं कण्हणं ऐक आणि दया कर, हे देवाच्या माते!"

मग किनऱ्या आवाजात हेल काढून ते विव्हळत. त्यावेळी त्यांचे हिरवे डोळे अश्रूंनी चमकायचे:

"माझी श्रद्धा सत्कारणी लागू दे रे माझ्या देवा, आणि माझ्या शक्तीपलिकडचं ओझं माझ्यावर लादू नको रे ऽऽ..."

भराभरा आणि अंगाला झटके देत, टक्कर देणाऱ्या बोकडाप्रमाणे मुंडी हलवीत, गेंगाण्या, विव्हळणाऱ्या आवाजात बोलत ते पुनःपुन्हा क्रूसाची चिन्हे करीत. पुढे आयुष्यात जेव्हा एकदा यहुद्यांच्या देवळात जाण्याचा माझ्यावर प्रसंग आला तेव्हा मला जाणवले की, माझे आजोबा यहुद्याप्रमाणे प्रार्थना करीत असत.

टेबलावरील समोवार केव्हापासून उकळत होता. चीझ भरलेल्या रायच्या गरमागरम केक्सचा खमंग वास खोलीभर दरवळत होता आणि माझ्या पोटात भुकेचा डोंब उसळला होता. आजी दाराशी टेकून उभी होती. तिची नजर फरशीवर रोखलेली होती, कपाळाला आठ्या पडल्या होत्या आणि अधूनमधून ती उसासे टाकीत होती. खिडकीमधून सूर्याची किरणे

आल्हादकपणे डोकावत होती, झाडांवर दंवाचे थेंब मोत्यांसारखे चमकत होते. सकाळच्या हवेमध्ये बडीशेपेचा, मनुक्याचा आणि पिकत आलेल्या सफरचंदांचा ताजा वास मिसळलेला होता. पण आजोबा अजूनही मागेपुढे डोलत प्रार्थना विव्हळत होते :

"माझ्यासारख्या नीच आणि शापित माणसाच्या वासनांची आग विझवून टाक !"

त्यांची सर्व प्रातःस्मरणे आणि स्तोत्रे मला तोंडपाठ होती. ती म्हणताना आजोबा एखादी चूक करतात अथवा एखादी ओळ गाळतात किंवा नाही याकडे मी सारखा लक्ष ठेवून असे.

असे प्रसंग विरळा घडायचे, पण ते घडत तेव्हा माझ्या मनाला एक आसुरी समाधान लाभायचे.

आजोबांनी प्रार्थना एकदाच्या संपविल्या आणि माझ्याकडे व आजीकडे वळून त्यांनी अभिवादन केले.

आम्हीही झुकून त्यांना अभिवादन केले आणि टेबलापाशी आपापल्या जागी बसलो.

"तुम्ही 'पुरेशी' हा शब्द म्हटला नाही," मी आजोबांकडे वळून म्हटले.

"खोटं बोलत नाहीस ना?" संशयाने त्यांनी विचारले.

"नाही. तुम्ही म्हणायला पाहिजे होतं, 'माझ्या गरजेशी माझी श्रद्धा पुरेशी असो.' पण तुम्ही 'पुरेशी' हा शब्द गाळला."

"हं ऽ!" अपराधी भावनेने डोळ्यांची उघडझाप करीत आजोबा उद्गारले.

त्या शेऱ्याबद्दल पुढे कधीतरी ते माझी सव्याज फेड करीत, पण सध्या मात्र मी त्यांच्या शरमिंदेपणाचा पुरेपूर आनंद लुटत होतो.

एके दिवशी आजी गंमतीने आजोबांना म्हणाली :

"तुमच्या प्रार्थना ऐकताना देव कंटाळून जात असेल. नेहमी तेच तेच म्हणत असता!"

"का ऽऽ य?" आजोबा दरडावणीच्या सुरात म्हणाले. "तू काय बडबडलीस?"

"तुमच्या देवाला तुम्ही आपल्या अंतःकरणापासून एकही शब्द वहात नाही, असं मी म्हणतेय."

रागाने थरथर कापत आणि लालबुंद होत आजोबा खुर्चीवर उडी मारून उभे राहिले व त्यांनी आजीच्या अंगावर बशी भिरकावली.

"थेरडचा चेटकिणी, चालती हो इथून!" काचेवर करवत ओढल्यानंतर जसा आवाज होतो तशा खरवडल्या आवाजात ते ओरडले.

आजोबा जेव्हा जेव्हा देवाच्या सामर्थ्याबद्दल बोलत, तेव्हा तेव्हा ते त्याच्या निष्ठुरतेवर भर देत. उदा. एकदा काही लोकांनी पाप केले तेव्हा ते पुरात बुडाले; दुसऱ्या एका वेळी पापी लोकांची शहरे पेटली आणि नष्ट झाली. लोकांना दुष्काळाने आणि प्लेगने गांजले. आजोबांच्या दृष्टीने देव म्हणजे उगारलेली तलवार होती, दुष्टांच्या डोक्यांवर धरलेला चाबूक होता.

"देवाचा कायदा मोडणाऱ्याला शेवटी शासन घडतंच!" आपल्या हडकुळया बोटांनी टेबलावर टिचक्या मारीत त्यांनी मला इशारा दिला.

पण देवाच्या निष्ठुरपणावर माझा विश्वास बसत नसे. देवापेक्षा मी आजोबांना जास्त घाबरावे म्हणून आजोबांनी ही शक्कल लढविली होती असा मला दाट संशय होता.

"मी तुमचं ऐकावं म्हणून तुम्ही मला हे सांगताय?" मी सरळ विचारले.

"अर्थात," तेवढ्याच परखडपणे ते उत्तरले. "तू ऐकलं नाहीस तर तुझी धडगत नाही!"

"आजीचं काय?"

"त्या मूर्ख म्हातारीचं काही ऐकू नको," ते कडकपणे म्हणाले. "ती सबंध आयुष्यभर तशीच वेडी आणि अडाणी राहिलीय. अशा महत्त्वाच्या गोष्टींबद्दल तुझ्याशी यापुढं तिनं बोलायचं नाही, अशी मी तिला ताकीद देईन. आता मला सांग: देवदूतांच्या दर्जांचे किती प्रकार आहेत?"

मी उत्तर दिले आणि पुढे विचारले:

"'वरच्या दर्जाचा माणूस' याचा अर्थ काय?"

"तुला प्रत्येक गोष्ट जाणून घेतलीच पाहिजे काय?" नजर खाली झुकवून आणि ओठ चावून ते गुरकावले. पण फेरविचारांती त्यांनी अनिच्छेने खुलासा केला:

"त्याचा देवाशी काहीही संबंध नाही. तो माणसांचा व्यवहार आहे.

वरच्या दर्जाची माणसं म्हणजे सरकारी अधिकारी आणि त्यांच्यासारखी माणसं. अधिकारी म्हणजे जो कायद्याच्या कक्षेबाहेर राहतो, त्या कायद्याला चघळून गिळून टाकतो."

"कायदा म्हणजे काय?"

"कायदा? कायदा म्हणजे लोक सवयीनं एखाद्या गोष्टीचा स्वीकार करतात ती बाब," म्हातारबाबा उत्तरले. त्यांच्या तीक्ष्ण, धूर्त डोळ्यांमध्ये समाधानाची चमक होती. "लोक एकत्र राहतात आणि आपापसात करार करतात. एखादी गोष्ट तशा करारानं करणं सर्वांत उत्तम मानलं जातं, म्हणून तशी ते सवय करतात, तसा नियम बनवतात किंवा त्यालाच ते कायदा म्हणतात. म्हणजे जसं मुलं खेळायला एकत्र येतात आणि तो खेळ कसा खेळायचा ते आपापसात ठरवतात तसं! जे ती ठरवतात तो कायदा!"

"आणि अधिकारी?"

"ते वाईट मुलांप्रमाणं वागतात. म्हणजे कायदा मोडतात."

"का?"

"ते तुला समजून घेण्याचं कारण नाही," कपाळाला आठ्या घालीत आजोबा म्हणाले. "माणसांच्या सर्व कारभारांवर देवाचं नियंत्रण असतं. लोकांना एक पाहिजे असतं, तर देवाची इच्छा दुसरीच असते. लोकांपाशी जे आहे ते क्षणभंगुर आहे. देवाचा नुसता एक हुंकार आणि सारं काही धुळीप्रमाणं वाऱ्यावर उडून जातं!"

अधिकाऱ्यांमध्ये मला स्वारस्य असण्याची अनेक कारणे होती. म्हणून मी माझा मुद्दा सारखा रेटीत राहिलो:

"याकोवमामा नेहमी एक गाणं गातो:

"पवित्र देवदूत सेवक देवाचे,
"सरकारी अधिकारी गुलाम सैतानाचे!"

आजोबांनी आपले डोळे मिटून घेतले, हाताच्या तळव्यावर दाढी उचलली आणि तोंडात खुपसली. त्यांच्या गालांची ज्या पद्धतीने थरथर होत होती त्यावरून ते आतल्या आत हसत होते हे मला समजले.

"तुला आणि याकोवला एका पोत्यात बांधून नदीत फेकून दिलं पाहिजे," ते म्हणाले. "त्यानं अशी गाणी गाण्याचं आणि तू ती ऐकण्याचं

काही एक कारण नाही. ते गाणं रास्कोलनिकांनी * आणि पाखंड्यांनी रचलंय! अगदी हलक्या दर्जाचा विनोद आहे." त्यांनी माझ्या पाठीमागे दूर कुठेतरी पहात क्षणभर चिंतन केले आणि उसासा टाकीत ते म्हणाले: "छ्या:! काय माणसं असतात!"

त्यांच्या संकल्पनेप्रमाणे देवाचे माणसांच्या सर्व कारभारांवर वर्चस्व होते आणि तो भीतीदायक होता. पण आजीप्रमाणे त्यांचे असेही मत होते की, त्यांच्या सर्व कारभारात—त्यांच्या आणि असंख्य संतांच्या—परमेश्वराचा हात होता. निकोला, यूरी, फोल आणि लाव्र एवढेच संत माझ्या आजीच्या दृष्टीने दयाळू आणि चांगले होते; ते गावोगाव फिरून लोकांना मदत करीत होते व आपल्या अंगच्या चांगल्या गुणांना वाटीत होते. याउलट माझ्या आजोबांचे सारे संत हे मूर्तिभंजन करून रोमच्या राजांच्या विरुद्ध उभे ठाकलेले हुतात्मे होते. त्या संतांचा छळ झाला होता, त्यांना शूळावर चढवून भाजण्यात आले होते, जिवंतपणी त्यांची कातडी सोलण्यात आली होती.

काहीवेळा आजोबा उत्कंठित सुरात म्हणत: "फक्त पाचशे रूबल नफ्यात हे घर विकायला देवानं जर मला मदत केली, तर मी हुतात्मा निकोलायची पूजा बांधीन!"

आजी त्यावर हसून मला म्हणायची:

"मूर्ख आहे म्हातारा! जणू याची घरं विकून देण्यापलिकडं निकोलायला दुसरा काही धंदाच नाही!"

आजोबांनी स्वत:च्या हस्ताक्षरात वेगवेगळे शेरे लिहून ठेवलेले एक चर्चचे कॅलेंडर मी अनेक वर्षेपर्यंत जपून ठेवले होते. इओकीम आणि आन्ना यांच्या दिवसांच्या पुढे त्यांनी लाल शाईत खरडले होते:

"त्यांच्या कृपेमुळे फार मोठ्या संकटातून बचावलो!"

ते "संकट" म्हणजे काय ते मला आठवते. आपल्या कुचकामी मुलांना मदत करण्याच्या धडपडीत त्यांनी गुपचूपपणे लोकांना पैसे कर्जाऊ द्यायला सुरवात केली होती. तारण म्हणून ते वेगवेगळ्या मौल्यवान वस्तू जवळ

---

* रास्कोलनिक—रशियामध्ये १७ व्या शतकात प्रस्थापित चर्चविरुद्ध निर्माण झालेल्या धार्मिक-सामाजिक चळवळीचे अनुयायी. या चळवळीमधून काही संप्रदाय निर्माण झाले.—सं.

ठेवून घेत. कुणीतरी याबद्दल चुगली केली आणि पोलीस आमच्या घराची झडती घ्यायला आले. खूप खळबळ माजली, पण शेवटी सारे काही ठीक घडले. आजोबा सूर्योदयापर्यंत प्रार्थना करीत बसले होते आणि सकाळी माझ्या समोरच त्यांनी ते शब्द कॅलेंडरवर लिहिले.

रात्रीच्या जेवणापूर्वी त्यांनी माझ्याकडून स्तोत्रांचे पुस्तक किंवा येफ्रेम सीरिनचा* जाडजूड ग्रंथ वाचून घेतला. जेवणानंतर त्यांनी पुन्हा प्रार्थनेला सुरुवात केली. त्या रात्रीच्या शांततेत त्यांचे पश्चात्तापदग्ध एकसुरी शब्द घुमत होते:

"हे दयाघन अमर राजा, देणं आणि घेणं तुझ्याच हाती आहे... आम्हाला मोहात टाकू नकोस... दुष्टांपासून आमचं रक्षण कर... माझ्या अश्रूंनी माझं पाप धुवून जाऊ दे..."

अनेकदा आजी म्हणायची:

"ऐकून ऐकून दमले! आज रात्री माझ्या प्रार्थना न म्हणताच झोपी जाईन असं दिसतंय!"

शनिवारी संध्याकाळच्या प्रार्थनांना आणि रविवारी उशीराच्या पूजेला आजोबा मला चर्चमध्ये घेऊन जात. चर्चमध्ये सुद्धा माणसे कोणत्या देवाची प्रार्थना करीत ते मी सांगू शकत असे. धर्मगुरु आणि पाद्री आजोबांचा देव भजत, तर गायकवृंद मात्र आजीच्या देवाचे गोडवे गात असे.

त्या दोन देवांमधील फरक दाखविणारे बालिश ओबडधोबड चित्र मी रेखाटले आहे यात काही शंका नाही. पण त्यावेळी माझ्या मनात त्या फरकापायी प्रचंड वैचारिक संघर्ष घडल्याचे मला स्मरते. कुणावरही प्रेम न करणाऱ्या आणि प्रत्येकावर करडी नजर ठेवणाऱ्या आजोबांच्या देवाची मला भीती वाटायची व तो आवडायचा नाही. माणसातील काही दुष्टपणा आणि वाईटपणा खणून काढण्यात त्या देवाला मूलतः स्वारस्य होते. लोकांवर तो विश्वास ठेवीत नव्हता, त्यांना पश्चात्ताप केव्हा वाटतो याचीच वाट पहात होता आणि त्यांना शिक्षा करण्यात त्याला खूप आनंद होत असे, हे स्पष्ट होते.

---

*चौथ्या शतकातील ख्रिश्चन धर्मप्रचारक. काही प्रार्थना व धर्मगीतांचा लेखक. – सं.

त्या दिवसांमध्ये माझ्या मनात प्रामुख्याने देवाविषयी विचार येत. आयुष्यात तेवढे एकच सौंदर्य मला आढळले होते. इतर सर्व गोष्टींची घाण व क्रूरता पाहून मला त्यांच्याविषयी घृणा वाटे. माझ्या आजीचा देव हा सर्व सजीव गोष्टींचा मित्र होता; माझ्या भोवतालच्या सर्व गोष्टींमध्ये सर्वांत तेजस्वी आणि सर्वोत्तम होता. त्यामुळे देवाच्या भलेपणाकडे आजोबा का दुर्लक्ष करतात ते साहजिकच मला समजत नसे.

मला रस्त्यावर खेळायची परवानगी नव्हती, कारण रस्त्यावर मी फार चेकाळायचा. तेथे खेळताना येणाऱ्या अनुभवांमुळे मला एक वेगळीच नशा चढायची व एखाद-दुसरी मारामारी मी हमखास उकरून काढायचा. मला मित्र नव्हते. शेजाऱ्यांची मुले माझ्याशी वैर धरून होती. मला कुणी कशीरिन म्हणून हाक मारलेली आवडत नसे आणि हे त्यांना माहीत झाल्यामुळे ती मुले मुद्दाम एकमेकांमध्ये त्या नांवाचा उच्चार करीत.

"आला रे कशीरिनचा नातू, कंजूष! जरा बघा रे त्याला!"

"हाणा त्याला!"

आणि मारामारी सुरू व्हायची.

माझ्या वयाच्या मानाने मी चांगलाच दणकट होतो आणि मारामारी करण्यात पटाईत होतो. माझ्या शत्रूंनीसुद्धा ते कबूल केले होते. म्हणून एकट्याने ते माझ्यावर कधीही हल्ला करीत नसत. त्यामुळे नेहमी त्या सर्वांचा मिळून मी मार खात असे व रक्ताळलेले नाक, फाटलेला ओठ आणि चिंध्या झालेले कपडे अशा अवतारात घरी परतत असे.

तशा अवस्थेत मला पाहून आजी खूप घाबरायची आणि कळवळायची.

"हे काय! कारट्या, परत मारामारी केलीस? थांब, तुला दाखवते आता! कुठून सुरुवात करू?"

ती माझे तोंड धुवायची आणि माझ्या जखमांवर तांब्याचे नाणे ठेवायची अथवा काही मुळ्या किंवा मलम लावायची. दरम्यान तिची बडबड चालू असे:

"अशी मारामारी का करतोस बाबा? घरात एवढा शांत असलेला तू मुलगा रस्त्यावर गेला रे गेला, की सैतान बनतो! लाज वाटली पाहिजे तुला! तुझ्या आजोबांनाच सांगते, तुला बाहेर जायची मना करायला!"

माझी टेंगळे आणि खरचटणी आजोबांच्या नेहमी लक्षात येत. पण त्याबद्दल त्यांना कधीच खरा राग येत नसे. नुसते पुटपुटत :

"पुन्हा पदकं मिळवली वाटतं! वा रे माझा आनिक-योद्धा! * पुन्हा मला रस्त्यात सापडलास तर मात्र खबरदार! समजलं?"

रस्त्यात जेव्हा निवांत असे तेव्हा मला तिकडे मुळीच जावेसे वाटत नसे. पण मुलांचे आनंदी आवाज ऐकू आले रे आले, की आजोबांची ताकीद विसरून मी आवाराबाहेर धूम ठोकायचा. त्या टेंगळांचे आणि खरचटण्यांचे मला एवढे विशेष वाटत नसे. पण मुलांच्या गंमतीमधील पाशवीपणा मात्र मला कधीही मानवला नाही. तो पाशवीपणा माझ्या खूप परिचयाचा झाला होता आणि त्यामुळे माझे अक्षरशः माथे फिरत असे. कोंबड्यांच्या आणि कुत्र्यांच्या त्या मुलांनी लावलेल्या झुंजी पाहणे, मांजरांचा त्यांनी केलेला छळवाद पाहणे, यहुद्यांच्या मालकीच्या बकऱ्यांची त्यांनी केलेली ससेहोलपट पाहणे, मला असह्य होई. तसेच ती मुले दारुड्या भिकाऱ्यांची रेवडी उडवीत आणि भाविक "खिशात मरण ठेवणाऱ्या इगोशाला" खूप छळत.

हा इगोशा म्हणजे उंच, हडकुळा, कळकट माणूस होता. त्याच्या रोड चेहऱ्यावरची दाढी पिंजारलेली असे. जमिनीवर डोळे रोखून तो रस्त्यावरून जाऊ लागला म्हणजे लांब मेंढकातडी कोटामधील त्याची बाक आलेली आकृती विचित्रपणे हेलकावे घ्यायची. त्याचा दुःखी बारीक डोळ्यांचा काळपट चेहरा पाहताच त्याच्याविषयी मला आदरयुक्त भीती वाटायची. मला असे भासायचे की, हा माणूस कसल्यातरी अत्यंत गंभीर पवित्र कामात गुंतलेला आहे आणि त्यात त्याला अडथळा करणे योग्य नाही.

पण मुले त्याच्यामागे धावायची आणि त्याच्या कुबड आलेल्या पाठीवर दगड मारायची. काही वेळपर्यंत तो त्यांच्याकडे लक्ष देत नसे. जणू काही त्या दगडांचा मार त्याला लागतच नसे. पण मग अचानक तो थांबायचा,

---

* आनिक आणि मृत्यू यांच्याविषयीच्या धार्मिक गीताचा नायक. आनिक हा स्वतःला अजिंक्य समजत होता पण मृत्यूने त्याचा पराभव केला. बोली भाषेत 'आनिक' म्हणजे "दुःखी योद्धा" अशा अर्थाने शब्दप्रयोग केला जातो. – सं.

मान वर करून सभोवार पहायचा आणि नुकतेच झोपेतून उठावे त्याप्रमाणे आळोखेपिळोखे देत आपली केसाळ टोपी नीट करायचा.

"खिशात मरण ठेवणाऱ्या इगोशा! तू चाललास कुठं? जरा खिशात बघ—मरण तिथं आहे की नाही?" मुले ओरडायची.

आपला खिसा गच्च पकडून तो खाली वाकायचा, खडा किंवा मातीचे ढेकूळ उचलून आपल्या लांब हाताने बेंगरूळपणे भिरकावायचा व ओठातल्या ओठात शिव्या हासडायचा. तो नेहमी त्याच त्या तीन शिव्या द्यायचा. मात्र मुलांचे शब्दभांडार कमालीचे संपन्न होते. काहीवेळा इगोशा त्या मुलांमागे लंगडत धावायचा. त्याचा लांब कोट त्याच्या पायांमध्ये येई व तो अडखळून गुडघ्यांवर खाली पडे. अशावेळी आपल्या कळकट हातांचा आधार घेऊन तो ओणवा राही. ते हात वाळलेल्या काटक्यांप्रमाणे भासत. मग मुले त्याला खडे मारीत. त्यातील काही धीट मुले सरळ त्याच्या जवळ धावत जात आणि मूठभर माती त्याच्या डोक्यावर उधळून पळून जात.

रस्त्यावरचे सर्वांत वेदनादायी दृश्य म्हणजे आमचे पूर्वीचे कामगार ग्रिगोरी इवानोविच यांना भीक मागताना पाहणे. ते संपूर्ण आंधळे झाले होते आणि शहरात भीक मागून दिवस घालवीत होते. त्यांच्या उंच, गप्प आणि देखण्या आकृतीला एक छोटीशी म्हातारी बाई दारोदार फिरवी आणि आपल्या किनऱ्या बारक्या आवाजात ओरडत असे:

"ख्रिस्ताच्या प्रेमाखातर, आंधळ्या भिकाऱ्याला मदत करा..."

ग्रिगोरी इवानोविच मात्र काहीही बोलत नसत. त्यांच्या चष्म्याच्या काळ्या काचा थेट घराच्या भिंतीकडे अथवा खिडकीकडे अथवा भेटणाऱ्या माणसाच्या चेहऱ्याकडे सरळ पहात रहात. रंग मुरलेला त्यांचा हात शांतपणे त्यांची भव्य दाढी कुरवाळीत रहायचा. पण त्यांचे ओठ मात्र घट्ट मिटलेले असत. मी अनेकदा त्यांना पहात असे, पण त्या घट्ट मिटलेल्या ओठांमधून आवाज बाहेर पडलेला मात्र मी कधीच ऐकला नाही. त्यांचे हे मौनच मला सर्वांत जास्त दडपून टाकायचे. मी कधीही त्यांच्या जवळ गेलो नाही. तसे करणे मला कधीच जमले नाही. मात्र जेव्हा जेव्हा त्यांना पहात असे तेव्हा तेव्हा धावत घरात जाऊन आजीला सांगायचा:

"ग्रिगोरी येताहेत!"

"अरे देवा!"

ती कळवळून उद्‌गारायची. "जा, पळत जाऊन त्यांना दे हे!"

मी उर्मटपणे नकार द्यायचा. मग ती स्वतःच फाटकापर्यंत जायची आणि खूप वेळपर्यंत तेथे त्यांच्याशी बोलत उभी रहायची. ग्रिगोरी हसून आपली दाढी हलवायचे, पण क्वचित एखादा शब्द बोलत.

काहीवेळा आजी त्यांना स्वैपाकघरात आणून खाऊ घालायची. एकदा त्यांनी माझी चौकशी केली. आजीने मला हाक मारली, पण मी पळालो आणि लाकडांच्या ढिगामागे लपलो. मला त्यांना भेटवत नव्हते. त्यांच्यासमोर मला कमालीची शरम वाटायची आणि माझ्या आजीलाही तसेच वाटत असे हे मला ठाऊक होते. फक्त एकदाच ती आणि मी ग्रिगोरींबद्दल बोललो: फाटकापर्यंत ग्रिगोरींना पोहोचवून एकदा ती खालच्या मानेने रडत अंगणातून परत येत होती, तेव्हा मी तिच्यापाशी जाऊन तिचा हात धरला.

"नेहमी त्यांच्यापासून लांब का पळतोस?" तिने शांतपणे विचारले. "त्यांना तू इतका आवडतोस आणि ते इतके भले आहेत.."

"आजोबा त्यांना खाऊ का घालत नाहीत?" मी विचारले.

"आजोबा?"

ती एकदम थांबली, मला तिने पोटाशी ओढून घेतले आणि जणू भविष्यवाणी पुटपुटली:

"माझे शब्द लक्षात ठेव. परमेश्वर याबद्दल आम्हाला फार मोठी शिक्षा करील! फार मोठी शिक्षा!"

तिची भविष्यवाणी चुकली नाही. त्यानंतर सुमारे दहा वर्षांनंतर, जेव्हा माझी आजी एव्हाना चिरविश्रांती घेत होती, तेव्हा वेड लागलेले माझे आजोबा शहरातील रस्त्यांवरून भीक मागत फिरत होते. दारोदार जाऊन केविलवाणेपणे गोळाभर अन्न मागत होते.

"भल्या माणसांनो, मला समोशाचा एक तुकडा द्या हो... अगदी लहानसाच ... छ्याः, काय माणसं तरी!"

त्यांचा तो कडवट, अंतःकरणापासून उच्चारलेला "छ्याः, काय माणसं तरी!" हा उद्‌गार तेवढा त्यांच्या पूर्वीच्या व्यक्तिमत्वाची आठवण करून देणारा उरला होता.

इगोशा आणि ग्रिगोरी यांच्याशिवाय व्होरोनिखा नांवाची एक व्यसनी म्हातारी होती. ती नुसती दुरून दृष्टीला पडली तरी मी रस्त्यावरून घरात

धूम ठोकायचा. दर रविवारी ती अवाढव्य, विस्कटलेली, झिंगलेली बाई रस्त्यांवर अवतरायची. तिची चालण्याची एक खास ढब होती. असे भासायचे की तिची पावले जागची हलत नसत किंवा जमिनीला टेकत नसत, तर एखाद्या काळ्या ढगासारखी तरंगत ती आपली अश्लील गाणी रेकत जायची. ती दिसताच रस्त्यावरची माणसे पळ काढायची, दुकानांमध्ये लपायची, कोपऱ्यांमागे आणि कुंपणांमागे दडायची. ती रस्ता एकदम साफ करायची. तिचा चेहरा निळा होता आणि फुग्यासारखा फुगलेला होता. तिचे बटबटीत राखाडी डोळे भयानकपणे गरगर फिरायचे. काहीवेळा ती विव्हळायची :

"माझी मुलं कुठं आहेत? माझी मुलं?"

तिच्या त्या विव्हळण्याचा अर्थ मी आजीला विचारला.

"तू अजून लहान आहेस ते समजून घ्यायला," आजी प्रथम म्हणाली. पण नंतर तिने अगदी थोडक्या शब्दांमध्ये खुलासा केला : त्या बाईचा नवरा एकेकाळी वोरोनोव नांवाचा एक अधिकारी होता. नोकरीत बढती मिळावी म्हणून त्याने आपल्या बायकोला आपल्या प्रमुखाला विकले. तो प्रमुख तिला दोन वर्षांसाठी स्वतःबरोबर घेऊन गेला. ती परत आली तेव्हा तिची दोन्ही मुले – एक मुलगा व एक मुलगी – मरण पावली होती. तिच्या नवऱ्याने सार्वजनिक पैसे जुगारात घालविले होते व त्याबद्दल तो कारागृहात होता. दुःख दडपून टाकण्यासाठी ती दारू पिऊ लागली आणि बदफैली आयुष्य जगू लागली. आता दर रविवारी पोलिस तिला रस्त्यावरून उचलून नेत.

रस्त्यांपेक्षा घर कितीतरी पटींनी चांगले होते यात काही शंका नव्हती. विशेषतः जेवणानंतर आजोबा जेव्हा याकोवमामाकडे जात आणि खिडकीशी बसून माझी आजी मला माझ्या वडिलांच्या कथा आणि आठवणी सांगत बसे, ते तास फार छान जात.

बोक्यापासून वाचविलेल्या त्या मैनेचा तुटलेला पंख तिने परत जोडला होता व त्या पाखराच्या पायाला एक बारीक काडी चतुराईने जोडली होती. आता ती मैना बरी झाली होती, तेव्हा आजी तिला बोलायला शिकवू लागली. खिडकीत टांगलेल्या पिंजऱ्यापाशी आजी आख्खा तास उभी राही आणि पाखराला शिकवू इच्छिणारे शब्द पुनःपुन्हा बोलत राही.

"म्हण बघू: पाखराला हवी खीर!"

ते पाखरू आपला वाटोळा डोळा वटारून आजीकडे पाही, पिंजऱ्याच्या तळावर आपला लाकडी पाय आपटी, मान लांब करी, वेगवेगळ्या पाखरांच्या आवाजाची नक्कल करी, मांजरासारखे 'म्या ऽ ऊ' करी अथवा कुत्र्या-प्रमाणे भंकून दाखवी. पण माणसाप्रमाणे बोलण्याचे आवाज काढणे त्याला जमत नव्हते.

"पुरे झाला तुझा मूर्खपणा!" आजी अत्यंत गंभीरपणे मैनेला म्हणे. "आता प्रयत्न कर बघू: पाखराला हवी खीर!"

ते पीसवाले माकड माझ्या आजीच्या शब्दांशी अगदी थोडेसे साधर्म्य असणारे असे काही ओरडले तरी आजी आनंदून हसायची व आपल्या बोटाने पाखराला खीर खाऊ घालायची.

"अरे लबाडा, मला ठाऊक आहे!" ती त्या पाखराला चिडवायची. "मनात असलं तर तू काय वाट्टेल ते बोलून दाखवशील!"

आणि तिने खरेच त्या मैनेला बोलायला शिकविले. काही दिवसांनंतर ती मैना खूपच स्पष्टपणे खीर मागू लागली. आणि आजीला पाहताच "नमस्ते" सारखा वाटणारा ध्वनी काढू लागली.

सुरवातीला पक्ष्याचा पिंजरा आजोबांच्या खोलीत टांगलेला होता. पण लौकरच आजोबांनी त्याला आमच्या पोटमाळ्यावरच्या खोलीत हद्दपार केले, कारण तो आजोबांची नक्कल करू लागला होता. आजोबा आपल्या प्रार्थना अगदी स्पष्ट उच्चारात म्हणत आणि मैना आपली पिवळी चोच पिंजऱ्याच्या दांड्यांमधून बाहेर काढायची आणि म्हणायची:

"खर्रं खर्रं, ऊं ऊं, खर्रं खर्र्रं!"

आजोबांना याचा अपमान वाटला. एक दिवस त्यांनी प्रार्थना मध्येच थांबवली, पाय आदळला आणि ते रागाने ओरडले:

"या सैतानाला मी ठार मारण्याआधी इथून घेऊन जा बघू!"

आमच्या घरात खूप काही गंमती होत्या, खूप काही स्वारस्यपूर्ण होते, पण काहीवेळा मात्र मला विलक्षण उदास वाटायचे. असे भासायचे जणू कसलेतरी प्रचंड ओझे मला दडपून टाकीत होते आणि एका गडद अंधाऱ्या खोल खड्ड्यात मी रहात होतो, मला काहीही दिसत नव्हते, ऐकू येत नव्हते, जाणवत नव्हते. जणू मी पूर्ण आंधळा होतो आणि फक्त अर्धाच जिवंत होतो.

८

अगदी अनपेक्षितपणे आजोबांनी आमचे घर दारू-दुकानदाराला विकले आणि कानातनाया रस्त्यावर दुसरे विकत घेतले. हा रस्ता स्वच्छ आणि निवांत होता. त्याच्यावर फरसबंदी नव्हती आणि खूप गवत वाढले होते. हा रस्ता थेट मैदानांमध्ये जायचा आणि त्याच्या दुतर्फा छोटी, भडक रंगविलेली घरे होती.

नवे घर जुन्यापेक्षा अधिक आल्हादक आणि आनंददायी होते. त्याचा दर्शनी भाग गडद लाल रंगविलेला होता व त्याच्या पार्श्वभूमीवर खालच्या मजल्यावरच्या तीन खिडक्यांच्या निळ्या झडपा व पोटमाळ्यावरच्या खिडकीची कोरीव झडप अगदी ठळकपणे उठून दिसत होती. छपराच्या डाव्या बाजूला एल्मच्या आणि लिंबोणीच्या झाडांच्या फांद्यांची किनार होती. आवारात आणि बागेत लपण्यासारख्या अनेक मोहक जागा होत्या. जणू लपंडाव खेळण्यासाठी त्या खास तयार केल्या होत्या असे एखाद्याला वाटावे. बाग जरी खूप मोठी नसली तरी आल्हादक होती. तिच्यात झुडुपांची दाटी झाली होती. एका कोपऱ्यात खेळण्यासारखे दिसणारे छोटे, व्यवस्थित न्हाणी-घर होते. दुसऱ्या कोपऱ्यात एक रुंद, खोल खळगा होता. त्यात तण वाढले होते आणि त्यामधून पूर्वीच्या न्हाणीघराचे जळके खुंट डोकावीत होते. डावीकडे कर्नल ओवस्यान्निकोव यांच्या तबेल्यांनी बागेला मर्यादा घातली होती; उजवीकडे बेतलेंग कुटुंबांच्या देवडचा बागेला लागून उभ्या होत्या. बागेच्या दूरच्या टोकाला पेत्रोव्ना नांवाच्या लठ्ठ, लालबुंद तोंडाच्या व मोठ्या घंटे-प्रमाणे घणघणा बडबड करणाऱ्या गवळणीची इस्टेट होती. तिचे काळपट आणि किरकोळ खोपट जमिनीवर निवांत विसावले होते. त्या खोपटावर दाट शेवाळे माजले होते. त्याच्या दोन खिडक्या मैदानांच्या दिशेला होत्या. त्या मैदानांपलिकडे अनेक घळी होत्या व दूर जंगलाची निळसर धूसर किनार दिसायची. सारा दिवसभर या मैदानांमध्ये शिपायांच्या कवायती चालायच्या. शारदीय उन्हात त्यांची बागनेटे पांढऱ्या विजेसारखी लख्खदिशी चमकायची.

आमच्या घरात भरलेली माणसे यापूर्वी मी कधीही पाहिलेली नव्हती. पुढच्या गाळ्यात जन्माने तातार असलेला एक लष्करी माणूस रहात होता. त्याची गोल वाटोळी छोटीशी बायको सारखी हसत-खिदळत असायची व

सकाळपासून रात्रीपर्यंत एक सुंदर नटवलेले गिटार वाजवीत असायची. आपल्या उंच, भिंगरीसारख्या आवाजात हे एक गाणे ती अनेकदा गायची :

आवडत नसताना करायचं प्रेम ?
छी : मुळीच नाही ! शहाणा असशील,
तर झटदिशी दुसरी पोरगी गाठशील.
बक्षिशी तुझी असेल सुंदर,
देखणी जणू मोत्याचा सर !
दाणेदा ऽऽ र मोत्याचा सर ! !

चेंडूसारखा गोल अंगाचा तिचा नवरा आपले निळसर गाल फुगवून खिडकीशी पाईपचे झुरके मारीत बसायचा व आपले छोटुकले बदामी रंगाचे आनंदी डोळे गरगरा फिरवीत चमत्कारीक रीतीने खोकायचा :

"आ-र-रफ ! आ... र-रफ्-उफ् उफ् !"

गुदामाच्या आणि तबेल्याच्या वरती बांधलेल्या उबदार खोल्यांमध्ये दोन खटारेवाले आणि वालेई नांवाचा एक दुर्मुखला चपरासी रहात. एक खटारेवाला लहानखुरा, पिकल्या केसांचा होता. त्याला ते प्योत्रकाका म्हणत. दुसरा खटारेवाला त्यांचा मुका-बहिरा पुतण्या स्त्योपा होता. स्त्योपा उंच शिडशिडीत व तुळतुळीत होता. त्याचा चेहरा पितळी ताटलीसारखा दिसायचा. ही सारी माणसे मला नवी होती आणि त्यांच्याविषयी माझ्या मनात खूप अपेक्षा निर्माण झाल्या होत्या.

पण मला सर्वांत आकर्षण वाटले ते आमच्या घरी जेवूनखाऊन राहणाऱ्या "झकास"चे ! घराच्या मागल्या अंगाला, स्वैपाकघराच्या शेजारच्या खोलीत तो रहायचा. त्या लांबलचक खोलीला दोन खिडक्या होत्या ; एक बागेच्या दिशेला व दुसरी अंगणाच्या.

हा भाडेकरू उंच आणि पाठीला पोक आलेला होता. त्याची हनुवटीवर विभागलेली काळी दाढी त्याच्या चेहऱ्याचा फिकटपणा ठळकपणे जाणवून देत होती. त्याचे डोळे प्रेमळ होते आणि तो चष्मा वापरायचा. एकूणच तो शांत आणि मागे मागे राहणाऱ्यांपैकी होता. चहा किंवा जेवण तयार आहे असे त्याला सांगितले म्हणजे तो नेहमी म्हणायचा :

"झकास !"

त्याच्या पाठीमागे आजीने त्याला "झकास" म्हणून संबोधायला सुरुवात केली व नंतर तर त्याच्या तोंडावरही ती त्याला "झकास" म्हणून हाक मारू लागली.

"ल्योन्का, त्या "झकास"ला चहा प्यायला बोलव," ती म्हणायची, किंवा "आणखी थोडं घे 'झकास', तू फारसं खात नाहीस!"

त्याच्या खोलीत लाकडी खोक्यांच्या आणि नागरी टाईपातील* पुस्तकांच्या राशी पडल्या होत्या. तसेच वेगवेगळ्या रंगाचे द्रव भरलेल्या बाटल्या, तांब्याचे तुकडे, लोखंडाच्या व जस्ताच्या लगडी पडल्या होत्या. तो नेहमी चॉकलेटी रंगाचे कापडी जाकीट आणि राखाडी चौकड्यांची पँट घालीत असे. त्याच्या कपड्यांवर रंगाचे डाग पडलेले होते व त्यांना घाण वास येई. सकाळपासून रात्रीपर्यंत तो खोलीत उभा राहून शिसे वितळवीत असे, तांबे सांधत असे, छोट्या तराजूत काहीतरी वजन करून सारखा डुरकत असे. त्याची बोटे भाजत, त्यावर फुंकरी घालीत तो धडपडत भिंतीवर लटकावलेल्या आकृतींपाशी जायचा, चष्म्याच्या काचा पुसून त्या आकृती एवढ्या जवळून निरखून पहायचा, की त्याचे खडूसारखे नाक त्या आकृत्यांना जवळ जवळ टेकत असे. काहीवेळा खोलीच्या मध्यभागी किंवा खिडकीशी तो अगदी स्तब्ध उभा रहायचा. असे डोळे मिटून, डोके वर उचलून, मूकपणे, काहीही हालचाल न करता तो खूप वेळपर्यंत उभा रहात असे.

मी आवारातल्या शेडच्या छपरावर चढून उघड्या खिडकीमधून त्याला निरखून पहात बसायचा. टेबलावर जळणाऱ्या स्पिरिटच्या दिव्याची निळी ज्योत व टेबलावर वाकलेली त्याची आकृती मला दिसायची. एका जीर्णशीर्ण वहीत तो काहीतरी लिहीत असलेला मी पाहू शकत असे. त्याच्या चष्म्याच्या काचा निळ्या बर्फाच्या तुकड्यांप्रमाणे थंडपणे चमकत. त्या माणसाच्या भूत-विद्येच्या कुतूहलापायी मी तासचे तास छपरावर बसून त्याच्याकडे टक लावून पहात बसायचा.

काहीवेळा हात मागे धरून थेट छपराकडे टक लावून पहात तो खिडकीच्या चौकटीत उभा रहायचा. पण मला तो पहायचा असे कधीही वाटले

---

*नागरी टाईप – चर्चमधील स्लाव भाषेऐवजी पहिल्या पीटरने सुरू केलेली नागरी टाईपातील छपाई. – सं.

नाही आणि त्याचाच मला राग येत असे. अचानक उडी मारून तो परत टेबलापाशी जायचा आणि घाबरटपणे कागद चाळवीत व तेथील वस्तूची हलवाहलव करीत दुप्पट वाकून कामाला लागायचा.

तो जर श्रीमंत आणि व्यवस्थित पोषाखात असता, तर कदाचित त्याची मला भीती वाटली असती. पण तो गरीब होता. त्याच्या कातडी जाकीटा-मधून त्याची मळकी, चुरगळलेली कॉलर बाहेर डोकवीत असे, त्याच्या पँटीवर ठिगळे होती व डाग पडले होते, मोजेविरहीत पायांवर त्याने चढवलेले बूट वापरण्याच्या लायकीचे नव्हते. गरीब लोकांपासून कसलाही धोका नसतो किंवा त्यांच्या बाबतीत भीतीदायक असे काहीही नसते. माझी आजो त्यांची ज्या पद्धतीने कीव करी व माझे आजोबा ज्या पद्धतीने त्यांचा तिटकारा करीत, त्यावरून मी हे शिकलो होतो.

आमच्या घरात "झकास" कुणालाही आवडत नसे. प्रत्येकजण त्याच्या-विषयी कुचेष्टेने बोलत असे – लष्करी माणसाची आनंदी स्वभावाची बायको त्याला "खडूनाक्या" म्हणे, प्योत्रकाका त्याला केमिस्ट आणि जादुगार म्हणत, तर आजोबा त्याला जादूटोणा करणारा "वैदू" म्हणत.

"तो काय करतो?" मी आजीला विचारले. पण तिने तुसडेपणाने म्हटले:

"तुला काय करायच्यात नसत्या पंचाईती? थोबाड केव्हा बंद ठेवायचं ते शीक आता!"

एक दिवस मी सगळा धीर गोळा करून त्याच्या खिडकीपाशी गेलो.

"तुम्ही काय करताय?" मी विचारले. माझी उत्सुकता लपवून ठेवणे मला फारसे जमले नाही.

तो दचकला आणि नंतर चष्म्याच्या काचांवरून खूप वेळपर्यंत माझ्याकडे टक लावून पहात राहिला. मग त्याने आपला भाजलेला व जखमांचे वण पडलेला हात पुढे करून म्हटले:

"धर आणि आत ये चढून."

सरळ दारामधून आत यायला सांगण्याऐवजी त्याने मला खिडकीमधून चढून यायचे निमंत्रण दिले या एकाच गोष्टीने त्याच्याबद्दलचा माझ्या मनातला आदर एकदम दुणावला. तो एका खोक्यावर बसला, मला त्याने स्वतःसमोर ठेवले, मग प्रथम एका बाजूला सरकवले, नंतर दुसऱ्या बाजूला हलविले व शेवटी विचारले:

"तू कुठला?"

त्याचा प्रश्न अगदीच चमत्कारीक होता, कारण दिवसातून चार वेळा त्याच्या शेजारीच टेबलाशी बसून मी स्वैंपाकघरात खात होतो.

"मी या घरचा नातू," मी उत्तरलो.

"अरे हो," तो उद्गारला आणि परत गप्प राहून स्वतःचे एक बोट न्याहाळू लागला.

पण आणखी स्पष्ट खुलासा केला पाहिजे असे मला वाटले.

"मी कशीरिन नाही—मी पेश्कोव आहे."

"पेश्कोव?" पहिल्या अक्षरावर जास्त जोर देत त्याने माझे आडनांव उच्चारले. "झकास!"

त्याने मला बाजूला सारले व उठून तो परत टेबलापाशी गेला.

"तिथंच बैस आणि गडबड करू नको."

चिमटयांमध्ये धरलेल्या तांब्याच्या तुकड्याला तो कानस कसा मारीत होता ते पहात मी खूप वेळपर्यंत बसून राहिलो. पुरेसे काम केल्यानंतर त्याने तो सोनेरी चुरा गोळा करून एका जाड वाडग्यात भरला. मग -मिठासारखी पांढरीशुभ्र अशी पावडर त्याने एका डब्यातून काढली, त्या तांब्याच्या चुऱ्यात मिसळली व कसलातरी काळा द्रव त्यावर ओतला. वाडग्यातल्या मिश्रणाचा स्स ऽऽ असा आवाज होऊ लागला, त्यातून धूर येऊ लागला आणि एक कडवट वास खोलीत पसरल्याने मी जोरजोराने खोकू लागलो.

"वाईट वास येतोय?" त्या जादुगाराने दिमाखाने विचारले.

"हो!"

"अरे वा! बंधू, हे फार चांगलं, फार फार चांगलं!"

त्याने एवढा दिमाख का दाखवावा तेच मला समजेना.

"तो जर वाईट असेल, तर मग चांगला असणं शक्यच नाही!" मी कडक आवाजात म्हणालो.

"अरे, भलतंच काहीतरी बोलू नको," डोळ्यांची उघडझाप करीत तो ओरडला. "बंधू, ते नेहमीच तसं खरं नसतं! तुला बाब्की * खेळायला आवडतं?"

---

* कवड्यांसारखा रशियन खेळ. **—अनु.**

"फासे?"

"हो हो, फासे!"

"हो, आवडतं!"

"सोंगट्या मारायला तुला धातूची गोटी बनवून देऊ?"

"मला खूप आवडेल!"

"तर मग कवड्या देऊ तुला?"

धूर येणारा वाडगा हातात धरून तो पुन्हा माझ्यापाशी आला.

"हा वाडगा भरून मी तुला कवड्या दिल्या तर तू पुन्हा इथं येणार नाहीस असं वचन देशील?" तिरपा कटाक्ष टाकीत तो म्हणाला.

मला एकदम खूप अपमान वाटला.

"नकोत तुमच्या कवड्या. तसासुद्धा मी कधीही परत येणार नाही!" उलट उत्तर देऊन मी बागेत गेलो.

सफरचंदाच्या झाडांच्या मुळांना आजोबा खत घालीत होते. शरदाचे दिवस होते आणि केव्हाच पानगळ सुरू झाली होती.

"ती रासबेरीची झुडपं छाट," माझ्या हाती मोठी कात्री देत आजोबा म्हणाले.

"हा "झकास" काय करतो?" मी विचारले.

"नुसता गोंधळ," रागाने आजोबा उत्तरले. "खोली घाण करतोय. तक्तपोशी जाळून ठेवलीय, भिंतीच्या कागदावर डाग पाडलेत, एका जागी तर कागदाचा तुकडाही फाडलाय. जागा सोडून दे अशी नोटीस द्यायला पाहिजे त्याला!

"बरोबर आहे," झुडपे छाटता छाटता मी आजोबांना दुजोरा दिला.

पण मी तसे करण्यात फार घाई केली होती.

पावसाळी संध्याकाळी आजोबा जेव्हा घरात नसत तेव्हा आजी स्वैपाकघरात मैफली जमवायची. सगळ्या भाडेकरूंना ती बोलवायची. त्यात खटारेवाले असायचे, लष्करी अधिकारी असायचा आणि आनंदी स्वभावाची ती तरुण बाईसुद्धा असायची. अनेकदा उत्साही पेत्रोव्ना यायची आणि "झकास" नेहमी चुलाण्याशेजारी एका कोपऱ्यात अगदी चूपचाप बसून रहायचा. मुका-बहिरा स्त्योपा तातार वालेईबरोबर पत्ते खेळायचा व वालेई अधूनमधून त्याच्या फताड्या नाकावर हलकेच गुद्दा मारीत म्हणायचा:

"अरे बदमाषा!"

प्योत्रकाका पांढऱ्या पावाचा भलामोठा तुकडा आणि रासबेरीच्या मुरंब्याची बरणी घेऊन यायचे. पावाच्या फाकी कापून त्यांच्यावर ते मुरंब्याचा जाड थर पसरीत आणि तळहातावर ठेवून सर्व पाहुण्यांपुढे फिरवीत.

"घ्या मंडळी घ्या," कमरेत झुकून ते मुरंबा लावलेल्या पावाच्या फाकी लोकांना देत. कुणी पावाची फाक घेतली म्हणजे आपला काळपट पंजा ते निरखून पहात व त्यावर मुरंब्याचे थेंब पडलेले असले तर चाटून टाकीत.

पेत्रोव्ना चेरीची दारू आणायची आणि आनंदी तरुणी दाणे व मिठाई आणायची. आणि मग मेजवानी सुरू व्हायची. माझ्या आजीचा हा मनोरंजनाचा आवडता प्रकार होता.

"झकास" ने मला त्याच्या खोलीपासून दूर राहण्यासाठी लाच देऊ केली होती त्यानंतर लौकरच एक दिवस आजीने अशी मैफल जमवली होती. शारदातील भयानक पाऊस कोसळत होता, वारा भणाणत होता, झाडे उसासे टाकत होती आणि घराच्या भिंतींना घासत होती. स्वैपाकघरात उबदार आणि आरामशीर वाटत होते. लोक एकमेकांच्या जवळ सरकून बसले होते. त्यादिवशी सारे विशेष शांत आणि चांगल्या मन:स्थितीत होते. आजीच्या गोष्टींना नेहमीपेक्षा जास्त रंग चढला होता.

चुलाण्याच्या फळीच्या कडेशी ती बसली होती, पाय पायरीवर टेकवले होते. लोकांच्या दिशेने ती थोडी पुढे झुकली होती तेव्हा छोटचा पत्र्याच्या दिव्याच्या उजेडात तिचा चेहरा उजळून निघाला होता. स्फूर्ती आलेली असली म्हणजे ती नेहमी चुलाण्यावरच्या जागी बसायची.

"मला वर बसून बोललं पाहिजे. असं वरून खाली बोलायला जास्त सोपं जातं," तिने खुलासा केला.

मी तिच्या पायाशी खालच्या पायरीवर बसलो होतो. "झकास"च्या डोक्याच्या नेमके वर. वीर योद्धा इवान आणि संन्यासी मीरोन यांची वेधक कहाणी आजी सांगत होती. तिच्या रसाळ, तालबद्ध वाणीचा ओघ वहात होता :

कोणे एके काळी होता एक गोर्दियन दुष्ट
मन काळेकुट्ट त्याचे, काळीज जणू पाषाण.

सत्याचा तिटकारा, दयेला नाही थारा,
कपटी बिळात होता साप विखारा.

गोर्दियनला सर्वांत राग संन्यासी मीरोनचा
नुसते नांव घेताच तिळपापड अंगाचा.
शांती आणि प्रेम मीरोनला आवडे भारी,
पवित्र सत्याचा सदा तो कैवारी.

धाडले बोलावणे गोर्दियनने सेनापतीला,
इवानुश्का नांवाच्या धाडसी योद्धयाला.
तडक जा त्या थेरड्या मीरोनपाशी,
मगरूर म्हाताऱ्याची खांडोळी कर खाशी.

पांढरी दाढी पकडून त्याची,
बेशक छाट त्याचे मुंडके,
मान कापून आण त्याची,
चंगळ करतील माझे कुत्रे.

आज्ञाधारक इवान कामगिरीवर निघाला,
मनोमनी मात्र खूप शोकाकुल झाला,
माझी नव्हे तर इच्छा माझ्या धन्याची,
क्षमा कर रे देवा असल्या पापकर्माची.

जमिनीखाली तलवार दडवून,
संन्याशाला त्याने मुजरा केला लवून.
हे महामुने तुम्हाला वंदन आमचे!
देवाच्या कृपेने कुशल आहे ना तुमचे?
सर्वज्ञानी मीरोन म्हणाले हसून,
अरे शूर इवाना फसवतोस का म्हणून?
आपला येशू प्रभू सर्वसाक्षी,

वाईट नि बरे दोन्ही त्याच्या हाती,
दुष्ट हेतू तुझा खात्रीने त्याला माहिती.

इवानुश्काची मनोमन झाली फटफजिती,
तरी गोर्दियनच्या सूडाची मनातून धास्ती,
झटदिशी म्यानातून तलवार उपसली,
विषारी पाते लखलखत परजली.

अज्ञानाच्या सुखात तुम्हा ठेवायला,
फुकाच म्या दडवली होती तिला,
आता जाणताच सारे तर टेका गुडघे
शेवटची प्रार्थना करा महामुने.
प्रार्था सर्वांसाठी, माझ्यासाठी, तुमच्यासाठी
छेदीन शुभ्र शीर तुमचे नंतर धन्यासाठी!

ओकच्या कोवळ्या झाडाशी बसला मुनी गुडघे टेकून,
हिरव्यागार फांद्यांनी त्याच्यावर छत्र धरले झुकून.
सौम्य हसून हळुवार आवाजात मुनी म्हणाला,
विचार कर इवान, थांबावे लागेल फार काळ तुला.

साऱ्यांसाठी प्रार्थनेला काळ लागेल अनंत,
कशाला ठेवतोस इतका वेळ मला जिवंत?
एक घाव दोन तुकडे, झटपट मोकळे व्हा बापडे!

रागाचा कटाक्ष इवानने फेकला,
फुशारकी मारीत मुनीला म्हणाला,
छे: छे:! दिला शब्द खरा करीन,
युगभर प्रार्थलात तरी वाट पाहीन.

संन्याशाने केली प्रार्थना रात्र पडेपर्यंत,
रात्रीपासून ते पहाट फुटेपर्यंत,
पहाटेपासून ते काळोख दाटेपर्यंत,
उन्हाळ्यापासून ते थेट वसंतापर्यंत.

वर्षामागून गेली वर्षे तरी भला संन्यासी
गुडघ्यावर टेकलेला, तिकडे ओक भिडला आकाशी.
फळांमधून त्याच्या रान उमटले भोवती,
मंत्र प्रार्थनेचे घुमत होते आसमंती.

आजघटकेलाही त्या रानी
अखंड प्रार्थतात मीरोन महामुनी.
साऱ्यांना मदत कर म्हणून देवाला विनवतात,
साऱ्यांवर कृपा कर म्हणून मेरीमातेला आळवतात.

शेजारी कलंडलाय योद्धा इवान.
म्यान-तलवार कुजून गेली,
चिलखत-शस्त्रे गंजून गेली,
वस्त्रांची लक्तरे विरून गेली.
उन्हात रापूनही – रापलेला नाही,
किड्यांनी खाऊनही – खाल्ला गेलेला नाही.
लांडग्यांपासून बचावला – अस्वलांपासून बचावला,
हिमवादळे सोसली – कडक गारठा साहला,
तरी हलायची तिथून शक्ती नाही,
हात उचलायची वा उभे राह्यची हिंमत नाही.
अशा दुष्टाव्याचा पडला मोह म्हणून
दुसऱ्याच्या इच्छेला पडला बळी म्हणून
घडले त्याला शासन असे!
आम्हा पाप्यांच्या मुक्तीसाठी
महामुनींच्या प्रार्थना वाहती देवापाशी
जसा जातो प्रवाह सागरापाशी!

या गोष्टीच्या आरंभीच माझ्या ध्यानात आले की काही कारणाने "झकास" खूप अस्वस्थ झाला होता. झटके आल्याप्रमाणे त्याच्या हाताच्या हालचाली होत होत्या. तो वारंवार चष्मा काढीत होता आणि घालीत होता. गोष्टीच्या तालाबरोबर चष्म्याने ताल धरीत होता, मान डोलवीत होता, डोळ्यांवर हाताची बोटे घट्ट दाबून धरीत होता व कपाळावरून अणि गालांवरून ओघळणाऱ्या घामाच्या धारा पुशीत होता. कुणी जराशी हालचाल केली वा खोकले अथवा तक्तपोशीवर पाय खरवडला तर अधीरपणाने तो दबत्या आवाजात म्हणायचा :

"श्शू ऽऽ !"

आजीने गोष्ट संपवली तेव्हा हात हवेत उडवीत उडी मारून तो उभा राहिला व खोलीत चक्राकार फेऱ्या घालीत स्वतःशीच बडबडू लागला :

"फारच सुरेख ! सगळीच्या सगळी लिहून काढली पाहिजे ! किती सत्य आहे..."

आता मला स्पष्टपणे दिसले की तो रडत होता. त्याचे डोळे अश्रूंनी डबडबले होते व त्यांच्या धारा त्याच्या गालांवरून ओघळत होत्या. हे फार विचित्र होते तितकेच मन हेलावणारे होते. गंमतीदार उड्या मारीत तो स्वैंपाकघरात फिरत होत्या, डोळ्यांवर परत चष्मा ठेवू पहात होता, पण चष्म्याच्या काड्या कानांवर अडकवणे त्याला जमत नव्हते. प्योत्रकाका एकदा मोठ्यांदा हसले, पण बाकी प्रत्येकजण शरमून गप्प राहिला होता.

"ठीक आहे, लिहून काढ ही गोष्ट," आजी लगबगीने म्हणाली. "त्यात काही पाप नाही. अशा आणखी खूप गोष्टी मला ठाऊक आहेत."

"छेः छेः ! फक्त ही एकच. किती अस्सल रशियन आहे..." तो उत्तेजित स्वरात ओरडला. अचानक तो स्वैंपाकघराच्या मध्यभागी थांबला आणि मोठ्या आवाजात बोलू लागला. त्याच्या उजव्या हाताच्या सतत हालचाली चालू होत्या व डाव्या थरथरणाऱ्या हातात त्याने चष्मा धरला होता. तो तावातावाने खूप वेळपर्यंत बोलत होता, आवाज चढवून आणि पाय आपटून आपल्या शब्दांवर जोर देत होता.

"तुमच्या सदसद्विवेकबुद्धीला दुसऱ्या कुणाच्यातरी तंत्रानं चालविणं चूक आहे !" तो हे वाक्य पुनःपुन्हा उच्चारीत होता.

एकदम त्याचा आवाज थांबला आणि भोवतालच्या चेहऱ्यांकडे एक कटाक्ष

टाकून तो हळूच मान खाली घालून अपराधी भावनेने तिथून मुकाटपणे निघून गेला. बाकीची माणसे गालातल्या गालात हसली आणि त्यांनी एकमेकांकडे अस्वस्थ नजरा फेकल्या. आजी फळीवर मागल्या अंधाऱ्या बाजूस सरकून बसली आणि तिने एक मोठा उसासा टाकला.

"त्याचं काय बिघडलंय? कसला ध्यास घेतलाय?" आपल्या जाड लाल ओठांवरून हात फिरवीत पेत्रोव्नाने विचारले.

"तसं काही नाही," प्योत्रकाका उत्तरले. "त्याची वागायची तऱ्हाच तशी आहे."

आजी चुलाण्यावरून खाली उतरली व समोवार तापवायला तिने सुरुवात केली.

"शिकलेली माणसं नेहमी तशीच असतात – लहरी स्वभावाची!" प्योत्रकाका शांतपणे पुढे म्हणाले.

"ब्रह्मचारी राहिलं म्हणजे हे असं होतं," वालेईने आपले मत मांडले.

सारेजण हसले आणि प्योत्रकाका म्हणाले:

"त्याला रडताना पाहिलंत? मटणाची सवय असली तर भाजीपाला खाऊन राहणं जड जातं!"

स्वैपाकघरातले वातावरण कंटाळवाणे झाले होते. एक निराश उदासीनता माझ्या काळजात खुपत होती. "झकास"ने मला चकित केले होते. मला त्याची दया येत होती. त्याचे अश्रूंनी डबडबलेले डोळे अजूनही माझ्या स्मरणातून पुसले जात नाहीत.

त्या रात्री तो घराबाहेरच कुठेतरी राहिला. दुसऱ्या दिवशी जेवणाच्या वेळेनंतर तो परत आला. तो कमालीचा ओशाळवाणा दिसत होता. त्याचा चेहरा पार उतरला होता.

"काल मी वेडपटासारखा वागलो," एखाद्या लहान मुलाप्रमाणे अपराधी सुरात तो आजीला म्हणाला. "तुम्ही रागावला तर नाही?"

"कशाबद्दल?"

"मी तसं बोललो म्हणून!"

"तू कुणालाही दुखावलं नाहीस!"

आजी त्याला घाबरत होती असे मला जाणवले. ती त्याच्या चेहऱ्याकडे बघत नव्हती आणि फारच हळू आवाजात बोलत होती.

तो तिच्यापाशी गेला आणि अगदी भाबडेपणाने म्हणाला :

"तुम्हाला ठाऊक आहे, मी कमालीचा एकटा आहे. जगात माझं कुणीही नाही. आणि माणूस जेव्हा सदैव गप्प राहून जगतो तेव्हा असा एक क्षण येतो की, त्याच्या मनातली सारी खळबळ एकदम बाहेर उफाळून येते. अशा वेळी तो अगदी दगडांना आणि झाडांना उद्देशून बोलायलाही मागंपुढं पहात नाही..."

"तू लग्न का करत नाहीस?" त्याच्यापासून दूर जात आजीने विचारले

"छे: !" हाताला झटका देत तो उद्गारला आणि कपाळाला आठ्या घालून निघून गेला.

तो तिथून गेलेला आजीने न्याहाळून पाहिले, मग तपकिरीची चिमूट नाकात कोंबली आणि माझ्याकडे वळून ती म्हणाली :

"उगाच त्याच्या भोवती भोवती करत जाऊ नकोस. तो कसा आहे ते काही सांगता येत नाही."

पण मी पुन्हा त्याच्याकडे ओढला गेलो होतो.

"मी कमालीचा एकटा आहे" असे तो म्हणाला होता तेव्हा त्याच्या चेहऱ्यावरचा एकदम बदललेला भाव माझ्या ध्यानात आला होता. त्या शब्दांमधला आशय मला कुठेतरी समजला होता, माझ्या काळजाला त्यांनी हेलावले होते. मी त्याला भेटायला गेलो.

त्याच्या खोलीच्या खिडकीतून मी नजर टाकली. तो खोलीत नव्हता. तिथे अनेक विचित्र आणि निरर्थक गोष्टी पडल्या होत्या. त्या वस्तूंचा मालकही तसाच विचित्र आणि निरर्थक होता. मी बागेत गेलो : खड्ड्यामधील एका जळक्या ओंडक्यावर तो पोक काढून बसलेला मला आढळला. त्याच्या हाताचे कोपरे त्याने आपल्या गुडघ्यांवर टेकवले होते व मानेमागे हात एकमेकात गुंफवले होते. ओंडक्यावर घाणीचा थर साचला होता. खाज-कुयल्या, कडू दवणा आणि काटेरी झुडपांच्या दाटीतून त्याचे एक टोक वरती आले होते. तेथे बसणे मुळीच आरामाचे नव्हते हे स्पष्ट दिसत होते आणि त्यामुळे मी त्याच्याकडे जास्तच ओढला गेलो.

बराच वेळ तो घुबडाच्या डोळयांप्रमाणे काही न पाहता माझ्यापलिकडे दूर कुठेतरी नजर रोखून बसला होता. पण अचानक त्याने काहीशा तिरसटपणे मला विचारले :

"माझ्याकडं आलास ?"

"नाही."

"मग ?"

"काही विशेष नाही."

त्याने चष्मा काढला व काळे-तांबडे डाग पडलेल्या रुमालाने काचा पुसल्या.

"उतर खाली."

मी त्याच्या शेजारी बसलो तेव्हा त्याने मला घट्ट मिठी घातली.

"बैस इथं. आपण नुसतं बसून राहू या आणि काहीही बोलायचं नाही, ठीक आहे? आवडतं असं... तू निग्रही पोरगा आहेस ?"

"हो."

"झकास."

काहीही न बोलता खूप वेळपर्यंत आम्ही तेथे बसून राहिलो. शरदाच्या अखेरच्या काळातील ती एक निवांत, उदास संध्याकाळ होती. हिरवा बहर बघता बघता झडून जात होता आणि तुरकाटचा उभ्या होत्या. मातीमधून उन्हाळ्याचे दाट गंध आता येत नव्हते. फक्त गारठ्याचा दमट दर्प येत होता. वातावरणात एक विचित्र तरलता होती आणि गुलाबी आकाशात कावळे झेपावताना पाहून मनात निराशेचे विचार उमटत होते. सारे काही गप्प आणि मूक बनले होते. त्यामुळे पक्ष्याचा पंख जरी फडफडला किंवा पान जरी झाडावरून गळून पडले तरी त्याचा मोठा आवाज होऊन दचकायला होई. असे दचकून सभोवार पहावे तो पुन्हा चोहोबाजूंना शांततेने गुरफटून टाकलेले असे.

अशा क्षणी अगदी विशुद्ध विचार मनात निर्माण होतात. पण कोळयाच्या जाळ्याप्रमाणे अगदी नाजुक आणि पारदर्शी असतात. त्यांना शब्दांमध्ये पकडणे अवघड जाते. तुटलेल्या ताऱ्यांप्रमाणे ते चमकून अंतर्धान पावतात. मन खिन्नतेने दाटून येते किंवा हुरहुरत राहते, डहुळते, क्षुब्ध होते, त्याला कायमच्या रेषांचे पैलू पडू लागतात. अशा क्षणी स्वभाव घडत असतो.

माझ्या सोबत्याच्या उबदार शरीराला चिकटून बसून मी त्याच्या जोडीने सफरचंदाच्या फांद्यांच्या काळ्या नक्षीदार जाळीमधून नजर टाकली. तांबड्या-भडक आकाशात गाणारे पक्षी संथ तरंगत होते, रसाळ बिया मिळण्याच्या

आशेने पिवळे पक्षी सलगमच्या कोरडया शेंडयांवर चोची मारीत होते, निस्तेज कडा असलेले करडे विस्कळीत ढग सबंध मैदानावर ओठंगले होते व त्यांच्याखालून कावळ्यांचा जथा चर्चच्या आवारातील आपल्या घरटयांकडे परत चालला होता. हे सारेच्या सारे विलक्षण छान आणि आकलनीय होते.

काहीवेळा माझा सोबती एक खोल सुस्कारा टाकून म्हणायचा:

"बंधू, किती झकास आहे नाही? हुं! पण दमट ओल आहे नाही? तुला थंडी तर वाजत नाही?"

जेव्हा आकाश काळोखले आणि सारे काही रात्रीच्या अंधारात मिसळले तेव्हा तो म्हणाला:

"मला वाटतं, आता पुरे. चल..."

बागेच्या फाटकापाशी येताच तो थांबला.

"तुझी ती आजी फार विलक्षण चांगली बाई आहे," तो म्हणाला. "छे:, काय जग आहे!"

मग डोळे मिटून स्मित करीत त्याने अगदी हळू आवाजात, पण स्पष्टपणे त्या ओळी पुन्हा उच्चारल्या:

अशा दुष्टाव्याचा पडला मोह म्हणून
दुसऱ्याच्या इच्छेला पडला वळी म्हणून
घडले त्याला शासन असे!

"बंधू, हे नेहमी लक्षात ठेव!" मला पुढे ढकलीत त्याने ताकीदीच्या सुरात म्हटले. "तुला लिहिता येतं?"

"नाही."

"शीक. आणि शिकलास म्हणजे तुझी आजी जे पाठ म्हणून दाखवते ते लिहून काढ. फार फार महत्त्वाचं आहे ते!"

त्यानंतर आम्ही मित्र बनलो. त्या दिवसानंतर मला जेव्हा इच्छा होई तेव्हा मी "झकास" ला भेटायला जाऊ लागलो. फाटक्या कपडयांनी भरलेल्या एका खोक्यावर मी बसायचा आणि त्याला मुळीच उपद्रव न देता त्याचे शिसे वितळविणे किंवा तांबे तापविणे पहात रहायचा. त्याचा रस झाला म्हणजे ऐटबाज मुठीच्या एका छोटया ऐरणीवर त्याच्या वडया तो पाडायचा व कानशीने, खरखरीत कागदाने आणि वेगवेगळया तारांनी त्यांना

घासायचा. काही तारा तर केसाइतक्या बारीक असत. एका नाजुक तांब्याच्या तराजूत तो प्रत्येक गोष्टीचे वजन करीत असे. जाड, शुभ्र चिनी मातीच्या बरण्यांमध्ये तो वेगवेगळी रसायने मिसळायचा व सारी खोली कडवट धुराने भरून जायची. कपाळाला आठ्या घालून एका जाडजूड पुस्तकात तो अधूनमधून डोकावायचा आणि आपले लाल ओठ चावीत अथवा हलकासा सुस्कारा टाकीत पुटपुटायचा :

अहा, शरॉनच्या* गुलाबा...

"तुम्ही काय तयार करताय?"

"एक वस्तू, बंधू..."

"कोणती वस्तू?"

"आता तुला ती कशी समजावून सांगायची ते मला माहीत नाही..."

"आजोबा म्हणतात की तुम्ही बहुधा बनावट पैसे तयार करताय."

"आजोबा? हूं! तो सारा मूर्खपणा आहे. बंधू, पैसा या गोष्टीसाठी एवढा त्रास घ्यायची गरज नाही."

"पण पैशाशिवाय तुम्ही पाव विकत घेऊ शकाल?"

"ते बरोबर आहे. त्याच्याशिवाय पाव विकत घेता येणार नाही."

"पाहिलंत? किंवा मटण..."

"किंवा मटणसुद्धा!"

तो हळूच हसला. त्याचे तसे ते हसणे मला फार आवडायचे. जणू मी मांजरीचे पिल्लू असावे तसे त्याने माझ्या कानामागे हळू हळू खाजवले.

"बंधू, तुझ्यावर कुरघोडी करायला जमत नाही," तो म्हणाला. "दरवेळी तू मला कोंडीत पकडतोस. म्हणून आता आपण आणखी बोलायला नको."

काहीवेळा तो काम थांबवायचा आणि माझ्यापाशी येऊन खिडकीशी बसायचा. मग सफरचंदाच्या झाडाची पानगळ पहात किंवा छपरावर आणि अंगणात पडणारा पाऊस पहात आम्ही बसून रहायचे. "झकास" अगदी कमी बोलायचा, पण जेव्हा बोलत असे तेव्हा त्याचे बोलणे नेहमी मुद्देसूद असायचे. एखादी गोष्ट मी पहावी असे त्याला वाटे तेव्हा बहुधा मला

---

*बायबलमध्ये उल्लेखलेले पॅलेस्टाईन येथील एक सुपीक खोरे.—सं.

कुशीत ढोसून आणि त्या वस्तूकडे डोळा मारून अथवा कटाक्ष टाकून तो माझे तिकडे लक्ष वेधीत असे.

आमच्या अंगणात मला तरी विशेष असे काहीच आढळले नव्हते. पण त्याच्या त्या ढोसण्यांमुळे आणि क्वचित शब्दांमुळे मी पाहिलेल्या प्रत्येक गोष्टीला एक खास महत्त्व प्राप्त झाले व त्या गोष्टी माझ्या स्मरणात कायमच्या कोरल्या गेल्या. एक मांजर अंगणातून धावत गेले आणि डबक्याशी स्वतःचे प्रतिबिंब पाहताच तेथे थांबून त्याला मारण्यासाठी जणू त्याने पंजा उगारला.

"मांजरं फार मानी आणि संशयी असतात," हळूच "झकास" म्हणाला.

तांबूस सोनेरी कोंबडा मामाई कुंपणावर उडून बसला, त्याने पंख फडफडवले आणि जवळ जवळ त्याचा तोल गेला तेव्हा संतापून तो मान उंच करीत क्लॅक क्लॅक आवाज करू लागला.

"तो फार महत्त्वाचा आहे, मोठा सेनापती आहे. पण त्याला फारशी अक्कल नाही."

बावळट वालेई एखाद्या म्हाताऱ्या घोड्याप्रमाणे चिखलातून चालत येत होता व आकाशाकडे तिरप्या नजरेने पाहण्यासाठी आपला मोठा, फुगीर चेहरा त्याने वर उचलला होता. शरदातील सूर्याचा फिकट किरण त्याच्या छातीवर पडला होता व त्याच्या जाकीटाची पितळी बटणे जणू पेटली होती. त्या ताताराने थांबून त्या बटणांना आपल्या खडबडीत बोटांनी कुरवाळले.

"जणू बेट्यानं आत्ताच छातीवर पदक लावून घेतल्याचा आव आणलाय!"

लौकरच माझ्या लक्षात आले की, "झकास" बरोबर माझे लागेबांधे फारच जिव्हाळ्याचे बनले होते. माझ्या सर्व सुख-दुःखांमध्ये तो मला एक आवश्यक घटक बनला होता. तो स्वभावाने स्वतः जरी गप्प असला, तरी माझ्या मनातले विचार बोलून दाखविण्याला त्याने मला कधीही मना केले नव्हते. याउलट माझे आजोबा मला नेहमी अडवायचे:

"चूप बैस रे घमेंडखोरा!"

माझी आजी स्वतःच्याच विचारांमध्ये नेहमी एवढी गढलेली असायची की, इतर माणसांचे विचार सामावून घेणे तिला शक्यच होत नसे.

पण "झकास" मात्र नेहमी माझे बोलणे लक्षपूर्वक ऐकून घ्यायचा आणि स्मित करून म्हणायचा :

"हे काही खरं नाही बंधू. तू आपली मनानं रचून ही गोष्ट सांगितलीस !"

त्याचे त्रोटक शेरे नेहमी अचूक आणि समयोचित असायचे. जणू माझ्या काळजात आणि मनात काय चाललेले असे ते तो पाहू शकायचा; माझ्या ओठांमधून शब्द बाहेर पडण्यापूर्वीच खोटे आणि नकली काय असायचे ते तो जणू पाहू शकायचा व ते जाणवताच नेहमी तीनच तिखट शब्द प्रेमाने बोलायचा:

"खोटं बोलतोस बंधू !"

त्याच्या जादूच्या शक्तीची कसोटी बघण्यासाठी काही वेळा मी मुद्दामच बनावट गोष्टी खऱ्या म्हणून त्याला सांगत असे. पण एक मिनिटभर माझे बोलणे ऐकल्यानंतर तो हमखास मान हलवून म्हणायचा :

"खोटं बोलतोस बंधू !"

"तुम्हाला कसं समजलं ?"

"समजतं मला !"

सेन्नाया चौकातल्या पंपावरून पाणी आणायला आजी जायची तेव्हा अनेकदा ती मला बरोबर नेत असे. एके दिवशी आम्ही पाहिले की, शहरातील पाच माणसे एका बाप्याला मारीत होती. त्यांनी त्याला जमिनीवर खाली पाडले होते व कुत्र्यांची झुंड तुटून पडावी तसे ते त्याच्यावर तुटून पडले होते. आजीने आपल्या करोमीस्लो*च्या बादल्या काढल्या आणि सोटयाप्रमाणे त्याला फिरवीत त्या शहरच्या माणसांवर धावून जाताना ती माझ्या अंगावर खेकसली : "बाजूला हो !"

पण मला भीती वाटली आणि मी तिच्या पाठोपाठ धावलो. मी शत्रूवर दगड मारू लागलो आणि ती शूरपणे करोमीस्लो त्यांना ढोसू लागली, त्यांच्या डोक्यांवर आणि खांद्यांवर दणके मारू लागली. इतरही माणसे त्या धुमाळीत सामील झाली आणि शहरच्या लोकांना पिटाळून लावण्यात आले. त्या बाप्याचा चेहरा रक्ताळला होता. आजीने त्याचा चेहरा धुवून काढला.

---

* पाण्याची कावड नेण्यासाठी वापरायचा दांडा. — अनु.

फाटलेल्या नाकपुडीवर आपली घाणेरडी बोटे दाबून धरीत तो कसा खोकत आणि ओरडत होता व त्याच्या बोटांमधून रक्ताच्या चिळकांड्या उडून माझ्या आजीचा चेहरा व छाती कसे माखून निघाले होते, याची आठवण झाली म्हणजे आजही मी शहारतो. तीसुद्धा त्यावेळी मोठ्यांदा किंचाळली होती आणि नखशिखांत थरथर कापत होती.

घरी येताच मी "झकास" कडे पळत गेलो आणि त्याला सर्व हकीकत सांगू लागलो. तो काम करायचा थांबला आणि एक लांब तार तलवारी-सारखी हातात धरून माझ्या पुढ्यात उभा राहिला. चष्म्याच्या काचांखालून त्याने कठोरपणे एकटक माझ्याकडे पाहिले. मग एकदम डोळ्यांची उघडझाप केली आणि मुद्दाम जोर देत तो म्हणाला :

"सुरेख! म्हणजे असं घडलं तर! फार छान!"

मी जे काही पाहिले होते त्यामुळे एवढा हादरून गेलो होतो की, तो काय म्हणाला याचे भान न राहून मी सतत बोलतच राहिलो. त्याने आपला हात माझ्या अंगाभोवती टाकला व तो खोलीत फेऱ्या मारू लागला. शेवटी एकदम म्हणाला :

"पुरे! पुरे!! तुला जे काही सांगायचं होतं ते सगळं सांगितलंस, समजलं? आता पुरे!"

मी बोलायचा थांबलो. प्रथम मला त्याच्या बोलण्याचा अपमान वाटला. पण त्या बाबतीत मी थोडा विचार केला तेव्हा मला आश्चर्यकारकपणे जाणवले की, त्याने मला अगदी योग्य वेळी थांबवले होते. मला सांगायचे होते ते सारे मी सांगून टाकल्यावर नेमके थांबवले होते.

"अशा गोष्टींचा फार वेळ विचार करत बसू नकोस. विसरून जायचा प्रयत्न कर," तो म्हणाला.

काहीवेळा अनपेक्षितपणे तो अशा काही गोष्टी बोलायचा, ज्या पुढे जन्मभर माझ्या लक्षात राहिल्या. एकदा मी त्याला क्ल्यूश्निकोव नांवाच्या एका मुलाबद्दल सांगितले. नोवाया रस्त्यावर माझ्याशी लढणारे जे शत्रू होते, त्यांच्यापैकी तो एकजण होता. तो लठ्ठ, मोठ्या डोक्याचा मुलगा होता. त्याच्यावर मात करणे मला जमत नव्हते. "झकास" ने माझी अडचण ऐकून घेतली आणि नंतर तो म्हणाला :

"छट्! तसली ताकद ही मुळी ताकदच नव्हे! वेगानं हालचाल

करण्यात खरी ताकद सामावलीय. जेवढा तू झटपट हालचाल करशील तेवढा तू जास्त सामर्थ्यवान – समजलं?"

पुढच्या रविवारी मी माझ्या मुठींचा अधिक वेगाने वापर केला आणि क्ल्यूश्निकोवची कणीक तिंबून काढण्यात मला बरेच यश आले. त्यामुळे "झकास"च्या शब्दांना मी जास्तच मानू लागलो.

"गोष्टी आपल्या हाती कशा घ्यायच्या हे तुम्हाला माहिती असलं पाहिजे – समजलं? आणि तेच सर्वांत अवघड असतं – गोष्टी हाती धरणं माहीत असणं!"

तो काय म्हणाला त्याचा अर्थ मला समजला नाही, पण हे आणि अशा प्रकारचे त्याचे शब्द आठवणीत राहिले. ते लक्षात रहायचे कारण म्हणजे ते साधे वाटले तरी त्यांच्यात एक त्रासदायी गूढता सामावली होती: दगड किंवा पावाचा तुकडा, प्याला किंवा हातोडा हातात धरायला काय अवघड आहे?

आमच्या घरामधील माणसे "झकास"चा जास्त जास्त तिटकारा करू लागली. इतकेच काय पण आनंदी तरुण बाईचे लडिवाळ मांजर इतर लोकांच्या मांडीवर जसे चढून बसायचे तसे ते "झकास"च्या मांडीवर चढून बसत नसे आणि त्याच्या प्रेमळ बोलावण्याकडे ढुंकून लक्ष देत नसे. त्याबद्दल मी त्या मांजराला मार द्यायचा, त्याचे कान उपटायचा आणि अगदी रडकुंडीला येऊन त्याला समजावायचा, की या माणसाला त्याने घाबरू नये!

"माझ्या कपड्यांना ॲसिडचा वास येतो, म्हणून मांजर माझ्याजवळ येत नाही," "झकास"ने खुलासा केला. पण बाकीचे सारे – त्यात आजीचा-सुद्धा समावेश होता – दुसरेच कारण सांगत. ती सारी माणसे त्याच्याशी वैर धरून होती. मला ते चुकीचे वाटायचे आणि त्याबद्दल दुःख व्हायचे.

"सारखा काय त्याच्या भोवती घोटाळत असतोस?" आजीने रागाने विचारले. "सांभाळून, नाहीतर स्वतःच्या करामती तो तुला शिकवायला लागायचा!"

मी "झकास"कडे गेलो होतो हे ज्या ज्या वेळी माझ्या दुष्ट लालकेशा आजोबांना समजले होते, त्या त्या वेळी त्यांनी क्रूरपणे मला चाबकाने फोडून काढले होते. अर्थातच मी "झकास"ला सांगितले नव्हते की, त्याला

भेटायला मला बंदी करण्यात आली होती. पण लोकांना त्याच्याबद्दल काय वाटत होते ते मात्र मोकळेपणी मी त्याला सांगायचा.

"आजीला तुमची भीती वाटते. ती म्हणते तुम्ही जादूटोणा करता आणि आजोबासुद्धा तसंच म्हणतात. ते सांगतात की तुम्ही देवाच्या विरुद्ध आहात आणि तुमच्याशी संबंध ठेवणं लोकांच्या दृष्टीनं धोक्याचं आहे."

माशी उडवून लावावी त्याप्रमाणे त्याने डोक्याला झटका दिला. त्याच्या पांढुरक्या चेहऱ्यावर स्मित उमटले. माझे काळीज पिळवटून निघाले आणि डोक्यात भणाणले.

"बंधू, मला ते सारं समजतं," तो शांतपणे म्हणाला. "फार वाईट, होय की नाही?"

"हो."

"फार वाईट, बंधू."

अखेरीस लोकांनी त्याला हाकून लावले.

एके सकाळी न्याहारीनंतर मी त्याच्या खोलीत गेलो तेव्हा खाली बसून तो आपले सामान खोक्यात भरीत होता आणि गुणगुणत होता: "अहा, शरॉनच्या गुलाबा..."

"अच्छा बंधू. मी निघालो."

"का?"

उत्तर देण्यापूर्वी क्षणभर त्याने मला लक्षपूर्वक न्याहाळले.

"तुला ठाऊक नव्हतं? ही खोली तुझ्या आईसाठी हवीय!"

"असं कोण म्हणालं?"

"तुझे आजोबा."

"खोटं बोलतात ते!"

"झकास" ने मला ओढून पोटाशी धरले. नंतर मी त्याच्या शेजारी खाली बसलो तेव्हा तो शांतपणे म्हणाला:

"रागावू नकोस! बंधू, मला वाटलं की तुला हे माहीत होतं आणि तरी तू मला ते सांगितलं नाहीस. मला ही गोष्ट आवडली नव्हती."

काही कारणाने मी दुखावलो होतो आणि मला संताप आला होता.

"ऐकलंस," स्मित करीत तो अगदी हलक्या आवाजात म्हणाला. "माझ्याकडं येत जाऊ नकोस असं मी तुला सांगितलेलं आठवतं?"

मी मान हलवली.

"त्यावेळी मी तुझ्या भावना दुखावल्या होत्या, होय की नाही?"

"हो."

"माझा तसं करण्याचा मुळीच इरादा नव्हता. पण माझ्याशी तू मैत्री जमवू लागलास तर ते तुला रागावतील हे मला ठाऊक होतं"

जणू काही तो माझ्या वयाचा असावा अशा पद्धतीने बोलत होता व त्यामुळे मला खूप आनंद झाला. असे भासले की, त्याने आत्ता जे काही सांगितले होते ते फार पूर्वीच मला माहीत होते.

"मला ते पूर्वीच माहीत होतं," मी म्हणालो.

"छान, तर बंधू, मामला हा असा आहे."

मला अंत:करणामधील वेदना असह्य झाली.

"कुणालाही तुम्ही का आवडत नाही?"

त्याने मला घट्ट मिठी मारली व जोरजोराने डोळ्यांची उघडझाप करीत तो उत्तरला:

"कारण मी त्यांच्यासारखा नाही!"

काय बोलावे ते न समजल्याने मी नुसतीच त्याची सदऱ्याची बाही पकडली.

"रागावू नकोस," तो म्हणाला आणि नंतर हळूच माझ्या कानात कुजबुजला: "आणि रडूही नकोस."

पण त्याच्या चष्म्याच्या धुरकट काचांमागून मात्र त्याच्या स्वत:च्या गालांवर अश्रूंच्या धारा वहात होत्या.

आम्ही नेहमीप्रमाणे खूप वेळपर्यंत तेथे गप्प बसून राहिलो. क्वचित थोडया शब्दांची देवघेव केली.

त्या संध्याकाळी, प्रत्येकाचा प्रेमाने निरोप घेऊन आणि मला कडकडून मिठी मारून तो निघून गेला. मी फाटकामधून हळूच बाहेर जाऊन रस्त्यावर नजर टाकली. रस्त्याच्या गोठलेल्या चाकोऱ्यांमधून गाडीची चाके खडखडत जात असताना बसणाऱ्या हादऱ्यांमुळे तो थडथड उडत होता. तो निघून जाताच आजीने त्याची घाणेरडी खोली साफ करण्याचे काम तात्काळ हाती घेतले. पण या कोपऱ्यापासून त्या कोपऱ्यापर्यंत खोलीत पळापळ करीत मी मुद्दामच तिला अडथळा आणू लागलो.

"बाहेर हो!" माझ्यावर अडखळून पडत ती ओरडली.

"त्याला तुम्ही घालवून का दिलंत?"

"तुझा काहीएक संबंध नाही या गोष्टीत!"

"तुम्ही सारे अगदी मूर्ख आहात!" मी म्हणालो.

ओल्या फडक्याने ती मला फटके मारीत ओरडू लागली:

"तुझं डोकं फिरलं की काय?"

"तू सोडून बाकी सारे वेडे आहेत," मी चूक सुधारली, पण त्याचा काही उपयोग झाला नाही. तिचा राग शमला नाही.

"परमेश्वराची कृपा, गेला एकदाचा!" जेवणाच्या वेळी आजोबा म्हणाले. "दरवेळी त्याला पाहिलं म्हणजे माझ्या काळजात सुरी खुपसल्यासारखं वाटायचं! त्याची ब्याद घालवून देणं भाग होतं!"

रागाच्या भरात मी चमचा मोडला आणि त्याबद्दल मला खरपूस मार मिळाला.

आपल्याच भूमीत परक्या बनलेल्या असंख्य लोकांपैकी त्या पहिल्या माणसाबरोबरची माझी मैत्री अशी संपुष्टात आली. अशी माणसे म्हणजे माझ्या मायभूमीचे सर्वोत्तम सुपुत्र होते.

## ९

बालपणाच्या त्या काळात मी म्हणजे जणू मधमाशीचे एक पोळे होतो. वेगवेगळी साधी माणसे आपल्या ज्ञानाचा आणि जीवनविषयक दृष्टिकोनांचा मध घेऊन माझ्यापाशी येत. त्यांच्यापैकी प्रत्येकजण माझी व्यक्तिरेखा घडविण्यात मोठी कामगिरी बजावीत होता. अनेकवेळा तो मध घाणेरडा आणि कडू असे. पण तरीही ते ज्ञान होते म्हणजे मधच होता.

"झकास" निघून गेल्यानंतर माझी प्योत्रकाकांशी गट्टी जमली. सडपातळ अंगकाठी, टापटीप आणि स्वच्छता याबाबतीत त्यांचे माझ्या आजोबांशी साम्य होते. पण दर्जा आणि इतर सर्व बाबतीत ते आजोबांहून खालच्या पातळीवर होते. त्यांना पाहिले म्हणजे एखाद्या लहान मुलाने गंमतीखातर म्हाताऱ्या माणसासारखा पोषाख केला आहे असे मला वाटे. सुबक चामडी वाद्यांच्या टोपलीसारखा त्यांचा चेहरा होता व त्या चौकडयांच्या पिंजऱ्याआडून त्यांचे हसरे डोळे दोन छोटया पाखरांसारखे चमकत. त्यांचे

पांढरे केस कुरळे होते व दाढीला साखळया पडल्या होत्या. ते पाईप ओढत. त्याचा धूर त्यांच्या केसांच्या रंगासारखाच दिसे व त्यांच्या तऱ्हेवाईक बोलण्याप्रमाणेच मोठ्या विलक्षण रीतीने त्या धुराची त्यांच्याभोवती वेटोळी फिरत रहात. गुणगुणत्या आवाजातील त्यांचे बोलणे प्रेमळ आणि सौम्य वाटे. पण ते लोकांची थट्टा उडवीत असे मला मात्र नेहमी वाटत असे.

"ज्या उमरावणीच्या मी मालकीचा होतो तिचं नांव तात्यान आणि तिच्या बापाचं नांव होतं अलेक्सेयेवना. पहिल्यांदा ती म्हणाली 'तू लोहार-काम कर', पण लोहारकामाला मी सुरवात करतो न करतो तर म्हणाली, 'माळीबाबाला मदत कर.' माझ्या काही त्याला हरकती नव्हत्या. पण म्हण आहे ना, 'परक्या माणसाचं सारंच कडू लागतं!' जेव्हा तिथं जमलं नाही तेव्हा ती म्हणाली 'पेत्रूश्का, मासेमारी जमते का बघ!' पुन्हा आपली माझ्या बाजूनं संमती. जरा कुठं मच्छीमारीत माझा हात बसला नाही तोवर मासोळीचा मला निरोप घ्यावा लागला आणि शहरात खटारेवाला म्हणून काम करायला माझी पाठवणी झाली. आमची स्वारी खटारेवाला म्हणून रूजू झाली आणि आणखी नवी कल्पना तिच्या डोक्यात यायच्या आतच भूदास स्वतंत्र झाले, माझ्या हाती घोडा राहिला आणि त्यानंतर अगदी आजपर्यंत त्या उमरावणीच्या ऐवजी मी घोड्याचं ऐकतोय!"

घोडा म्हातारा आणि पांढऱ्या रंगाचा होता. एखाद्या झिंगलेल्या रंगाऱ्याने वेगवेगळ्या रंगांनी भिजवलेला कुंचला त्या घोड्याच्या अंगावर भिरकावला असावा असे वाटे. फेंगड्या पायाचे ते मोठे चक्रम जनावर होते. त्याच्या ताणलेल्या स्नायूंच्या आणि लिबलिबीत कातडीच्या शरीराला त्याचे रोड मुंडके मानेशी जेमतेम चिकटलेले होते. त्याचे निस्तेज डोळे त्याच्या केविलवाणेपणात अधिकच भर घालीत. प्योत्रकाका मात्र त्या घोड्याशी फार आदराने वागत. त्याला ते 'तान्या' म्हणून हाक मारीत आणि कधीही मारीत नसत.

"तुझ्या जनावराला माणसाचं नांव का दिलंस?" एकदा आजोबानी प्योत्रकाकाला विचारले.

"वासीली वासिल्येविच, पण 'तान्या' हे मुळी माणसाचं नांव नाहीच. 'तात्याना' हे माणसाचं नांव आहे," प्योत्रकाका उत्तरले.

प्योत्रकाका साक्षर होते आणि धार्मिक ग्रंथांचा त्यांचा चांगला अभ्यास

होता. कोणता संत सर्वांत अस्सल संतपुरूष होता यावर त्यांचा आणि आजोबांचा नेहमी वाद चाले. बायबलमध्ये नमूद केलेल्या पाप्यांचा ते कठोरपणे निषेध करीत. त्यातल्या त्यात अवेस्सालोमचा जास्त कडक धिक्कार करीत. काहीवेळा निव्वळ व्याकरणावरून त्यांच्यात वादंग माजत असे. आजोबा म्हणायचे : "दुष्टवाद", "अनाचारवाद", "मूर्तिपूजावाद"; तर प्योत्रकाकांचा दावा होता की, "दुष्टपणा", "अनाचारीपणा," "मूर्तिपूजकपणा" असे शब्द उच्चारले पाहिजेत.

"तुझा मार्ग वेगळा – माझा वेगळा!" लालबुंद चेहरा करीत आजोबा गरजले. "तुझा 'पणा' गेला खड्डयात!"

पण मुळीच विचलित न होता, डोक्याभोवती धुराची वेटोळी सोडत प्योत्रकाका बसून राहिले.

"तुमचे 'वाद' काय मोठे चांगले लागून गेलेत?" तुच्छ स्वरात ते म्हणाले. "देवाच्या दृष्टीनं मुळीच चांगले नाहीत. देव जेव्हा तुमच्या प्रार्थना ऐकत असेल तेव्हा स्वतःशी म्हणत असेल: 'प्रार्थना मोटी पण लक्षणात खोटी!'"

"अलेक्सेई, चालता हो इथून!" हिरवे डोळे वटारीत आजोबा माझ्यावर खेकसले.

टापटीप आणि स्वच्छतेची प्योत्रना फार आवड होती. अंगणातून जाताना ते नेहमी काठ्या आणि हाडांचे तुकडे वगैरे गोष्टी लाथेने उडवून लावीत आणि नाराजीने पुटपुटत:

"उपयोग नाही काडीचा, पण उगाच वाटेत तडमडतात!"

ते खूप बोलघेवडे होते. प्रेमळ आणि आनंदी असल्याचा भास ते निर्माण करीत. पण काहीवेळा त्यांचे डोळे धूसर बनत आणि एखाद्या मढ्याप्रमाणे दिसत. त्यांचा पुतण्या जसा एखाद्या अंधाऱ्या कोपऱ्यात दुर्मुखला आणि गप्प बसून रहायचा, तसेच तेही बसून राहिलेले आढळत.

"प्योत्रकाका, काय झालं?"

"चल जा इथून," काहीशा तुसडेपणाने ते उत्तर देत.

आमच्या रस्त्यावरील एका घरामध्ये कपाळावर टेंगूळ असलेला एक बड्या घरचा माणूस नव्यानेच रहायला आला होता. त्याला एक विचित्र सवय होती. रविवारी तो आपल्या खिडकीत बसायचा आणि कुत्रे, मांजरी,

कोंबड्या, कावळे यांच्यावर छऱ्यांची बंदूक उडवायचा. एवढेच नव्हे तर रस्त्यावरून जाणारा एखादा माणूस त्याला आवडला नाही तर त्याच्यावरही तो छर्रे उडवायचा. एक दिवस त्याने "झकास" वर कुलपी गोळा उडवला. पण त्याच्या कातडी जाकीटात तो न घुसता त्याच्या खिशात पडला. "झकास" आपल्या तळहातावर त्याचे तुकडे निरखीत होता ते मला आठवते. त्याने पोलिसात तक्रार नोंदवावी असा आजोबांनी खूप आग्रह केला होता, पण त्याने स्वैपाकघराच्या कोपऱ्यात छर्रा फेकून दिला व तो म्हणाला :

"तेवढी तसदी घ्यायचं कारण नाही."

दुसऱ्या एका वेळी त्या नेमबाजाने माझ्या आजोबांच्या पायावर छर्रा मारला. आजोबा चिडले, त्यांनी तक्रार नोंदवली आणि साक्षीदारांना ते गोळा करू लागले. पण अचानक तो बड्या घरचा माणूस अदृश्य झाला.

रस्त्यावर त्याच्या बंदुकीचे आवाज ऐकले रे ऐकले, की प्रत्येकवेळी प्योत्रकाका घाईघाईने आपली खास रविवारी घालण्याची, विटलेली, मोठ्या घेराची टोपी डोक्यावर चढवीत व घाईघाईने फाटकाबाहेर जात. एकदा ते फूटपाथवर गेले म्हणजे आपल्या कोटाच्या शेपट्यांमागे अशा रीतीने हात ठेवीत की, कोंबड्याच्या शेपटाप्रमाणे ते शेपूट झोकात डोलू लागे, आपले पोट ते मुद्दाम पुढे काढीत आणि त्या बंदुकवाल्याच्या खिडकीसमोरून ऐटीत चालत जात. पहिल्या फेरीत काहीच घडले नाही तर ते दुसरी आणि तिसरीही फेरी मारीत. आमच्या घरामधील सर्व माणसे ती गंमत बघायला फाटकाशी घोळका करून उभी रहात. त्यात तो लष्करी अधिकारी आणि त्याची सोनेरी केसांची बायकोही खिडकीकडे न्याहाळून बघत असत. बेतलेंग यांच्या घरातील माणसेही अंगणात येऊन उभी रहात. फक्त ओवस्यान्निकोव यांच्या राखाडी रंगाच्या घरामध्ये कसलीच हालचाल जाणवत नसे.

काही वेळा प्योत्रकाकांचे प्रयत्न वाया जात. असल्या खेळाकडे लक्ष देण्यात अर्थ नाही असे त्या शिकाऱ्याला वाटायचे. पण काहीवेळा मात्र दुबारी बंदूक धुमायची.

"ठो-ठो!"

पावलांची गती मुळीच न वाढवता प्योत्रकाका आमच्यापाशी चालत यायचे आणि मोठ्या समाधानपूर्वक आम्हाला सांगायचे :

"माझ्या कोटाच्या शेपटयांवर त्यांचा नेम बसला!"

एक दिवस त्यांच्या मानेवर आणि खांद्यावर नेम बसला.

"कशाला त्या रानटी माणसाला चिथावता?" सुईने शिसे बाहेर काढीत आजी प्योत्रकाकांना म्हणाली. "एक दिवस तुमचे डोळे फोडील तो!"

"छे: छे: अकुलीना इवानोव्ना! त्याला मुळी नेमच धरता येत नाही!" तिरस्काराच्या सुरात प्योत्र उत्तरले.

"मग कशाला त्याला नेमबाजीचं समाधान द्यायचं?"

"मी कुठं समाधान देतोय त्याला? मी त्याला फक्त चिडवण्यासाठी तसं करतो!"

तळहातावरचे शिसे न्याहाळीत ते पुढे म्हणाले, "छे:! मुळीच नेम नाही बेटयाचा! बरं का, माझ्या मालकिणीनं – उमरावीण तात्यान अलेक्सेयेवनानं एकदा एक तात्पुरतं लग्न केलं होतं. आपल्या हुजऱ्यांप्रमाणं ती नवरे बदलायची! तर एकदा तिनं मामोन्त इल्यिच नांवाच्या एका लष्करी माणसाशी लग्न केलं होतं. मोठा मस्त नेमबाज माणूस होता! आजी, आपल्या बंदुकीनं तो काय काय करामती करायचा म्हणून सांगू! वेडसर डोक्याच्या इग्नाश्का नांवाच्या पोराला तो चाळीस एक पावलांवर उभा करायचा – त्याच्या कमरेच्या पट्ट्याला बाटली बांधायचा, म्हणजे ती बाटली त्याच्या दोन पायांमध्ये लोंबायची. मग इग्नाश्का पाय फाकवून वेडयासारखा हसत उभा रहायचा आणि मामोन्त इल्यिच नेम धरायचा – ठो ऽ! बाटलीच्या ठिकऱ्या उडायच्या! पण एकदा इग्नाश्काला नेमक्या मोक्याच्या वेळी घोडमाशी किंवा असंच काहीतरी चावलं वाटतं – पोरगा जागचा हलला आणि गोळी सरळ त्याच्या गुडघ्यात! अगदी वाटीवर!! त्यांनी लगेच डॉक्टर बोलावला आणि डोळ्याची पाती लवतात न लवतात तोच त्याने त्या पोराचा पाय कापून काढला! नो कापलेला पाय पटकन पुरूनही टाकला!.."

"इग्नाश्काचं काय झालं?"

"त्या वेडयावर त्याचा काही फारसा परिणाम झाला नाही. वेडया माणसाला हाता-पायांचा उपयोग नसतो. तो आपल्या वेडेपणावर जगतो. प्रत्येकजण वेडयाला मदत करायला तयार असतो. म्हण आहे ना – 'ज्याला

अक्कल नाही त्याला अपमान नाही!' तसे सारे निरुपद्रवी असतात वेडे!"

या गोष्टीचा आजीवर फारसा परिणाम घडला नाही. अशा तऱ्हेच्या कित्येक गोष्टी तिला ठाऊक होत्या. पण माझा मात्र थरकाप झाला.

"बडचा घरचा माणूस एखाद्या माणसाला ठार मारू शकतो?"

"का नाही? अर्थात तो मारू शकतो. काहीवेळा बडी माणसं एकमेकांनाही ठार मारतात. एकदा एक भालाईत तात्यान अलेक्सेयेवनाला भेटायला आला आणि मामोन्तबरोबर त्याचं भांडण जुंपलं. दोघांनी आपापली पिस्तूलं बाहेर काढली, बागेत गेले आणि तळ्याशेजारच्या पायवाटेवर त्या भालाईतानं मामोन्तचा निकाल लावला—ठो ऽ! सरळ पोटात! तर मामोन्त वर पोचला, भालाईत कॉकेशसला गेला आणि मामला तिथंच संपला! तर पाहिलंस? स्वतःच्याच लोकांना ते ठार मारतात. आणि बाप्ये किंवा त्यांच्यासारख्या माणसांना तर! छ्याः! वाट्टेल तेवढ्यांना! विशेषकरून आजकाल तर! आता माणसांवर कुणाची मालकी नाही ना! पूर्वी बाप्या मालकीचा होता तेव्हा त्याला मालमत्ता मानायचे. जरा जास्त काळजी घ्यायचे..."

"त्यावेळीसुद्धा काही फारशी पर्वा करायचे नाहीत गडीमाणसांची..." आजी मध्येच म्हणाली.

"तेही खरंच," प्योत्रकाकांनी दुजोरा दिला. "मालमत्ता असली तरी ती स्वस्त होती!"

माझ्याशी ते नेहमी प्रेमाने वागत आणि मोठ्या माणसांशी ते ज्या तऱ्हेने बोलत त्याहून जास्त हळुवारपणे माझ्याशी बोलत. माझ्याशी बोलताना ते नजर खाली झुकवीत नसत. पण त्यांच्यात असे काहीतरी होते जे मला आवडत नसे. आपला मुरंबा ते सर्वांना देत तेव्हा माझ्या पावावर इतरांपेक्षा जास्त जाड थर फासत. शहरात गेले म्हणजे माझ्यासाठी सुंठीची बिस्कीटे आणि सूर्यफुलाच्या बिया आणत. माझ्याशी ते नेहमी शांत सुरात आणि गंभीरपणे बोलत.

"मित्रा, मोठेपणी तू कोण होणार? शिपाई की कारकून?"

"शिपाई!"

"छान. आजकाल शिपाईगडी होणं तेवढं कठीण नाही. पाद्र्यांचंही

बरं चाललंय. नुसतं ओरडत फिरायचं – 'परमेश्वर थोर आहे' आणि बस्स! शिपायापेक्षा पाद्री होणं जास्तच सोपं! पण सर्वांत सोपं मच्छीमार होणं. त्याला काहीही माहीत नसलेलं चालतं. नुसती सवय झाली म्हणजे पुरे!"

आमीषाभोवती मासा कसा गिरक्या घेतो याची ते सुरेख नक्कल करीत. तसेच, वेगवेगळ्या जातीचे मासे गळाला अडकल्यानंतर सुटायची धडपड कशी करतात, याचीही ते नक्कल करून दाखवीत.

"तुझे आजोबा तुला चोपतात तेव्हा त्यांचा तुला खूप राग येतो की नाही?" त्यांनी सांत्वनपर सुरात मला म्हटले. "पण मित्रा, अशा बाबतीत चिडायचं मुळीच कारण नाही. ती सगळी मारझोड तुझ्या कल्याणासाठीच आहे. अगदी पोरकट असतात तसले चोप! पण माझ्या तात्यान अलेक्सेयेवनाचं उदाहरण घे. मार देण्यासाठी तिनं एक खास माणूस नेमला होता. ख्रिस्तोफोर त्याचं नांव! एवढा तरबेज होता चोप देण्यात की, वेळ पडली म्हणजे शेजारपाजारचे जमीनदार उमरावणीला निरोप पाठवीत: तात्यान अलेक्सेयेवना, एक-दोन लोकांना चोप देण्यासाटी कृपया तुमच्या ख्रिस्तो-फोरला उसना द्या. आणि ती त्याला तसा उसना द्यायची!"

आपली उमरावीण आपल्या वाड्याच्या मोठमोठे खांब असलेल्या पोर्च-मध्ये तांबड्या मखमाली खुर्चीवर कशी बसायची, शुभ्र पांढरा पोषाख आणि खांद्यावर निळा रूमाल तिने कसा परिधान केलेला असायचा व स्त्री-पुरुष भूदासांना ख्रिस्तोफोर चाबकाचे फटके मारीत असताना ती कशी देख-रेख करायची त्याचा साद्यंत वृत्तांत प्योत्रकाकांनी निर्विकारपणे दिला.

"तो ख्रिस्तोफोर ऱ्याझानहून आला होता. जिप्सी किंवा खोखोल* होता. या कानापासून त्या कानापर्यंत लांब मिशा, पण हनुवटीची हजामत करायचा त्यामुळं चेहरा सगळा निळसर. तो खरंच अर्धवट होता का आयुष्य सोपं जावं म्हणून तसं वेड्यासारखा वागायचा ते कळायला काही मार्ग नव्हता. पण स्वैंपाकघरात जायचा, एका तसराळ्यात पाणी भरायचा आणि माशी किंवा झुरळ किंवा एखादा किडा पकडून त्या पाण्यात त्याला बुडवायचा नि बराच वेळपर्यंत काडीच्या एका टोकाने तळापर्यंत त्याला दाबून धरायचा.

---

* खोखोल – युक्रेनी माणसाचे रशियन टोपणनांव. – अनु.

किंवा काहीवेळा स्वतःच्याच कॉलरखालचा एखादा जीवजंतू पकडून त्याला बुडवायचा...''

अशा प्रकारच्या अनेक गोष्टी मी आजी-आजोबांकडून ऐकलेल्या असल्याने त्या मला चांगल्या परिचित होत्या. पण त्या सर्व वेगवेगळ्या गोष्टींमधून एकच कथासूत्र होते: मानवी छळ आणि अपमानास्पद वागणूक. मला अशा गोष्टींची किळस आली होती.

"दुसरं काहीतरी सांगा,'' मी म्हणालो.

खटारेवाल्याच्या चेहऱ्यावरच्या सर्व रेषा त्याच्या तोंडाशी एकवटल्या. त्याने मान्यता दाखविली तेव्हा रेषा डोळ्यांपाशी सरकल्या.

"ठीक आहे हावरटा! दुसरी गोष्ट सांगतो. एकदा आमच्यापाशी एक आचारी होता...''

"कुणापाशी?''

"उमरावीण तात्यान अलेक्सेयेवनापाशी!''

"तुम्ही तिला तात्याना न म्हणता तात्यान असं पुरूषी नांवानं का बोलता? ती काही पुरुष नव्हती, होय ना?''

"अर्थातच नव्हती. ती बाई होती, पण तिला मिशी होती. बारीक काळी मिशी! जन्मानं ती काळी जर्मन होती–नीग्रोंसारखी एक जमात आहे. तर आमचा हा आचारी–मित्रा, ही गोष्ट फारच विनोदी आहे बरं का...''

ती विनोदी गोष्ट म्हणजे त्या आचाऱ्याने एकदा एक पक्वान्न बिघडवले आणि शिक्षा म्हणून एका दमात त्याला स्वतःलाच ते खायले लावले व त्यामुळे तो आजारी पडला, याची हकीकत होती.

"ही मुळीच विनोदी गोष्ट नाही,'' मी काहीसे चिडून म्हटले.

"मग काय गंमतीदार आहे? चल, तू तरी सांग पाहू.''

"मला ठाऊक नाही.''

"तर मग चूप बैस.''

पुन्हा एकदा त्यांनी आपल्या रटाळ गोष्टींचे चऱ्हाट लावले.

काहीवेळा रविवारी माझी मामेभावंडे आमच्याकडे येत–मिखाईलमामाचा दुःखी आणि आळशी साशा व याकोवमामाचा व्यवस्थित आणि समजदार साशा. एके दिवशी देवडयांवरच्या छपरांवर आम्ही स्वारी केली होती तेव्हा

बेतलेंग यांच्या कुंपणात लाकडाच्या ढिगावर बसून एक माणूस कुत्रीच्या पिलांशी खेळत असलेला आम्हाला दिसला. केसाळ किनारीचा लांब हिरवा कोट त्याने अगात घातला होता, पण त्याचे छोटे पिवळसर टक्कल बोडकेच होते. माझ्या एका मामेभावाने सुचविले की, आम्ही एक पिलू चोरायचे. झाले! ताबडतोब आम्ही युक्ती शोधली. माझ्या मामेभावंडांनी रस्त्यावर जाऊन बेतलेंगांच्या फाटकाशी थांबायचे आणि इकडे मी त्या माणसाला घाबरवायचे. तो पळाला की माझ्या भावांनी फाटकातून आत घुसायचे आणि एक पिलू पळवून आणायचे!

"कसं घाबरवू त्याला?"

"त्याच्या टकलावर थूंक!" एका भावाने सुचविले.

टकलावर थुंकण्यात काही फार दुष्टपणा आहे असे मला वाटले नाही, कारण त्यापेक्षा फार मोठे गुन्हे घडल्याचे मी पाहिले होते आणि ऐकले होते. तेव्हा माझ्यावर सोपवलेली कामगिरी पार पाडण्यात मी मुळीच आढेवेढे घेतले नाही.

पण माझ्या त्या कृतीने प्रचंड गोंधळ उडविला. बेंतलेंगांच्या घरातून पुरुषांचे आणि बायकांचे एक आख्खे सैन्यच्या सैन्य आमच्या अंगणावर चालून आले व त्याचे नेतृत्व एका रुबाबदार तरुण अधिकाऱ्याकडे होते. आणि तो गुन्हा घडला तेव्हा माझी मामेभावंडे रस्त्यावर निष्पापपणे खेळत होती असे सिद्ध झाल्यामुळे, माझ्या आजोबांकडून मला एकटयालाच खरपूस मार मिळाला. बेंतलेंग घराण्याकडून घडलेल्या अपमानाचे उट्टे काढण्यासाठी आजोबांनी मला जोरदार बडवून काढले.

स्वैपाकघरात मी मार खाऊन कण्हत पडलो होतो, अंगावर माराचे वळ उठले होते. अशा वेळी झकपक पोषाख करून अत्यंत प्रसन्न मुद्रेने प्योत्र-काका मला भेटायला आले.

"पोरा, मोठी नामी युक्ती शोधलीस," ते हळूच माझ्या कानात म्हणाले. "त्या म्हाताऱ्या बोकडाला चांगली अद्दल घडवलीस! त्या सगळयांवर थुंकलंच पाहिजे! त्याच्या कुजक्या टाळक्यावर विटकर हाणायला पाहिजे होतीस!"

हिरव्या कोटातील त्या माणसाचा गोल, केशविहीन, लहान मुलासारखा दिसणारा चेहरा मला आठवला. आपल्या छोटया हातांनी त्याने आपले

पिवळे टक्कल पुसले तेव्हा कुत्र्याच्या पिलाप्रमाणे तो कसा हळूच केविलवाणा केकाटला होता, ते मला आठवले. त्यावेळी मला माझ्या मामेभावांचा खूप राग आला होता आणि स्वत:ची कमालीची शरम वाटली होती. पण माझे आजोबा मला मार देत तेव्हा त्यांचा थरथरता चेहरा आक्रसून जसा भयानक आणि किळसवाणा दिसायचा, तसाच आत्ता प्योत्रकाकांचा जाळीदार चेहरा थरथरताना पाहून मी ती शरम पार विसरून गेलो.

"जा इथून!" माझ्या हाता-पायांनी प्योत्रकाकांना लोटून देत मी ओरडलो.

ते गालातल्या गालात हसले, त्यांनी डोळे मिचकावले आणि फळकुटा-वरून ते उठले.

त्या वेळेपासून त्यांच्याशी बोलण्याची मला कधीही इच्छा झाली नाही. मी त्यांना टाळू लागलो आणि जणू काहीतरी त्यांचा अस्पष्ट संशय असावा अशा रीतीने त्यांच्यावर पाळत ठेवू लागलो.

या घटनेपाठोपाठ लौकरच आणखी एक घटना घडली. ओवस्यान्निकोव यांच्या निवांत घराबाबत माझ्या मनात काही काळापासून गुप्त कुतूहल निर्माण झाले होते. त्या राखाडी रंगाच्या घरात गूढ परीकथेमधील वातावरण नांदत होते असे मला भासायचे.

बेतलेंग यांच्या घरात नेहमी गजबज आणि आनंदी वातावरण असे. तिथे अनेक सुंदर, आकर्षक तरुणी रहात होत्या व त्यांचा अनुनय करण्या-साठी महाविद्यालयीन विद्यार्थ्यांची आणि लष्करी अधिकाऱ्यांची तेथे रीघ लागलेली असायची. गप्पांचे, हसण्याचे, गाण्याचे आवाज तेथून नेहमी ऐकू येत. त्या एकूण घरालाच एक उल्हसित रूप होते. त्याच्या झगमगत्या खिडक्यांमधून कुंडयांमधील झाडा-झुडुपांचा हिरवेपणा जास्तच ठळकपणे उठून दिसायचा. माझ्या आजोबाना हे घर आवडत नसे.

"व्यभिचारी! पाखंडी!" त्या घरातील एकूण रहिवाशांना उद्देशून आजोबा म्हणत आणि बायकांना उद्देशून एक अत्यंत घाणेरडा शब्द वापरीत. त्या शब्दाचा अर्थ प्योत्रकाकांनी एकदा अत्यंत आसुरी समाधानाने तशाच घाण पद्धतीने मला समजावून सांगितला.

पण ओवस्यान्निकोव यांच्या त्या कठोर आणि नि:शब्द घराने आजोबा दबून जायचे.

ते उंच एकमजली घर होते आणि गवताचा गालिचा पसरलेल्या खुल्या, स्वच्छ आवारापर्यंत त्याचा विस्तार होता. आवाराच्या मध्यभागी एक विहीर होती व तिच्यावर दोन खांबांवर आधारलेले आच्छादन होते. घराची ठेवण रस्त्यापासून दूर होती आणि जणू ते लपले आहे असा भास व्हायचा. इमारतीच्या दर्शनी भागाला तीन निरुंद कमानदार खिडक्यांनी शोभा आणली होती. त्यांची तावदाने सूर्यप्रकाशात इंद्रधनुष्याप्रमाणे चमकायची. मुख्य फाटकाच्या उजव्या अंगाला असलेल्या कोठारालाही त्या घराच्या खिडक्यांशी अनुरूप अशा तीन खिडक्या होत्या. पण त्या नकली खिडक्या होत्या. भिंतीमध्ये नक्षी कोरून त्या बनविल्या होत्या आणि त्यांची तावदाने व चौकटी पांढऱ्या रंगात रंगविलेल्या होत्या. त्या बंद खिडक्यांमध्ये काहीतरी अप्रिय होते व त्या कोठारामुळे पाहणाऱ्याच्या मनावर एक वस्तुस्थिती ठासून उमटायची, की ते घर लपून राहू पहात होते, स्वतःचे असे एकाकी जीवन जगू पहात होते. रिकामे तबेले आणि प्रचंड दारांची रिकामी कोठारे यांच्यासह ती संपूर्ण वास्तू एका निःशब्द जखमेचे किंवा मूक अभिमानाचे निःश्वास टाकीत होती.

काहीवेळा एक उंच, दाढी नसलेला पण पांढऱ्या पिस्कारलेल्या मिशांचा म्हातारा माणूस आवारामधून लंगडत फिरताना दिसायचा. कधीमधी दुसरा एक कल्लेदार आणि बाकदार नाकाचा म्हातारा तबेल्यामधून राखाडी रंगाचा घोडा बाहेर काढताना दिसायचा. निरुंद छातीचा, सडपातळ पायांचा तो घोडा अंगणात आल्यानंतर एखाद्या नम्र जोगिणीप्रमाणे प्रत्येक गोष्टीपुढे मान झुकवायचा. तो पंगू म्हातारा माणूस घोड्याच्या पाठीवर जोरात थाप मारायचा, शीळ घालून खोल निःश्वास टाकायचा आणि घोड्याला परत अंधाऱ्या तबेल्यात पाठवायचा. त्या म्हाताऱ्याला त्या घरामधून पळून जावेसे वाटत असावे, पण कुठल्यातरी दुष्ट शक्तीने त्याला तेथे अडकवून ठेवले असावे, असे मला भासायचे.

जवळजवळ दररोज दुपारपासून संध्याकाळपर्यंत तीन लहान मुलगे अंगणात खेळत असत. त्या तिघांच्याही विजारी राखाडी रंगाच्या असायच्या; अंगातील रशियन धर्तीचे सदरे व डोक्यावरच्या टोप्याही सारख्याच असायच्या. ते तिघेही दिसायलासुद्धा सारखेच होते—गोल चेहरे आणि राखाडी डोळे. केवळ त्यांच्या आकारावरूनच त्यांच्यातील भेद मला समजायचा.

कुंपणाच्या फटीतून मी त्यांना पहात असे, पण माझ्या दुर्दैवाने त्यांचे

माझ्याकडे लक्ष गेले नाही. मला अपरिचित असलेले खेळ ती मुले ज्या आनंदाने, प्रेमाने खेळत ते पाहण्यात एक मौज होती. ज्या पद्धतीने ते पोषाख करीत आणि ज्या पद्धतीने ते एकमेकांची काळजी घेत, ती पद्धती मला खूप आवडायची. विशेषत: दोघे मोठे सर्वांत छोटयाची ज्या पद्धतीने काळजी घ्यायचे, ते मला खूप आवडायचे. तो छोटा पोरगा छान गुटगुटीत आणि गंमतीदार होता. तो खाली पडला म्हणजे ते हसायचे; कुणीही माणूस पडला म्हणजे इतर माणसे हसतात त्याप्रमाणे! पण या मुलांच्या हसण्यात कसलाही दुष्टपणा नसायचा. ते चटकन त्या छोटयाला उठून उभे रहायला मदत करायचे, झुडुपांच्या पाल्याने किंवा हातरुमालांनी त्याचे हात आणि ढोपरे पुसून साफ करायचे.

"बावलत कुथला!" मधला म्हणायचा.

ते एकमेकांमध्ये कधीही मारामारी करीत नसत अगर एकमेकांच्या खोडचा काढीत नसत. तिघेही चांगले बळकट, चपळ आणि उत्साहाने मुसमुसलेले होते.

एके दिवशी मी झाडावर चढलो आणि त्यांना शीळ घातली. शीळ ऐकताच ते खेळायचे थांबले, त्या तिघांच्याही नजरा माझ्याकडे वळल्या आणि त्यांनी आपापसात मिळून खलबत केले. ते माझ्यावर दगड मारायला सुरुवात करतील अशी माझी अपेक्षा होती. म्हणून मी खाली उतरलो आणि माझ्या सदऱ्याच्या ओंजळीत, खिशांमध्ये भरपूर दारूगोळा भरून घेतला व पुन्हा झाडावर चढलो. पण एव्हाना ते आवाराच्या दूरच्या कोपऱ्यात पुन्हा खेळण्यात गुंतले होते व माझ्याबद्दल सर्व काही विसरून गेले होते असे दिसत होते. मला अर्थातच याचे वाईट वाटले, पण युद्धाला प्रथम सुरुवात करण्याची माझी इच्छा नव्हती. तेवढयात कुणीतरी खिडकीतून हाक मारली:

"मुलांनो, लौकर घरात या!"'

ते तिघेही आज्ञाधारकपणे पण मुळीच घाई न करता वळले आणि बदकां-प्रमाणे एकापाठोपाठ चालू लागले.

ते मला खेळायला बोलावतील या आशेने अनेकवेळा मी झाडावर चढून बसायचा, पण त्यांनी कधीही बोलावले नाही. मी कल्पनेनेच त्यांच्या खेळात अनेकदा सामील व्हायचा, उत्साहाच्या भरात हाका मारायचा, मोठ्यांदा हसायचा. अशावेळी तिघेही माझ्याकडे पहायचे आणि एकमेकांमध्ये

हळूच शेरे मारायचे. मग मात्र मी लाजून सुळकन झाडावरून खाली उतरायचा.

एके दिवशी ते लपंडाव खेळत होते. मधल्या भावावर 'राज्य' होते. डोळयांवर गच्च हात धरून, चोरून न बघता तो कोठाराच्या एका कोपऱ्याला उभा होता, तर दुसरे दोघे भाऊ लपत होते. कोठाराच्या पुढे आलेल्या छपराचा आडोसा लाभलेल्या घसरगाडीवर सर्वांत मोठा मुलगा पटकन चढून बसला. पण छोटा मात्र कुठे लपावे ते न सुचल्यामुळे विहीरी-भोवती गरागरा चकरा मारीत राहिला.

"एक ऽ!" ज्याच्यावर 'राज्य' होते तो मुलगा ओरडला. "दोन..."

त्या छोटुकल्याने घाईघाईने विहीरीच्या कठड्यावर पाय ठेवला, दोर हातात पकडला व रिकाम्या बादलीत उडी मारली. तात्काळ ती बादली विहीरीच्या कडांवर थडथड आपटत अदृश्य झाली.

विहीरीचा दोर वेगाने आणि काहीही आवाज न करता उलगडत जात असलेला पाहून मी भीतीने थिजून गेलो. पण त्याचा परिणाम काय घडेल याची मला ताबडतोब जाणीव झाली व त्यांच्या आवारात उडी ठोकीत मी ओरडलो :

"धावा, धावा ऽ, तो विहीरीत पडला ऽऽ!"

मी विहीरीपाशी पोचलो त्याच वेळी मधला भाऊ तेथे पोचला होता आणि त्याने दोर गच्च पकडताच त्याचे पाय जमिनीपासून एकदम वर उचलले गेले व हात सोलून निघाला. पण मीही दोर पकडला आणि दरम्यान सर्वांत मोठा मुलगा तेथे धावत आला व बादली वर खेचायला त्याने मला मदत केली.

"एवढ्या वेगानं ओढू नको," तो म्हणाला.

आम्ही त्या छोट्याला वाचविले. तो कमालीचा घाबरला होता, त्याच्या उजव्या हाताच्या बोटांमधून रक्त वहात होते, त्याच्या एका गालावर जोरदार ओरखडा निघाला होता. तो कमरेपर्यंत चिप्पं भिजला होता व त्याचा चेहरा पांढराफटक पडला होता. पण तरीही हसून तो थरथरत म्हणाला :

"असा क... सा मी प... दलो ऽ!"

"वेडा कुथला ऽ!" मधला बोबडे बोलला. त्याने छोट्याला मिठी

मारून त्याच्या चेहऱ्यावरचे रक्त पुसले. सर्वांत मोठ्याने कपाळाला आठी घालून म्हटले :

"चला आता. झालं ते आपल्याला लपवून ठेवता येणार नाही. तेव्हा घरी जाऊ या."

"तुम्हाला मार मिळेल?" मी विचारले.

त्याने मानेनेच हो म्हटले आणि माझ्यापुढे हस्तांदोलनासाठी हात पुढे करीत तो म्हणाला :

"तू खूप जोरात धावत आलास."

त्याच्या स्तुतीने मी एवढा भारावून गेलो की त्याचा हात हाती घेण्याचे मला काही क्षण भानच राहिले नाही. दरम्यान तो मधल्या भावाकडे वळून म्हणत होता :

"चला, नाही तर त्याला थंडी बाधेल. तो पडला एवढंच आपण सांगू. विहीरीबद्दल सांगण्यात अर्थ नाही."

"हो," छोट्याने संमती दिली. "मी दबक्यात पडलो असं सांगू!"

आणि ते तिघेही घरात गेले.

या सर्व गोष्टी एवढ्या वेगाने घडल्या होत्या की, त्या फांदीवर मी बसलो होतो तिच्याकडे नजर टाकली तेव्हा अजूनही ती हलत असल्याचे व पिवळी पाने जमिनीवर उधळीत असल्याचे मला आढळले.

त्यानंतर सुमारे आठवडाभर ते भाऊ आवारात दिसले नाही आणि जेव्हा ते परत आले तेव्हा पूर्वीपेक्षाही जास्त गोंगाट करीत होते. ज्या क्षणी मोठ्याने मला पाहिले त्याच क्षणी मैत्रीभावनेने त्याने मला साद घातली :

"ये रे आमच्याबरोबर खेळायला!"

आम्ही घसरगाडीत चढून बसलो आणि बराच वेळपर्यंत गप्पा मारून एकमेकांशी ओळखी करून घेतल्या.

"तुम्हाला मार बसला?" मी विचारले.

"हो. बसायचा तेवढा बसला!" सर्वांत मोठा उत्तरला.

या मुलांनासुद्धा माझ्याप्रमाणेच मार खावा लागतो यावर विश्वास ठेवणे मला जड गेले. त्यांना मार बसणे योग्य नव्हे असे मला वाटले.

"तू पक्षी कशाला पकडतोस?" छोट्याने विचारले.

"कारण ते छान गातात."

"पुन्हा नको पकलू त्यांना. जायचं तिकलं जाऊ दे त्यांना!"

"बरं! यापुढं नाही पकडणार!"

"पहिलाच तेवढा पकल आणि मला दे."

"कुठल्या प्रकारचा?"

"खूप मजेदाल... पिंजल्यात थेवायला ऽ!"

"तो गाणारा छोटा पक्षी."

"मांजर मारून टाकील त्याला," मधला म्हणाला. "आणि त्याला थेवायला बाबा परवानगी देणार नाहीत आपल्याला!"

"बरोबर आहे तुझं," सर्वांत मोठा मधल्याला म्हणाला.

"तुम्हाला आई नाही?"

"नाही," सर्वांत मोठा उत्तरला, पण मधल्याने त्याची दुरुस्ती केली:

"आम्हाला आई आहे, पण दुसरी – आमची नाही – आमची वारली!"

"तशा आईला सावत्रआई म्हणतात," मी म्हणालो आणि सर्वांत मोठ्याने मान डोलावली.

"बरोबर!"

ते तिघेही एकदम उदास होऊन गप्प बसले.

सावत्रआई कशी असते ते मला आजीच्या गोष्टींमधून माहीत झाले होते. त्यामुळे त्यांची स्तब्धता मी समजू शकत होतो. तीन वाटाण्यांप्रमाणे ते तिघे एकमेकांना चिकटून बसले होते. खऱ्या आईची जागा घेण्यासाठी वाईट मार्गांचा अवलंब करणाऱ्या चेटक्या सावत्रआईच्या गोष्टीची मला आठवण झाली व त्या मुलांचे सांत्वन करण्यासाठी मी म्हणालो:

"काळजी करू नका. तुमची खरी आई अजूनही परत येईल."

"एकदा मेल्यानंतर आता परत कशी येईल? तसं कधीच घडत नाही," खांद्याला झटका देत सर्वांत मोठा म्हणाला.

कधीच घडत नाही? कमाल आहे! संजीवनी देणारे पाणी शिंपडल्यानंतर नुसते मेलेलेच नव्हे तर अगदी खांडोळी झालेले लोकसुद्धा कितीतरी वेळा परत जिवंत झाले होते! आणि कितीतरी वेळा आलेला मृत्यू हा देवाने पाठवलेला मृत्यू नसून चेटक्यांची आणि जादूगारांची करामत ठरला होता!

आजीच्या गोष्टी मी त्यांना मोठ्या उत्साहाने सांगू लागलो, पण सर्वांत मोठा तुच्छतेने हसला आणि म्हणाला:

"आम्ही त्या गोष्टी ऐकल्यात. त्या नुसत्या परीकथा आहेत!"

त्याचे भाऊ गप्प राहून ऐकत होते. छोटयाच्या कपाळावर आठी पडली होती आणि त्याचे ओठ आवळलेले होते, मधल्याने एका हाताचा कोपरा स्वतःच्या गुडघ्यावर ठेवला होता आणि दुसऱ्या हाताचा विळखा छोटयाच्या मानेभोवती घालून तो माझ्या दिशेने झुकला होता.

एव्हाना संध्याकाळ होत आली होती. घरांच्या छपरांवर गुलाबी ढग ओठंगले होते. तेवढ्यात पांढरे कल्लेवाला म्हातारा आमच्यासमोर येऊन ठाकला. त्याने पाद्र्यासारखा पायघोळ तपकिरी कोट घातला होता व त्याच्या डोक्यावर केसाळ टोपी होती.

"कोण आहे तो?" माझ्याकडे बोट करून त्याने विचारले.

सर्वांत मोठा मुलगा उठून उभा राहिला आणि त्याने मानेने माझ्या आजोबांचे घर दाखविले.

"हा तिथं राहतो," तो म्हणाला.

"कुणी बोलावलं त्याला?"

तीनही मुले ताबडतोब घसरगाडीमधून खाली उतरली आणि गुपचूप घरी गेली. पुन्हा एकदा मला आज्ञाधारक बदकांची आठवण झाली.

म्हाताऱ्याने माझी बकोटी गच्च पकडली आणि आवारामधून मला फाटकाकडे नेले. घाबरून मी रडण्याच्या बेतात होतो, पण तो एवढ्या भरभर चालत होता, की मला रडायला अवसर मिळण्यापूर्वीच मी रस्त्यावर पोचल्याचे मला आढळले. फाटकाशी उभे राहून माझ्याकडे बोट नाचवीत तो ओरडला:

"पुन्हा मला भेटायला आलास तर याद राख!"

"दुष्ट म्हाताऱ्या, मी मुळी तुला भेटायला आलोच नव्हतो!" रागाने मी प्रत्युत्तर केले.

त्याच्या लांब हाताने पुन्हा एकदा माझा ताबा घेतला आणि फूटपाथवरून चालताना माझ्या डोक्यावर हातोड्याचे घण घालावे तसा एकच एक प्रश्न तो मला पुनःपुन्हा खोदून विचारीत राहिला:

"तुझे आजोबा घरी आहेत?"

माझ्या दुर्दैवाने आजोबा घरात होते. त्या महाभयंकर म्हाताऱ्यासमोर

मान वर करून, दाढीचे टोक पुढे काढून, कोपेकच्या नाण्याएवढ्या गोल आणि निस्तेज डोळ्यांमध्ये बघत ते म्हणाले:

"त्याची आई इथं नाही, मी कामात असतो आणि त्याच्यावर लक्ष ठेवायला कुणी नाही. कर्नलसाहेब, मी आपली माफी मागतो!" घाईघाईने आजोबा म्हणाले.

सबंध घराला ऐकू जाईल अशी कर्नलनी डरकाळी फोडली व टाचेवर गर्रकन वळून ते ताडताड निघून गेले. काही वेळानंतर माझी वळलेली गठडी प्योत्रकाकांच्या खटाऱ्यात पडली होती!

"काय मित्रा, पुन्हा मिळाला वाटतं प्रसाद?" प्योत्रकाकांनी घोड्याला गाडीपासून मोकळा करीत विचारले. "आज कशाबद्दल मार मिळाला?"

मी त्यांना जेव्हा सर्व हकिकत सांगितली तेव्हा ते संतापाने दातओठ खात फुत्कारले:

"त्या तशा पोरांची मैत्री करायची गरज काय होती तुला? ती बड्या लोकांची पिल्लं! त्यांच्यापायी तुला काय भोगावं लागलं ते पाहिलंस? यापुढं तू त्यांचं तसंच उट्टं काढ!"

ते स्वतःशीच पुटपुटत राहिले. मारामुळे दुखावल्यामुळे आरंभी त्यांचे म्हणणे मला योग्य वाटले. पण त्यांचा सुरकुतला किळसवाणेपणाने थरथरताना पाहिला तेव्हा मला एकदम एका वस्तुस्थितीची जाणीव झाली की, त्या मुलांनासुद्धा चोप मिळाला असणार आणि तसे पाहिले तर त्यांनी माझा कोणत्याही रीतीने मुळीच अपमान केला नव्हता.

"मी कशाला त्यांचं उट्टं काढू?" मी म्हणालो. "आणि तुम्ही निव्वळ थापा मारताय!"

माझ्याकडे त्यांनी तिखटपणे कटाक्ष टाकला आणि अचानक खेकसले:

"उतर माझ्या गाडीतून!"

"मूर्ख!" खाली उडी मारीत मी ओरडलो.

"मी मूर्ख काय? मी खोटारडा काय? थांब तुला दाखवतो..." आणि ते अंगणात माझा पाठलाग करू लागले. पण मला पकडू शकले नाही.

तेवढ्यात आजी परसदारी बाहेर आली आणि मी तिच्यापाशी धावलो. प्योत्रकाका माझ्याबद्दल तिच्याकडे कागाळी करू लागले:

"हे कारटं भोवती असलं म्हणजे क्षणाची शांतता लाभू देत नाही!

त्याच्या जिभेला लगाम नाही — काय वाट्टेल ती घाणेरडी नांवं ठेवतो मला! आता मी त्याच्यापेक्षा किती पटींनी मोठा वयानं..."

लोक जेव्हा माझ्या तोंडासमोर धडधडीत खोटे बोलत तेव्हा मी सुन्न होऊन जात असे. तसाच मी आता अवाक होऊन उभा होतो. पण आजी खंबीर आवाजात म्हणाली:

"प्योत्र, तुम्ही जरा जास्तच अतिशयोक्ती करत नाही का? तुम्हाला त्यानं घाण शिव्या दिल्या हे खरं नव्हे!"

पण माझ्या आजोबांनी मात्र त्या खटारेवाल्याच्या शब्दांवर विश्वास ठेवला असता.

त्या दिवसापासून माझे आणि खटारेवाल्याचे संबंध बिघडले. एक प्रकारचे मूक, नाठाळ युद्ध आम्हा दोघांमध्ये सुरू झाले. सहजपणाचा आव आणून लगामांनी मला टोकण्याची किंवा मारण्याची संधी तो शोधू लागला. माझे पक्षी त्याने मोकळे सोडले व एक दिवस त्याने मांजराला त्यांच्यावर चवताळून पाठवले. कुठल्याही निमित्ताचा हमखास बाऊ करून तो सतत माझ्या आजोबांपाशी माझ्याविषयी तक्रारी करू लागला. माझ्यासारखाच पण म्हाताऱ्याचा पोषाख केलेला मुलगा — या व्यतिरिक्त दुसऱ्या नजरेने त्याच्याकडे पाहणे मला अशक्य ठरले. त्याला उलट उत्तर म्हणून मी त्याचे लाप्ती* उसवून ठेवू लागलो. एक दिवस मी त्याच्या टोपीवर काळी मिरी शिंपडून ठेवली आणि नंतर तासभर तो शिंकत राहिला. ठोशास ठोसा या नात्याने एकूण मी वागत होतो. रविवारी तो आख्खा दिवस माझ्यावर पाळत ठेवण्यात घालवू लागला. बड्या माणसांच्या पिल्लांशी मी बेकायदेशीर दळणवळण साधत असताना त्याने काहीवेळा मला धरले होते व ताबडतोब आजोबांकडे जाऊन वर्दी दिली होती.

मी त्या मुलांशी माझी मैत्री चालूच ठेवली होती व तिच्यामधून मला जास्त जास्त आनंद लाभत होता. माझ्या आजोबांच्या घराची भिंत आणि ओवस्यान्निकोव यांचे कुंपण यांच्या दरम्यान पांढऱ्या फुलांच्या झुडुपांनी माजलेला एक कोपरा होता. त्याच्यावर एल्म आणि लिंबोणीच्या झाडांनी सावली धरली होती. त्या झुडुपांआड मी कुंपणाचा थोडा भाग तोडून

---

* तागाचे सँडल. — अनु.

मोकळा केला होता. त्या मोकळ्या जागेमधून ती भावंडे आळीपाळीने अथवा जोडयांनी येऊन शांतपणे माझ्याशी गप्पा मारीत. कर्नल आम्हाला पकडणार नाहीत याची खबरदारी घेण्यासाठी त्यांच्यापैकी एकजण नेहमी पहारा ठेवायचा.

त्यांचे जीवन किती रटाळ होते याची हकिकत त्यांनी मला सांगितली आणि त्यामुळे मी जास्तच उदास झालो. आम्ही माझ्या पक्ष्यांबद्दल बोलत असू, आमच्या अनेक बालसुलभ आवडींविषयी गप्प मारीत असू. पण त्यांनी आपल्या वडिलांचा किंवा सावत्रआईचा एकदाही उल्लेख केल्याचे माझ्या तरी आठवणीत नाही. बहुतेक वेळा ते मला गोष्टी सांगायचा आग्रह करीत व आजीपासून ऐकलेल्या सर्व कहाण्या मी मोठ्या चोखपणे त्यांना सांगत असे. जर मी मध्येच काही विसरलो तर त्यांना थोडा वेळ थांबायला सांगायचा आणि तेवढ्यात पळत पळत जाऊन आजीकडून विचारून यायचा. ती मोठ्या आनंदाने ते काम करायची.

माझ्या आजीविषयी मी त्यांच्यापाशी वारंवार बोलत असे. एक दिवस सर्वांत मोठा मुलगा खोल उसासा टाकीत म्हणाला:

"सगळ्या आज्या चांगल्या असाव्यात. आमचीसुद्धा फार छान आजी होती..."

"होती," "असायची," "एकदा"... असे शब्द तो वारंवार अणि खिन्नपणे पुन:पुन्हा इतक्या वेळा वापरीत असे की, फक्त अकराऐवजी तो शंभर वर्षे जगला असावा, असे वाटायचे. लांब सडपातळ बोटे असलेले त्याचे हात नाजुक असल्याचे मला आठवते. तो स्वत:ही नाजुक आणि कृश होता. त्याचे डोळे लाजरे होते आणि चर्चमधील पुतळ्यांसमोरील दिव्यांसारखे नितळ होते. त्याच्या भावांचाही मला लळा लागला होता. त्यांनी माझी सहानुभूती पटकावली होती व त्यांच्यासाठी काहीतरी चांगले करावे असे मला सारखे वाटायचे. पण सर्वांत मोठा मुलगा हा माझा जास्त आवडता होता.

आमच्या संभाषणात मी एवढा गुंगलेला असे, की प्योत्रकाका आमच्या जवळ आलेले माझ्या बहुधा लक्षातच येत नसे. त्यांच्या हेल काढून उच्चारलेल्या शब्दांनी आम्ही दचकत असू:

"का ऽऽ य! पु ऽ न्हा ऽऽ?"

उदास एकाकी बसण्याची त्यांची लहर वाढत चालल्याचे माझ्या लक्षात

येत होते. कामावरून परततांना त्यांची कोणती मन:स्थिती असे ते ओळखायलाही मी शिकलो होतो. एरवी ते सावकाशपणे फाटक उघडीत, त्यामुळे फाटकाच्या बिजागऱ्यांची खूप वेळ करकर होई. पण खटारेवाला वाईट मन:स्थितीत असला तर वेदनेने ओरडल्याप्रमाणे बिजागऱ्या खर्ररदिशी एकदम वाजून गप्प होत.

त्यांचा मुका पुतण्या लग्न करण्यासाठी खेड्याला परत गेला होता. तबेल्यातील बैठ्या छताच्या खोलीत प्योत्र एकटेच रहात होते. त्या खोलीला एकच छोटी खिडकी होती व डांबर, जुनी कातडी, तंबाखू आणि घाम यांचा संमिश्र दर्प तेथे दरवळायचा. त्या दर्पामुळे मी तेथे कधीही जाऊ शकत नव्हतो. अलिकडे ते दिवा न विझवता झोपत व ही गोष्ट आजोबांना मुळीच आवडत नव्हती.

"प्योत्र, काळजी घे हां, नाहीतर एक दिवस आग लावशील," ते म्हणायचे.

"आगीची भीती नाही. रात्रीच्या वेळी पाण्याच्या तसराळ्यात मी दिवा उभा ठेवतो," त्यांनी दुसरीकडेच कुठेतरी नजर वळवीत उत्तर दिले होते.

अलिकडे ते नेहमी चोरट्या नजरेने इकडेतिकडे पहात वावरत असत. आजीच्या मैफलींना येण्याचे व आम्हाला मुरंबा खाऊ घालण्याचेही त्यांनी बंद केले होते. त्यांचा चेहरा जास्तच सुकला होता, त्यांच्या सुरकुत्या जास्त खोल गेल्या होत्या आणि चालताना त्यांचा आजारी माणसाप्रमाणे झोक जात होता.

रात्रीच्या वेळी चिक्कार पडलेले बर्फ फावड्याने बाजूला सारून अंगण साफ करण्याचे काम एके सकाळी आजोबा आणि मी करीत होतो. तेवढ्यात फाटकाची कडी जरा जोरानेच वाजली, एक पोलिस अंगणात आला, त्याने फाटक बंद केले व फाटकाकडे पाठ करून उभे रहात त्याने आपल्या जाडजूड राखाडी बोटाने खूण करून माझ्या आजोबांना स्वत:जवळ बोलाविले. आजोबा जेव्हा त्याच्यापाशी गेले तेव्हा पोलिसाने आपले भलेमोठे नाक आजोबांच्या नाकाशी नेऊन काहीतरी म्हटले. त्यासरशी आजोबा घाईघाईने उत्तरले :

"इथं? केव्हा? मला तर आठवत नाही..."

एकदम ते विदूषकासारखे दचकले आणि ओरडले :

"अरे देवा परमेश्वरा! खरंच?"

"श्शू ऽऽ !" पोलिसाने ताकीद दिली.

आजोबांनी अवतीभोवती नजर टाकली. मी दृष्टीस पडताच म्हणाले:

"फावडी घेऊन घरात जा!"

घराच्या कोपऱ्यामागे लपून मी त्यांना न्याहाळू लागलो. तबेल्यामधील खटारेवाल्याच्या खोलीत ते दोघे गेले. पोलिसाने उजव्या हातामधील हातमोजा काढला व डाव्या हातावर त्याचे फटकारे तो मारू लागला.

"त्याला बेटचाला बरोब्बर समजलं! आपला घोडा टाकून पसार झाला!"

मी जे काही पाहिले आणि ऐकले होते ते सांगण्यासाठी स्वैंपाकघरात आजीकडे धावलो. पीठ मळता मळता आपले पिठाने पांढरे झालेले डोके हलवीत ती ऐकत होती.

"काहीतरी चोरी-बिरी केली असावी," माझे बोलणे संपल्यावर ती शांतपणे म्हणाली. "बाहेर पळ खेळायला! तुला काय करायच्यात या भानगडी?"

मी पुन्हा अंगणात धावत गेलो तेव्हा आजोबा फाटकापाशी टोपीविना उभे होते, त्यांचे डोळे आकाशाकडे वळले होते व ते क्रूसाची चिन्हे करीत होते. त्यांचा चेहरा रागावलेला आणि फिस्कारलेला होता व त्यांचा एक पाय झटके देत होता.

"तुला घरात जायला सांगितलं होतं ना?" पाय आपटीत आजोबा ओरडले.

माझ्या पाठोपाठच ते स्वैंपाकघरात आले आणि आजीला म्हणाले:

"इकडं ये ग!"

ती दोघे दुसऱ्या खोलीत गेली आणि बराच वेळपर्यंत कुजबुजत राहिली. आजी जेव्हा परतली तेव्हा तिच्या चेहऱ्याकडे एक कटाक्ष टाकताच मला समजले की काहीतरी महाभयानक घडले होते.

"कशाला घाबरलीयस?" मी विचारले.

"तू जरा तोंड बंद ठेव बघू," ती हळूच उत्तरली.

उरलेला सारा दिवस घरातील वातावरण तंग आणि धास्तावलेले होते. आजोबा आणि आजी एकमेकांकडे सूचक कटाक्ष फेकीत होते, तुटक आणि

अनाकलनीय शब्द उच्चारीत होते. त्यामुळे धोक्याची भावना अधिकच वाढत होती.

"पुतळ्यांचे सगळे दिवे पेटव ग," घसा खाकरून साफ करीत आजोबांनी आज्ञा केली.

घाईघाईनेच त्यांनी जेवण आटपले. जणू कुणाची तरी वाट पहात असल्याप्रमाणे! त्यांना भूक नव्हतीच. आजोबांनी थकलेपणाने खोकून घसा साफ केला आणि ते पुटपुटले:

"सैतानापुढं माणसानं मुकाबला करणं कठीणच! त्याचंच उदाहरण पहा: दिसायला एवढा भाविक, देवभक्त माणूस आणि बघा करणी त्याची!"

आजीने उसासा टाकला.

तो रूपेरी हिवाळी दिवस रखडत रखडत अखंडपणे रेटत चालला होता. घरातील वातावरण दर तासागणिक जास्त जास्त अस्वस्थ बनत होते व दडपण वाढत होते.

संध्याकाळच्या सुमाराला आणखी एक पोलिस आला. तो जाडा आणि तांबडकेशा होता. स्वैंपाकघरातील बाकड्यावर बसून मान डोलवीत व नाकाने सूं सूं आवाज करीत डुलक्या घेत राहिला.

"त्यांनी शोधून कसं काढलं?" आजीने विचारले.

थोडा वेळ थांबून त्याने रुक्षपणे उत्तर दिले:

"काळजी करू नका. ते सारं काही शोधून काढतात."

त्यावेळी खिडकीशी बसून मी तोंडातल्या वाफेने एक जुने नाणे गरम करीत होतो व खिडकीच्या गोठलेल्या तावदानावर विजयी सेंट जॉर्जचे चिन्ह उमटविण्याच्या खटपटीत होतो, असे मला आठवते.

अचानक व्हरांड्यात बरीच गडबड ऐकू आली व घराचे दार सताड उघडले गेले. पेत्रोव्ना उंबरठ्याशी उभी राहून ओरडली:

"तुमच्या इस्टेटीवर काय पडलंय ते जरा जाऊन बघा!"

पोलिसाला बघताच ती एकदम मागे व्हरांड्यात सरली, पण त्याने चटकन तिच्या घागऱ्याचे टोक धरून खेचले आणि दरडावून विचारले:

"थांब जरा! कोण आहेस तू? बाहेर काय आहे?"

ती गुडघ्यांवर बसून रडू लागली. हुंदके देत देतच ती म्हणाली:

"मी गायीचं दूध काढायला बाहेर गेले आणि काशीरिनांच्या अंगणात एकदम एक बुटांची जोडी मला दिसली."

"चवचाल कुठली, खोटं बोलतेस!" संतापून आजोबा ओरडले. "आमच्या अंगणातलं तुला काहीही दिसणं शक्य नाही. कुंपण खूप उंच आहे आणि त्याला कुठंही भगदाडं नाहीत! खोटं बोलतेस! बाहेर काहीही नाही!"

"अरे देवा!" एक हात आजोबांकडे पसरून व दुसरा स्वतःच्या कपाळावर मारून घेत पेत्रोव्ना विव्हळली. "खरं ते मी सांगतेय आणि हा त्याला खोटं म्हणतो. मी चालले होते तेवढ्यात पावलांचे ठसे तुझ्या कुंपणापर्यंत गेलेले दिसले आणि एका जागी बर्फ तुडवलेला दिसला. म्हणून मी तुझ्या कुंपणावर चढून डोकावले तर तिथं..."

"क–क–को ऽऽ ण?"

हा उद्‌गार घाबरल्या आवाजात आणि निरर्थकपणे उमटला होता. मग एकाएकी डोके फिरल्याप्रमाणे प्रत्येकजण धक्काबुक्की करीत स्वैपाकघरामधून अंगणाकडे धावत सुटला. तेथे बर्फाने भरलेल्या खड्ड्यात प्योत्रकाका उताणे पडले होते. जळक्या खुंटाला त्यांची पाठ टेकली होती व मान छातीवर लुडकली होती. त्यांच्या उजव्या कानाच्या मागे एक मोठा घाव दिसत होता. तो घाव तांबड्या उघड्या तोंडासारखा भासत होता व त्याची निळसर झालर पुढे आलेल्या दातांसारखी वाटत होती. भीतीने मी डोळे मिटले. पण माझ्या किलकिल्या पापण्यांमधून मला प्योत्रकाकांच्या उजव्या मुठीतला चाकू त्यांच्या गुडघ्यांवर पडलेला दिसत होता आणि त्यांचा डावा हात बर्फात खुपसलेला होता. त्यांची कृश आकृती भुरभुरत्या बर्फात खोलवर रुतली होती व अंगाखालचा बर्फ वितळला होता. त्या अवस्थेत ते जास्तच बालिश भासत होते. त्याच्या उजव्या बाजूला बर्फावर विचित्र लाल आकृती उमटली होती. ती काहीशी पक्ष्याप्रमाणे वाटत होती. पण डावीकडचा बर्फ मात्र शुभ्र, निष्कलंक आणि चकचकत होता. त्यांचे डोके केविलवाणेपणे त्यांच्या छातीवर झुकले होते. त्यामुळे त्यांची कुरळी दाढी मागे सारली गेली होती व तिच्याखाली गळ्यात रूळणाऱ्या मोठ्या पितळी क्रूसावर रक्ताचे ओघळ साकळले होते. अनेक आवाजांमुळे माझे डोके भिरभिरत होते. पेत्रोव्ना अखंडपणे ओरडत होती. पोलिसाने ओरडून वालेईला कुठेतरी पिटाळले. आजोबा ओरडत होते:

"ठसे पुसू नका!"

एकदम त्यांनी कपाळाला आठ्या घालून नजर खाली झुकविली.

"अंमलदारसाहेब, असा आरडाओरडा करण्यात काही अर्थ नाही," मोठ्या, अधिकारयुक्त स्वरात आजोबा म्हणाले. "ही देवाची करणी आहे, हा देवानं दिलेला न्याय आहे. तुम्ही आणि तुमची अर्थहीन चौकशी — थू: तुमची!"

सारे लोक गप्प झाले व उसासे टाकीत क्रूसचिन्हे करून मृत माणसाकडे टक लावून पहात राहिले.

दुसरी काही माणसे पेत्रोव्नाच्या घराच्या बाजूने कुंपणावरून चढून धडपडत, धावत आमच्या आवारात आली. पण त्यांनी फारसा गोंगाट केला नव्हता. शेवटी आजोबांचे त्यांच्याकडे लक्ष जाताच ते आकांताने ओरडले :

"शेजाऱ्यांनो, तुम्ही रासबेरीची सारी झुडपं तुडवताय! तुम्हाला तुमचीच शरम वाटत नाही?"

आजीने मला हाताला धरून घरात नेले.

"त्यांनी काय केलं?" मी विचारले.

"तू पाहिलं नाहीस का?" हुंदके देत ती उत्तरली.

ती सारी संध्याकाळ आणि रात्री खूप उशीरपर्यंत अनोळखी माणसे स्वैपाकघरात आणि त्याशेजारच्या खोलीत वावरत होती. पोलिस हुकूम देत होते आणि पाद्र्यासारखा दिसणारा एक माणूस वहीत नोंदी करीत बदकासारख्या आवाजात सारखा विचारीत होता :

"ते कॉय? हे कॉय?"

आजीने सर्वांना चहा दिला. टेबलाशी एक गोलाकार, कल्लेदार, तोंडावर देवीचे व्रण असलेला माणूस बसला होता. तो कर्कश्य आवाजात म्हणाला :

"कुणालाही त्याचं खरं नांव माहीत नाही. तो एलात्माहून आलाय एवढंच त्यांना माहीत आहे. पण तो मुका-बहिरा मुळीच नाही. चांगला तुमच्या-आमच्यासारखा बोलतो आणि ऐकू शकतो. त्याच्याच तोंडून सगळा कबुलीजबाब बाहेर काढण्यात आला. आणि तिसऱ्या एका माणसानंही गुन्ह्याची कबुली दिली. म्हणजे तिसराही एक साथीदार होता असं दिसतं.

बरेच दिवस ते चर्चमध्ये चोऱ्या करत होते... त्यांचा तो खासा धंदा होता... ''

"अरे देवा!" घामाने चिंब झालेली व लालबुंद बनलेली पेत्रोव्ना उद्गारली.

मी वरच्या फळीवर आडवा होऊन खाली त्या सर्वांकडे पहात होतो. सारी माणसे खुजी, लठ्ठ आणि कुरूप भासत होती...

## १०

एका शनिवारी भल्या सकाळीच मी पेत्रोव्नाच्या बागेत सुंदर पिसाऱ्याचे गाणारे पक्षी धरायला गेलो होतो. काही वेळ गेला, पण ते डौलदार, लाल छातीचे प्राणी माझ्या जाळ्यात काहीकेल्या सापडेनात. आपल्या सौंदर्याचा दिमाख दाखवीत रूपेरी बर्फाच्या पापुद्र्यावर ते डौलाने काही पावले चालत किंवा झुडुपांमध्ये उडत जाऊन बर्फमाखल्या शुभ्र फांद्यांवर झोके घेत. निळसर चमकणाऱ्या हिमकणांमध्ये ते पक्षी गडद रंगाच्या फुलांप्रमाणे दिसत. हा सारा देखावा एवढा सुंदर होता, की शिकारीमधील अपयशाचे दुःख मला अजिबात होत नव्हते. तसा मी काही जातिवंत शिकारी नव्हतो. प्रत्यक्ष फलश्रुतीपेक्षा त्या एकूण प्रक्रियेमध्येच मला जास्त रस वाटायचा. पक्ष्यांच्या जीवनाचे निरीक्षण करण्यात आणि त्यावर चिंतन करण्यात मला अधिक स्वारस्य होते.

बर्फमाखल्या मैदानाच्या टोकाला अगदी एकटे बसावे आणि हिवाळ्यातील कोरड्या स्फटिक शांततेमध्ये पक्ष्यांची किलबिल ऐकावी, त्याचवेळी दूरवर कुठेतरी भरधाव जाणाऱ्या त्रोयका घसरगाडीच्या घोड्यांच्या गळ्यांमधील घंटांचा मंजुळ नाद ऐकावा, याहून अधिक आल्हादक ते काय असणार! त्रोयकाचा मंजुळ नाद म्हणजे रशियन हिवाळ्यामधील चंडोलाचे जणू विरहगीत!

जेव्हा थंडी अगदी हाडांपर्यंत पोचली आणि कान गोठून बधीर झाले तेव्हा मी माझी जाळी आणि पिंजरे गोळा केले, कुंपण चढून आजोबांच्या बागेत उडी घेतली आणि घराकडे गेलो. फाटक सताड उघडे होते व एक धिप्पाड बाप्या तीन घोडे जोडलेली एक मोठी, बंद घसरगाडी रस्त्यावर

नत होता. घोड्यांच्या तोंडामधून वाफेचे लोट उमटत होते, बाप्या मजेने शीळ घालीत होता. माझ्या काळजाचा ठोका एकदम थांबला.

"कुणाला आणलंस?" मी विचारले.

तो वळला, डोळ्यांवर हात आडवा धरून त्याने माझ्याकडे कटाक्ष टाकला आणि आपल्या जागेवर उडी मारून बसत तो म्हणाला:

"धर्मगुरूला!"

धर्मगुरू आला असेल तर मला त्याची फिकीर नव्हती. कुणा एखाद्या भाडेकरूच्या घरी तो आला असावा.

"चला रे माझ्या शिंगरांनो!" बाप्याने घोड्यांच्या पाठीवर हलकेच चाबूक उडवला. घोडे एकदम पुढे झेपावले आणि वातावरणात त्यांच्या गळ्यातल्या घंटांचा नाद घुमला. त्यांना दूरवर जाईपर्यंत मी निरखले, मग फाटक बंद केले आणि घरात गेलो. स्वैंपाकघरात मी प्रवेशलो तेव्हा शेजारच्या खोलीतून येणारा माझ्या आईचा घनगंभीर आवाज मी ऐकला:

"तर मग काय? माझं डोकं उडवणार–असंच ना?"

मी पिंजरे फेकून दिले आणि कोट न काढताच व्हरांड्याकडे धावलो. पण वाटेतच आजोबांनी मला धरले. त्यांनी रागीट डोळ्यांनी माझ्याकडे पाहिले, मोठ्या कष्टाने आवंढा गिळला व धाप टाकीत ते म्हणाले:

"तुझी आई आलीय, तिला आत जाऊन भेट! थांब!" त्यांनी मला एवढ्या जोरात गदगदा हलविले की माझा तोल राखणे मला अवघड झाले. मग दाराकडे लोटत ते म्हणाले:

"जा, जा."

मी दाराशी अडखळलो. माझ्या गोठलेल्या थरथरत्या बोटांनी दाराची कडी काढणे मला जमेना. शेवटी मी दार उघडले आणि उंबरठ्यावर अवाक होऊन उभा राहिलो.

शेवटी आला तर!" आई म्हणाली. "अग बाई, केवढा मोठा झालास रे! ओळखलं नाहीस मला? काय याला कपडे घातलेत? बघ, त्याचे कान गोठलेत! आई, लौकर थोडी बदकाची चरबी दे!"

खोलीच्या मध्यभागी माझ्यावर ओणवून ती उभी होती, माझ्या अंगातील कपडे काढून टाकीत होती आणि चेंडूप्रमाणे मला गोलगोल फिरवीत होती. तिचा मोठा देह मऊ, उबदार लाल पोषाखात झाकलेला होता.

तो पोषाख पुरुषाच्या पायघोळ कफनीसारखा मोठा होता. त्याच्यावर मोठी काळी बटणे तिरप्या ओळीत खांद्यापासून कमरेपर्यंत उतरत आली होती व तेथून सरळ खाली किनारीपर्यंत गेली होती. असा पोषाख यापूर्वी मी कधीही पाहिला नव्हता.

तिचा चेहरा पूर्वीपेक्षा लहान झालेला व जास्त फिकट वाटत होता. तिचे डोळे मोठे व खोल गेलेले दिसत होते, तिचे केस गडद सोनेरी बनले होते. माझ्या अंगावरून काढून टाकलेले कपडे तिने बाजूला फेकले, नाखुषीने आपल्या लाल ओठांना मुरड घातली आणि करडया आवाजात ती म्हणाली :

"तू काही बोलत का नाहीस? तुला आनंद झाला नाही? छीः, किती घाणेरडा सदरा!"

नंतर तिने बदकाची चरबी माझ्या कानांना चोळली. ते चोळणे दुखत होते, पण तिच्या अंगाला येणाऱ्या ताज्या, आल्हादक गंधामुळे मी ते दुःख विसरलो होतो. मी तिच्या अंगाला जास्त बिलगलो आणि तिच्या डोळयांमध्ये खोलवर पाहिले. माझ्या मनातील चलबिचलीमुळे माझ्या तोंडून एकही शब्द बाहेर फुटत नव्हता. ती जे काही बोलत होती त्याचा खुलासा म्हणून माझी आजो हळू आवाजात तक्रारीच्या सुरात बोलत असलेली मी ऐकले :

"तो अगदी हाताबाहेर गेलाय, आता त्याच्या आजोबांचाही त्याला धाक राहिला नाही. वार्या, वार्या, अग काय सांगू तुला..."

"उगीच कण्हू नकोस आई! सारं काही ठीक होईल!"

माझ्या आईपुढे सभोवतालचे सारे काही छोटे, जुनाट आणि रुक्ष वाटत होते. मी स्वतःसुद्धा माझ्या आजोबांच्या वयाचा असल्यासारखा मला भास होत होता.

आपल्या उबदार, भरदार हाताने माझ्या डोक्यावरून मायेने हात फिरवीत असताना तिने आपल्या दोन मांडयांमध्ये मला धरले होते.

"तुझे केस कापले पाहिजेत," ती म्हणाली. "आणि आता शाळेत जायचं वय झालंय तुझं. शिकायचंय ना तुला?"

"मी आधीच शिकलोय."

"आणखी खूप शिकायचं बाकी आहे. पण कसला दणकट पोरगा झालास रे तू!" असे म्हणून मला लाडाने कुरवाळीत ती मनापासून खळखळून हसली.

आजोबा धुसफुसत, तांबारलेल्या डोळ्यांनी खोलीत आले. एकाच झटक्याने तिने मला दूर ढकलले व मोठ्या आवाजात म्हटले :

"तर मग बाबा, काय करायचं मी? इथून जाऊ?"

नखांनी तावदानावरील बर्फ खरवडीत काहीही न बोलता ते खिडकीशी उभे राहिले. तेथील वातावरण एवढे ताणलेले होते की, माझे डोळे आणि कान विस्फारून जणू ते माझ्या संपूर्ण शरीराएवढे मोठे होतील असे मला वाटू लागले व जबरदस्त जोराने किंचाळण्याची भावना उरात दाटून आली.

"अलेक्सेई, इथून बाहेर जा," पडत्या आवाजात आजोबा म्हणाले.

"का म्हणून?" पुन्हा एकदा स्वत:पाशी मला ओढून घेत आईने विचारले.

"तू इथून जायचं नाही! माझी मनाई आहे!"

माझी आई उठून उभी राहिली आणि सूर्यास्तसमयीच्या लालभडक ढगाप्रमाणे खोलीत तिने झेप घेतली.

"बाबा, माझं ऐका," आजोबांमागे थांबत ती म्हणाली.

"चूप!" ते किंचाळले.

"उगीच तुमचं ओरडणं मी खपवून घेणार नाही!" शांतपणे आई म्हणाली.

"वार्वारा!" कोचावरून उठत बोट नाचवून दम भरीत आजी ओरडली, तर आजोबा हताशपणे खुर्चीत बसकण घालीत स्वत:शीच पुटपुटले :

"काय आहे काय हे? अं? कोण आहे मी? या साऱ्याला काय म्हणायचं?"

एखाद्या जखमी श्वापदाप्रमाणे अचानक त्यांनी आरोळी ठोकली :

"वार्का, तू मला काळीमा फासलास!"

"बाहेर जा," आजी मला म्हणाली. अत्यंत दुःखी मनाने मी स्वैपाक-घरात गेलो आणि चुलाण्यावर चढून बसलो. तेथे दुसऱ्या खोलीमधील सर्व आवाज ऐकू येत होते. मध्येच सारे तावातावाने बोलू लागत, मध्येच सारे जणू गाढ झोपी गेल्याप्रमाणे गप्प होत. माझ्या आईने बाळाला जन्म दिला होता व कुणापाशी तरी ते सोडून आली होती, त्याबद्दल ते बोलत होते. माझ्या आईने माझ्या आजोबांच्या संमतीविना बाळाला जन्म दिला होता

म्हणून ते रागावले होते, अथवा ती बाळाला त्यांच्याकडे घेऊन आली नव्हती म्हणून ते रागावले होते, हे सांगणे कठीण होते.

सरतेशेवटी लालबुंद चेहरा करून, पूर्ण विस्कटलेल्या आणि थकलेल्या अवस्थेत ते स्वैपाकघरात आले. त्यांच्या पाठोपाठ गालावरचे अश्रू पोलक्याच्या कोपराने पुशीत आजीही आली. हातावर टेकीत आजोबांनी बाकड्यावर थपकल मारली. त्यांचा चेहरा थरथरत होता आणि आपले राखाडी ओठ ते चावीत होते. आजी त्यांच्या पुढ्यात गुडघे टेकून बसली.

"क्षमा करा हो तिला, देवाच्या दयेखातर क्षमा करा! चांगल्या चांगल्या भक्कम घसरगाड्याही मोडतात कधी कधी! मोठ्या माणसांच्या आणि व्यापाऱ्यांच्या घरांमध्येही अशा गोष्टी घडत नाहीत का? पण ती बाई कशी सोन्यासारखी आहे बघा! क्षमा करा तिला... तसं आपल्यातलं सर्वगुणसंपन्न कुणीच नसतं..."

आजोबा भिंतीला टेकून मागे बसले आणि तिच्या डोळ्यात पहात घूत्कारले :

"अर्थात! का नाही? तू प्रत्येकाला क्षमा करशील. कशालाही क्षमा करशील. छी:! थू: ऽ तुझी!"

मग ते तिच्या दिशेने झुकले व तिचा खांदा पकडून तिला गदगदा हलवीत त्यांनी विचारले.

"पण देवाचं काय?" जलद गतीने अस्पष्ट आवाजात ते बोलू लागले. "तो कशालाही क्षमा करत नाही, समजलीस? आता थडग्याच्या काठाशी येऊन पोचलो आपण—आणि एका पाठोपाठ एक शिक्षा भोगतोय! आयुष्यातले अखेरचे दिवस आपल्या, पण शांती नाही, आनंद नाही, कुणावर आशा ठेवायला जागा नाही! भिकारी म्हणून आपण मरणार—लक्षात ठेव माझे शब्द— अक्षरश: भिकारी!"

आजीने त्यांचे हात आपल्या हाती धरले, त्यांच्या शेजारी ती बसली आणि हळूच हसली.

"मग काय झालं? भिकारी व्हायची तुम्हाला एवढी भीती का वाटते? झालो भिकारी तर झालो! तुम्ही घरात बसा आणि मी वाडगा हाती धरून दारोदार फिरीन. कुणीही मला भीक नाकारणार नाही. आपण उपाशी राहणार नाही! या सगळ्या गोष्टींची चिंता करायचं सोडून द्या!"

एकदम त्यांनी फुर्रर्रदिशी नाक वर ओढले, बकऱ्यासारखी मान वळविली व आजीच्या गळ्याभोवती घट्ट मिठी मारली. त्यांची आकृती आक्रसून अगदी लहान आणि चुरगळून गेलेली दिसत होती. ते बडबडत होते :

"मूर्ख कुठली! माझी वेडी कुठली! माझं असं उरलेलं एकटं माणूस! एवढी भाबडी आहेस की स्वतःचं सारं घालवून बसशील! आपल्या पोरांसाठी आपण किती खपलो, किती पापं केली ते जरा आठव! आणि आता आयुष्याच्या अखेरी काहीही नाही, जवळ एक तुकडा नाही म्हणजे..."

आता मात्र सहन करणे माझ्या शक्तीपलिकडे गेले. माझ्या चेहऱ्यावरून अश्रूंच्या सरी ओघळत होत्या. चुलाण्यावरून मी खाली उडी घेतली व धावतच त्यांच्या कुशीत बिलगलो. माझी आई आली होती, आजोबा-आजी एकमेकांशी एवढ्या प्रेमाने बोलू लागली होती, त्यांच्या दुःखात त्यांनी मला सहभागी होऊ दिले होते, दोघेही मला मिठ्या मारीत होती– कुरवाळीत होती, आपल्या अश्रूंमध्ये न्हाऊ घालीत होती, या सर्व गोष्टींचा अत्यानंद झाल्यामुळे मी हुंदके देऊन रडत होतो.

"अरे लबाडा, तूसुद्धा इथंच आहेस होय," आजोबा माझ्या कानात कुजबुजले. "तुझी आई आता आलीय, तेव्हा तुझ्या ह्या दुष्ट म्हाताऱ्या आजोबाची तुला गरज भासणार नाही, होय ना? किंवा फक्त तुला लाडावून ठेवायचंच माहीत असलेली म्हातारी राक्षशीण तुझी आजीसुद्धा तुला आता नको असेल? छीः! थूः ऽ तुझी!"

त्यांनी हाताच्या झटक्याने आम्हाला बाजूला केले व ते उभे राहिले.

"प्रत्येकजण आम्हाला सोडून चाललाय–प्रत्येकजण लांब जायचा प्रयत्न करतोय–प्रत्येकजण स्वतःपुरतं पाहतोय... ठीक आहे, बोलाव तिला," रागाने ते म्हणाले. "लौकर!"

आजी स्वैपाकघरातून बाहेर गेली व आजोबा पुतळ्यांच्या कोनाड्यात जाऊन उभे राहिले.

"दयाघन देवा–बघ जरा–विचार कर!" छातीवर हात आपटीत मान खाली घालून ते पुटपुटले. मला ते आवडले नाही. एकूणच त्यांचे देवाशी ज्या आढ्यतेखोरपणे बोलणे चाले, ते मला आवडत नसे.

माझी आई आत आली व तिच्या लाल पोषाखाने खोलीतील वातावरण एकदम खुलले. आजोबा आणि आजी यांच्या मधोमध ती टेबलापासच्या

बाकड्यावर बसली. तिच्या पोषाखाच्या लांब बाह्यांनी त्यांचे खांदे झाकले गेले. ती त्यांच्याशी हळू आवाजात गंभीरपणे बोलत होती व ती दोघे मुकाट्याने चकार शब्द न बोलता ऐकत होती. ती दोघेही तिच्यापुढे एवढी लहान दिसत होती, की ती लहान मुले वाटत होती व माझी आई त्यांची आई भासत होती.

भावनातिरेकाने मी एवढा थकलो होतो की, फळीवरच मला गाढ झोप लागली.

त्या दिवशी संध्याकाळी दोन्ही म्हातारी माणसे सर्वांत उत्तम कपडे घालून चर्चमध्ये प्रार्थनेला गेली. खाशा सुटात आणि केसाळ कोटात चकचकीत दिसणाऱ्या आजोबांकडे पाहून आजीने गंमतीने डोळे मिचकावले.

"तुझा बाप बघ कसा तुकतुकीत दिसतोय," माझ्या आईला हळूच ढोसून आजी म्हणाली.

आई खळखळून हसली.

जेव्हा ती आणि मी असे दोघेच तिच्या खोलीत राहिलो तेव्हा एक पाय स्वत:च्या अंगाखाली मुडपून घेऊन ती कोचावर बसली व मला हाक मारून कोचावर थापट्या मारीत तिच्या शेजारी बसायची सूचना केली.

"ये रे इकडं, बैस. गोष्टी कशा आहेत? फारशा बऱ्या नाहीत?"

कशा होत्या गोष्टी? मला माहीत नव्हते.

"आजोबा तुला मारतात?"

"आता फारसं नाही."

"खरंच? बरं तुला हव्या त्या गोष्टी मला सांग."

माझ्या आजोबांविषयी बोलायची माझी इच्छा नव्हती, तेव्हा मी तिला सांगायला सुरुवात केली की, आम्ही आत्ता ज्या खोलीत होतो तेथे एक फार छान माणूस रहात होता, पण कुणालाही तो आवडत नव्हता आणि शेवटी आजोबांनी त्याला घालवून दिले. पण ही गोष्ट आईला फारशी आवडली नसल्याचे दिसले व ती म्हणाली:

"दुसरं काहीतरी सांग."

मी तिला तीन लहान मुलांबद्दल सांगितले आणि कर्नलनी मला त्यांच्या आवारामधून कसे हाकलून लावले ते सांगितले.

"किती वाईट माणूस!" मला मिठी मारीत ती म्हणाली.

मग ती गप्प झाली व डोळे किलकिले करून तक्तपोशी न्याहाळीत मान हलवू लागली.

"आजोबा तुझ्यावर एवढे रागावले का?" मी विचारले.

"माझीच चूक झालीय."

"तू त्यांना बाळाला दाखवायला आणायचंस..."

ती एकदम दचकली, तिने कपाळाला आठ्या घातल्या, ओठ चावला आणि एकदम खो खो हसत पुन्हा मला मिठी मारली.

"वेडा मुलगा! पुन्हा याबद्दल कधी एक शब्दही उच्चारू नको, समजलं? चकार शब्द नको. आणि त्याबद्दल विचारही करू नको!"

काही वेळपर्यंत ती जे काही बोलत होती ते बोलणे शांत, खंबीर आणि दुर्बोध होते. मग उठून ती खोलीमध्ये फेऱ्या मारू लागली, बोटांनी स्वतःच्या हनुवटीवर टिचक्या मारू लागली आणि आपल्या जाड भुवयांच्या हालचाली करू लागली.

टेबलावर एक मेणबत्ती पेटत होती, पाघळत होती व आरशात तिचे प्रतिबिंब पडले होते. तक्तपोशीवर तिच्या घाणेरड्या सावल्या पसरल्या होत्या, पुतळ्यांसमोर कोनाड्यात दिवा उजळला होता आणि हिमकण साचलेले खिडकीचे तावदान चांदण्यात रूपेरी दिसत होते. आई असे काही कटाक्ष टाकीत होती, जणू रिकाम्या भिंतींवर आणि आढ्यावर ती काहीतरी शोधत होती.

"तू केव्हा झोपतोस?"

"थोड्या उशीरा."

"बरोबर, आज दुपारी तू डुलकी काढलीयस," आठवणीसरशी उसासा टाकीत ती म्हणाली.

"तुला इथून जायचंय?" मी विचारले.

"कुठं?" आश्चर्याने तिने विचारले. मग तिने माझा चेहरा वर उचलून खूप वेळपर्यंत माझ्या डोळ्यांमध्ये इतके रोखून पाहिले की, मला अश्रू थोपविणे अशक्य ठरले.

"तू का रडतोस?"

"माझी मान दुखतेय."

पण माझे काळीज त्याहून जास्त दुखत होते. त्या घरात ती राहू शकत नव्हती, ती नक्की त्या घरामधून निघून जाणार होती, याची मला जाणीव झाली होती...

"पुढं तू तुझ्या वडलांसारखा दिसशील," पायाने गालीचा बाजूला उडवीत ती म्हणाली. "आजी कधी बोलली तुला त्यांच्याबद्दल?"

"होय."

"तिला मािक्सम खूप आवडायचा – खूप! आणि त्यालाही तिचा लळा होता..."

"मला ठाऊकाय!"

आईने मेणबत्तीकडे नजर टाकली व कपाळाला आठ्या घालून ती विझवून टाकली.

मेणबत्तीविना खोलीमध्ये जास्त ताजे आणि स्वच्छ वाटत होते. तक्त-पोशीवरील हिडीस सावल्यांची जागा आता निळसर चांदण्याच्या रूपेरी पट्ट्यांनी घेतली होती, तर खिडकीच्या तावदानावर सोनेरी प्रतिबिंबे चमकत होती.

"इथं येण्यापूर्वी तू कुठं रहात होतीस?"

जणू काही खूप पूर्वीच विसरून गेलेले काहीतरी आठवावे त्याप्रमाणे तिने अनेक गांवांची नांवे सांगितली. हा सारा वेळ ती बहिरीससाण्याप्रमाणे खोलीत गिरक्या घेत होती.

"असा पोषाख तुला कुठं मिळाला?"

"मी स्वतःच शिवला. सारं काही मी स्वतः करते."

इतर सर्वांपेक्षा ती वेगळी होती हे पाहून मला फार बरे वाटत होते, पण ती फार कमी बोलायची याचे मला वाईट वाटे. मी जर तिला प्रश्न विचारले नाही, तर ती काहीही बोलत नसे.

पुन्हा एकदा ती माझ्याशेजारी कोचावर बसली आणि एकमेकांना घट्ट धरून एकही शब्द न बोलता आम्ही तसेच बसून राहिलो. शेवटी मेणाचा आणि धूपाचा गंध पसरवीत आजोबा आणि आजी घरी परतले. ती दोघेही खूप गंभीर आणि प्रेमळ दिसत होती.

रात्रीचे जेवण अत्यंत गंभीर आणि उच्च पातळीवरील वातावरणात पार पडले. जणू काही कुणालातरी हलक्या झोपेतून उठविण्याची धास्ती वाटावी अशा पद्धतीने आम्ही अगदी सावधपणे आणि थोडेच बोललो.

लौकरच आईने माझ्या "अधार्मिक" शिक्षणाला जोरदार आरंभ केला. तिने काही पुस्तके माझ्यासाठी विकत आणली. त्यात एकाचे नांव

नाते "रशियन पाठमाला." त्या पुस्तकामधून मी काही दिवसांच्या अवधीतच अधार्मिक मुळाक्षरे शिकलो. पण कविता तोंडपाठ म्हणवून घेण्याचा आईने ताबडतोबीने चंग बांधला व तेथूनच परस्परांच्या छळणुकीला सुरुवात झाली.

मला पहिली कविता शिकावी लागली ती अशी :

वळणावळणाची वाट, अनंतापर्यंतची वाट,
मैदानपल्याडची वाट, वस्तीपल्याडची वाट,
कुदळ-फावड्यांनी घडली नाही ही वाट,
अगणित टापांनी तुडवून बनली आहे ही वाट.

पण कविता पाठ म्हणून दाखविताना मी नेहमी भलतेच शब्द उच्चारायचा. 'वळणावळणाची' म्हणण्याऐवजी 'बांधाबांधाची' म्हणायचा, 'फावड्यांनी' म्हणण्याऐवजी 'पात्यांनी' म्हणायचा.

"अरे अशी कशी शब्दांची गल्लत करतोस?" आई चिडून म्हणायची.

मला माझी चूक उमगायची, पण तरीही मी चुकीचे शब्द म्हणत रहायचा आणि तसे का घडते याचे माझे मलाच आश्चर्य वाटायचे.

आई जास्तच रागावू लागली. मी हट्टी आणि मूर्ख आहे असे म्हणू लागली. हा आरोप सहन करणे मला अपमानास्पद वाटत होते, म्हणून त्या दळभद्र्या ओळी अचूक आठवण्यासाठी मी जिवाचा खूप आटापिटा करू लागलो. पण मी मोठ्यांदा कविता म्हणू लागलो म्हणजे हमखास शब्दांची गल्लत व्हायची. त्या फसव्या ओळींचा मी द्वेष करू लागलो आणि केवळ यमक जुळवून वाट्टेल ते निरर्थक शब्द घुसडून मुद्दाम त्यांचा विपर्यास करायला सुरुवात केली. त्या जेवढ्या बाष्कळ बनतील तेवढा मला जास्त आनंद होऊ लागला.

पण ही करमणूक मला महागात पडली. एके दिवशी सबंध धडा चांगला शिकून झाल्यानंतर आईने मला कविता म्हणायला सांगितले व नकळत मी बरळू लागलो :

रस्त्यावर भरले बेडूक-खेडुक
ओरडू लागले डरॉव्-खरॉव्...

काय घडत होते त्याची जाणीव मला फार उशीरा झाली. टेबलावर हातांचा भार टेकवीत आई उठून उभी राहिली आणि प्रत्येक शब्द स्वतंत्रपणे स्वच्छ उच्चारून तिने विचारले:

"हे तू कुठं शिकलास?"

"मला ठाऊक नाही," विलक्षण चकित होऊन मी उत्तरलो.

"छे: छे:, तुला माहीत आहे. सांग बघू!"

"असंच!"

"काय असंच?"

"गंमत म्हणून."

"कोपऱ्यात उभा रहा."

"कशाला?"

"कोपऱ्यात जा!" धमकावणीच्या सुरात ती पुन्हा म्हणाली.

"कुठल्या कोपऱ्यात?"

उत्तर न देता तिने माझ्याकडे असा काही कटाक्ष टाकला की, मी काय करीत होतो किंवा मी काय करावे अशी तिची अपेक्षा होती, याबद्दलची जाणीवच मी हरवून बसलो. पुतळयांच्या कोनाडचात एका वाटोळ्या टेबलावर एका काचपात्रात सुगंधी सुकलेली फुले व वेगवेगळ्या प्रकारचे गवत होते. दुसऱ्या कोपऱ्यात गोधडीने झाकलेली एक ट्रंक होती. तिसऱ्या कोपऱ्यात पलंग पसरला होता व चौथ्या कोपऱ्यात दार होते.

"मी काय केलं पाहिजे ते मला समजत नाही," समजण्याचा आटोकाट प्रयत्न करीत मी तिला म्हणालो.

ती खुर्चीत धपकन बसली व मुकाटपणे स्वतःची भुवई व गाल चोळू लागली.

"आजोबांनी तुला कधी कोपऱ्यात उभं केलं नाही?"

"केव्हा?"

"कुठल्याही वेळी," संयम सुटून ती ओरडली व तिने टेबलावर दोनदा हात आपटला.

"नाही, मला तरी आठवत नाही."

"कोपऱ्यात उभं राहणं ही शिक्षा आहे हे तुला माहीत नाही काय?"

"नाही. त्याला शिक्षा का म्हणायचं?"

"अरे देवा!" उसासा टाकीत ती उद्‌गारली. "इकडं ये."

"तू माझ्यावर ओरडतेस का?" तिच्यापाशी जात मी विचारले.

"तू कवितेमध्ये भलत्याच ओळी का घुसडतोस?"

मी जास्तीत जास्त प्रामाणिकपणे तिला समजावून देण्याचा प्रयत्न केला [illegible], मी डोळे मिटले म्हणजे कविता मूळ जशी असते तशीच्या तशी मला आठवते, पण मी ती मोठ्यांदा म्हणू लागलो म्हणजे वेगळेच शब्द तोंडामधून बाहेर पडतात.

"ही गोष्ट तू रचून सांगत नाहीस?"

मी शपथपूर्वक सांगितले की, मी बनवून सांगत नव्हतो. पण ताबडतोब [illegible] मलाच माझ्या प्रामाणिकपणाविषयी शंका वाटू लागली. थोडा वेळ [illegible] अचानकपणे मी एकही चूक न करता कविता म्हटली. त्याचे माझे [illegible] आश्चर्य वाटले व मला गहिवरून आले.

माझा चेहरा शरमेने लाल झाल्याचे व कान गरम झाल्याचे मला [illegible]. माझ्या आईसमोर मी शरमिंदा होऊन उभा होतो. माझ्या अश्रूं-[illegible] तिचा चेहरा मला अपेक्षाभंगाने काळवंडलेला दिसला, तिने ओठ घट्ट [illegible], तिच्या भुवया खाली झुकल्या.

"याचा अर्थ काय?" विचित्र आवाजात तिने मला विचारले. "याचा [illegible] तू खरंच बनाव करतोस?"

"मला ठाऊक नाही. तसा माझा मुळीच इरादा नव्हता..."

"तुझ्याशी हुज्जत घालणं फार कठीण आहे," मान खाली घालून [illegible] म्हणाली. "जा इथून..."

ती मला जास्त जास्त कविता पाठांतराला देऊ लागली. पण माझ्या [illegible] त्या कवितांना सामावून घ्यायचे नाकारले. त्या अनुप्रासयुक्त ओळीं-[illegible] दुसरे शब्द घुसडून त्यांचा विपर्यास करण्याची दुष्ट इच्छा अनावर होत [illegible]. तसे करण्यात मला मुळीच सायास पडत नसत. नकोसे असणारे [illegible] झुंडींनी माझ्या मनात गर्दी करीत आणि योग्य शब्दांच्या ऐवजी [illegible] फिट्ट जागा बळकावून बसत. काहीवेळा तर मी प्रयत्न करूनसुद्धा [illegible] मनःचक्षूंसमोर आख्ख्या ओळीच्या ओळी येत नसत. राजपुत्र व्याझेम्स्की [illegible] एका शोकरसात्मक कवितेने मला विशेष ताप दिला.

सकाळपासून ते मध्यरातीच्या प्रहरात,
म्हातारी-कोतारी, अनाथ आणि विधवा
अन्नासाठी मागतात दारोदार जोगवा.

तिच्यातील तिसरी ओळ मी नेहमी विसरायचा:

पसरून हात केविलवाण्या स्वरात,

माझ्यापुढे निरुपाय होऊन आईने आजोबांना माझ्या कमकुवत स्मरणशक्तीविषयी सांगितले.

"बिघडलाय कारटा!" रागाने ते म्हणाले. "त्याच्या स्मरणशक्तीला काहीएक झालेलं नाही. माझ्यापेक्षा जास्त चांगल्या प्रार्थना येतात त्याला! अगदी दगडावरच्या रेषेसारखी घट्ट स्मरणशक्ती आहे त्याची—एकदा एखादी गोष्ट कोरली की कायमची! त्याला थोडा तिंबून काढ, म्हणजे येईल वठणीवर!"

आजीनेही त्यांच्या मताला दुजोरा दिला.

"त्याला परीकथा आणि गाणी तोंडपाठ येतात. आता गाणी म्हणजे कविताच असतात की!"

हे सारे खरे होते आणि मीच दोषी होतो असे मलाही वाटत होते. पण मी कविता शिकायला घेतली रे घेतली, की झुरळांच्या झुंडीप्रमाणे दुसरे शब्द रांगेने येऊन उभे रहात:

रात्रं-दिवस आमच्या दाराशी,
अनाथ-पांगळे येतात उपाशी,
भाकरीची भीक कोकलून मागतात,
पेत्रोव्नाच्या खोपटात धावत जातात,
भिकेची भाकर तिच्या गायींना विकतात,
त्या पैशाची दारू पिऊन गटारात लोळतात.

रात्री आजीपाशी पांघरुणात झोपल्यानंतर, पुस्तकांमध्ये छापलेले जेवढे मला आठवायचे आणि मी स्वतः रचलेले जेवढे असायचे, ते सारेच्या सारे मी तिला म्हणून दाखवायचा. काहीवेळा ती हसायची, पण बहुतेक वेळा ती मला रागवायची.

"मनात असलं तर काय काय करू शकतोस बघ! पण भिकाऱ्यांची थट्टा करणं चांगलं नव्हे. येशू ख्रिस्त भिकारी होता, तसंच सगळे संत भिकारी होते.

मी उत्तरादाखल पुटपुटलो:

भिकारी मला नाही आवडत,
आजोबासुद्धा नाही आवडत,
देवा रे देवा करू तरी काय?
नशीबाचा फेरा हुकवायला
आजोबांचा सोटा चुकवायला?

"कारट्या, तुझी जीभ मुळापासून झडून जावो!" आजी उद्गारली. "तुझ्या आजोबांनी हे ऐकलं तर काय होईल?"

"खुशाल ऐकू देत!"

"तुझ्या गरीब बिचाऱ्या आईला तुझा आणखी कशाला घोर लावतोस? आधीच तिचं तिला झालंय थोडं आणि त्यात तू कशाला भर घालतोस?" आजीने मला प्रेमाने समजावण्याचा प्रयत्न केला.

"का तिचं तिला झालंय थोडं?"

"जीभ आवर! अशा गोष्टी तुला समजून घ्यायचं कारण नाही!"

"मला ठाऊक आहे, आजोबा..."

"जीभ आवर म्हणून सांगते ना!"

माझी कडेलोटाची निराशा झाली होती, पण काही कारणास्तव मी सत्य लपवून ठेवू पहात होतो. म्हणून मी धीट आणि बंडखोर बनलो होतो. आईचे धडे वाढले होते आणि जास्त अवघड बनले होते. अंकगणित मला कठीण जात नव्हते, पण व्याकरणाचा मात्र ओ किंवा ठो समजत नव्हता आणि विशेषतः लिहिणे मला आवडत नव्हते. माझ्या आजोबांच्या घरात राहिल्यामुळे माझी आई केविलवाणी बनली होती, या जाणीवेने मी सर्वांत जास्त खचून गेलो होतो. उलटणाऱ्या दर दिवसागणिक ती जास्त जास्त दुःखी बनत होती, प्रत्येकाकडे तिऱ्हाईताच्या नजरेने पहात होती, तासनतास खिडकीशी बसून बागेकडे एकटक पहात होती. जणू ती विरून जात होती असे भासत होते. आल्यानंतरचे पहिले काही दिवस ती चपळपणे वावरत

होती, तिच्यामध्ये उत्साह भरलेला होता. पण आता तिच्या डोळयांखाली काळी वर्तुळे उमटली होती, स्वतःच्या दिसण्याकडे ती दुर्लक्ष करीत होती, सबंध दिवसभर एकच चुरगळलेला पोलका घालून वावरत होती, केसांना वेणी-फणी करीत नव्हती. तिला तशा अनाकर्षक अवतारात पाहताना मला त्रास होत होता. तिने नेहमी व्यवस्थित, स्वच्छ आणि सुंदर रहावे, सर्व जगात ती सर्वांत सुंदर ठरावी, असे मला वाटायचे.

धडे शिकविताना ती माझ्या पलिकडे भिंतीवर वा खिडकीपलिकडे शून्यात एकटक नजर लावून शुष्क आवाजात प्रश्न विचारीत असे व माझी उत्तरे ऐकायची विसरून जात असे. ती फार चिडचिडी बनली होती आणि सारखी माझ्यावर वसावसा ओरडायची. त्यामुळेही माझ्या भावना दुखावत होत्या. इतर माणसांपेक्षा आई ही वेगळी असावी, परीकथांमधील आई असतात तशी असावी, असे मला वाटायचे.

एक दिवस मी तिला विचारले:

"तुला आमच्याबरोबर रहायला आवडत नाही का?"

"तुझं तू काम कर!" तिखट सुरात ती उत्तरली.

माझ्या हेही लक्षात आले होते की, आजोबा काहीतरी करण्याच्या पूर्वतयारीत होते व त्या गोष्टीला आजी आणि आई घाबरत होत्या. अनेकदा आजोबा माझ्या आईला तिच्या खोलीत बंद करून बसत आणि मेंढपाळ निकानोरच्या भयानक लाकडी शिट्टीसारख्या कर्कश्य आवाजात ओरडत रहात. अशाच एका प्रसंगी माझी आई एवढ्या मोठ्यांदा ओरडली की सबंध घरभर तिचे शब्द ऐकू गेले:

"ते कधीही होणार नाही, कधीही!"

तिने धाडकन दरवाजा आपटला आणि आजोबांनी प्रचंड कांगावा केला. ती संध्याकाळची वेळ होती. आजी स्वैपाकघरात बसून आजोबांचा सदरा शिवीत होती आणि शिवता शिवता स्वतःशीच काहीतरी पुटपुटत होती. दरवाजा आपटल्याचा आवाज ऐकून ती उद्गारली:

"अरे देवा, ती भाडेकरूंकडं गेली!"

अचानक आजोबा वेगाने स्वैपाकघरात आले, आजीच्या डोक्यावर त्यांनी ताडकन हाताने मारले आणि स्वतःचा झणझणणारा हात झटकत ते फूत्कारले:

"थेरडचा चेटकिणी, स्वत:ची जीभ बांधून ठेवायला तू कधी शिकणार?"

"तुम्ही मूर्ख' आहात," शांतपणे केस नीट करीत आजी उत्तरली. "माझी जीभ मी आवरून धरीन असं वाटलं कसं तुम्हाला? तुमच्या सगळ्या कारवाया मी तिला नेहमीच सांगणार याची पक्की खात्री बाळगा.. "

आजोबा तिच्यावर तुटून पडले आणि तिच्या डोक्यावर तडातडा मारू लागले. आजीने कोणताही प्रतिकार केला नाही. पण ती सतत म्हणत राहिली :

"मार मूर्खा मार! आणखी जोरानं मार!"

ज्या फळीवर मी बसलो होतो तिथून उशा, पांघरूणे, जोडे वगैरे वस्तू मी आजोबांच्या अंगावर मारू लागलो. पण रागाच्या भरात आजोबांचे माझ्याकडे लक्ष नव्हते. आजी खाली पडली. आजोबांनी तिच्या डोक्याला लाथा मारल्या. शेवटी अडखळून ते स्वत:च पडले आणि त्यांच्या बरोबर पाण्याची बादलीही उपडी झाली. थुंकत आणि तोंडातल्या तोंडात बोलत उडी मारून ते उठले. एक रागीट दृष्टीक्षेप टाकून ते स्वैपाकघरातून बाहेर पळाले आणि पोटमाळ्यावरील स्वत:च्या खोलीकडे गेले. कण्हत कुंथत आजी उठून बाकड्यावर बसली आणि केसांचा गुंता सोडवू लागली. चुलाण्यावरील फळीवरून मी खाली उडी मारली.

"त्या उशा आणि बाकीच्या वस्तू गोळा करून पुन्हा जागच्या जागी ठेव," ती रागाने म्हणाली. "मोठा शहाणा लागून गेला उशा फेकायला! भलत्या गोष्टीत नाक खुपसत जाऊ नकोस! तो म्हाताराही तसाच चक्रम झालाय!"

अचानक तिने बारीकशी किंकाळी फोडली व मला स्वत:पाशी बोलाविले.

"इथं पहा जरा," डोके खाली करीत ती म्हणाली. "तिथं काहीतरी टोचतंय!"

तिचे जाड केस मी बाजूला केले तेव्हा केसातील आकडा तिच्या डोक्यात रुतलेला मला आढळला. मी तो आकडा उपसून काढला तेव्हा आणखी एक रुतलेला दिसला. माझ्या अंगाला कापरे सुटले.

"मी आईला बोलावतो," मी म्हणालो. "मला भीती वाटते."

"काय म्हणालास—'मी आईला बोलावतो!'" हातवारे करीत आजी ओरडली. "देवाची कृपा म्हणून तिनं हे काही पाहिलं नाही आणि ऐकलं

नाही! आणि तू तिला बोलवायला निघालायस? चालता हो इथून!"

कुशल विणकराच्या चपळ बोटांनी ती स्वतःच आपल्या दाट काळ्या केसांमधून डोक्यात घुसलेले आकडे चाचपू लागली. सारे धैर्य एकवटून मी आणखी दोन आकडे उपसून काढण्यात तिला मदत केली.

"दुखतं?"

"विशेष नाही. उद्या न्हाणीघरात पाणी तापवून सगळ्या जखमा धुवून काढीन. पण छबड्या, तुझ्या आजोबांनी मला मारलं ते तुझ्या आईला मात्र सांगू नकोस हं!" मला गोंजारीत ती म्हणाली. "आधीच ती दोघं एकमेकांवर संतापलेली आहेत. नाही ना सांगणार?"

"नाही."

"विसरू नकोस! आता इथला गोंधळ आवरू या. माझ्या चेहऱ्यावर काही खूण राहिलीय? नाही ना? छान. तर मग सारं कसं छान छान आहे."

ती फरशी पुसू लागली आणि मी अंतरीच्या उमाळ्याने म्हणालो:

"तू एखाद्या संतासारखी आहेस – ते तुला मारतात, तुझा छळ करतात, पण तू त्याकडं लक्षच देत नाहीस!"

"काय वेडपटासारखं बरळतो आहेस! म्हणे संत! चांगली जागा शोधलीस संतासाठी!"

हातापायांवर ओणवी होऊन ती सफाई करीत होती तेव्हा अखंड बडबडत होती. तर आजोबांना त्यांच्या दुष्टपणाबद्दल कशी अद्दल घडवावी याचा विचार करीत मी उंबऱ्यावर बसून होतो.

माझ्या उपस्थितीत पहिल्यांदाच ते आजीशी असे पाशवीपणाने वागलेले मी पाहिले होते. त्या संधिप्रकाशात त्यांचा तांबूस केस विस्कटलेला लालबुंद चेहरा माझ्या नजरेसमोर नाचत असल्याचा मला भास होत होता. तिरस्काराच्या भावनेने माझे अंतःकरण जळत होते आणि योग्य असा सूड उगविण्याची तऱ्हा मला सुचत नव्हती याचा मनाला त्रास होत होता.

त्यानंतर दोन दिवसांनी मी त्यांच्या पोटमाळ्यावरील खोलीत गेलो तेव्हा खाली बसून ते उघड्या ड्रॉवरमधील काही कागदपत्र चाळीत होते. त्यांच्या जवळच्या खुर्चीवर त्यांचे आवडते संतांच्या तसबिरींचे कॅलेंडर पडले होते. राखी रंगाच्या बारा जाडजूड कागदांवर चौकोनांमध्ये महिन्यांच्या

तारखा व संतांची चित्रे छापलेली होती. आजोबा ह्या कॅलेंडरला फार जपत आणि कधीतरी ते माझ्यावर खूप खूष असले म्हणजे हे कॅलेंडर पहायला मला परवानगी देत. त्या आकर्षक छोटया तसबिरींकडे मी नेहमी विशिष्ट उत्कट भावनेने पहात असे. त्यांच्यापैकी काही संतांचे जीवन मला ठाऊक होते: किरिक आणि उलीता, हुतात्मा वार्वारा, पान्तेलेईमोन आणि इतर अनेक. देवमाणूस अलेक्सेई याच्या दु:खी जीवनकहाणीने मी फारच गलबलून गेलो होतो. त्याच्याबद्दलची सुंदर कवने आजी अनेकदा मला उत्कटपणे म्हणून दाखवीत असे. ह्या शेकडो संतांकडे पाहिल्यानंतर मनामध्ये एक मूक सांत्वनाची भावना यायची की, जगात नेहमीच हुतात्मे निर्माण होत आले आहेत.

पण आत्ता मात्र हे कॅलेंडर फाडायचा मी निश्चय केला व गरुडांचा शिक्का असलेला कसलातरी निळसर कागद वाचायला आजोबा ज्या क्षणी खिडकीपाशी गेले त्याच क्षणी मी कॅलेंडरची अनेक पाने खेचून घेतली, पळत पळत खाली गेलो, आजीच्या टेबलामधून कात्री घेतली, चुलाण्यावरच्या फळीवर चढून बसलो व संतांची डोकी कापायला सुरुवात केली. एक ओळीमधील मुंडकी कापल्यानंतर माझे अंत:करण करुणेने द्रवले व नंतर मी फक्त चौकोनच कापायला सुरुवात केली. पुढची ओळ कापून व्हायच्या आतच दाराशी आजोबा येऊन ठाकले.

"कॅलेंडर घ्यायची परवानगी तुला कुणी दिली?" त्यांनी विचारले.

फळीवर विखुरलेल्या बारिक चौकोनांकडे त्यांचे अचानक लक्ष गेले. त्यांनी झटकन ते हातात घेतले, त्यांच्याकडे निरखून पाहिले, मग ते टाकून दुसरे चौकोन उचलले आणि काय घडले होते त्याची जाणीव होताच त्यांचा जबडा खाडकन मिटला, त्यांचे सर्वांग थरथर कापू लागले व त्यांचा श्वासोच्छ्श्वास एवढ्या जोराने होऊ लागला की, कागद इकडेतिकडे उड लागले.

"काय केलंस तू हे?" सरतेशेवटी ते ओरडले व माझ्या पायाला धरून त्यांनी मला चुलाण्यावरून खाली खेचले. मी हवेतच कोलांटी उडी घेतली, पण आजीने मला झेलले.

"तुला मी ठार मारीन!" मला आणि आजीला असे दोघांनाही मारीत आजोबा किंचाळले.

अचानक माझी आई खोलीत आली व मला तिने झटकन खेचून एका कोपऱ्यात नेले.

"थांबवा हा आचरटपणा!" आजोबांचे गुद्दे स्वतःच्या हातांवर झेलीत ती ओरडली. "जरा शुद्धीवर या!"

"माझा निकाल लागला," खिडकीजवळच्या बाकड्यावर फतकल मारीत आजोबा विव्हळले. "तुम्ही सगळे माझ्या विरुद्ध आहात – सगळे!"

"असा तमाशा करण्याची तुमची तुम्हाला शरम वाटली पाहिजे!" आई खालच्या आवाजात बोलली.

आजोबा ओरडले आणि त्यांनी बाकड्याला लाथ मारली. त्यांचे डोळे घट्ट मिटलेले होते व दाढीचे टोक विचित्रपणे छताच्या दिशेने वर झाले होते. माझ्या आईच्या समोर तसा तमाशा करण्याची त्यांना खरोखरीच शरम वाटत असावी म्हणून त्यांनी डोळे गच्च मिटून घेतले होते, असे मला वाटले.

"मी हे सगळे तुकडे एका कापडावर चिकटवीन, म्हणजे कॅलेंडर पूर्वी-पेक्षा चांगलं आणि भक्कम होईल," कागद सरळ करीत आई म्हणाली. "बघा, ह्या कागदांना किती घड्या पडल्यात आणि ते किती जुने झालेत!"

मला धडे शिकवीत असताना जेव्हा माझ्या काही ध्यानात येत नसे तेव्हा ती ज्या सुरात बोलायची, त्याच सुरामध्ये आत्ता ती आजोबांशी बोलत होती. अचानक आजोबा उठून उभे राहिले, मोठ्या रुबाबात त्यांनी सदरा व पँट ठीक केली व खाकरून घसा साफ करीत ते म्हणाले:

"आजच त्यांना चिकटव. बाकीचे कागद मी तुला आणून देतो."

दारापर्यंत जाऊन उंबऱ्याशी ते मागे वळून आपले वाकडे बोट माझ्या दिशेने नाचवीत म्हणाले:

"त्याला चांगला तिंबून काढला पाहिजे!"

"होय, त्याला मार दिला पाहिजे," आई त्यांच्याशी सहमत होत म्हणाली. "का तू असं वागलास?" खाली वाकून तिने मला विचारले.

"मी मुद्दामच केलं. पुन्हा जर कधी त्यांनी आजीला मारलं तर मी त्यांची दाढीच कापून टाकीन!"

आजी आपला फाटलेला पोलका अंगातून काढण्याच्या उद्योगात गुंतली होती. ती मान हलवून संतापाने म्हणाली:

"कारट्या, तू वचन दिल्याप्रमाणं जीभ आवरून गप्प का बसला

नाहीस? तुझी जीभ एवढी सुजली पाहिजे की, पुन्हा कधी म्हणून वळवळायची नाही!"

आईने तिच्याकडे कटाक्ष टाकला व नंतर तिने मला विचारले:

"केव्हा मारलं त्यांनी तिला?"

"अगं वार्वारा, जरा स्वतःची लाज बाळग. असल्या गोष्टी त्याला काय विचारतेस? तुझा काही संबंध नाही त्यात!" आजी म्हणाली.

"आई, आई ग, तू किती किती सोसणार!" माझ्या आईने कळवळून स्वतःच्या आईला मिठी घातली.

"हं... मोठीच चांगली आई लागून गेले मी तुझी! चल, सोड मला..."

एकमेकींकडे क्षणभर त्यांनी मूकपणे पाहिले. आणि मग त्या अलग झाल्या. आजोबा व्हरांड्यात गेल्याची चाहूल लागली.

आई ज्या दिवशी घरी आली होती तेव्हापासून तिची लष्करी अंमलदाराच्या आनंदी बायकोशी गट्टी जमली होती व जवळ जवळ दररोज संध्याकाळी ती त्यांच्या घरी जाऊन बसत असे. तेथे तिची बेंतलेंग यांच्या घरामधील सुंदर मुलांशी व शूर अधिकाऱ्यांशी भेट व्हायची. आजोबांना हे आवडत नसे आणि बहुतेकदा रात्रीच्या जेवणावेळी ते हातातील चमचा त्यांच्या दिशेला नाचवीत कुरकुरायचे:

"पुन्हा धुडगूस घालताहेत! आग लागो साल्यांना! आता रात्रभर झोपेचं खोबरं!"

लौकरच त्यांनी भाडेकरूंना जागा सोडण्यास सांगितले आणि ते निघून गेल्यानंतर दोन गाड्या भरून कुठूनतरी फर्निचर घेऊन आले, रिकाम्या गाळ्यात ते फर्निचर त्यांनी लावले आणि दाराला कुलूप ठोकले.

"काही नकोत भाडेकरू यापुढं... आता मीच माझ्या पाहुण्यांना इथं अधूनमधून बोलवायचं ठरवलंय," ते म्हणाले.

रविवारी पाहुणे यायला सुरुवात झाली. त्यांच्यामध्ये आजीची बहीण मात्र्योना इवानोव्ना ही गडबड्या स्वभावाची धोबीण होती. पट्ट्यापट्ट्याचा रेशमी पोषाख तिने घातला होता व सोनेरी रुमाल डोक्याला गुंडाळला होता, तिच्याबरोबर तिचे दोन मुलगे आले होते: लांब केसांचा आणि राखी सुटातील ड्राफ्टसमन वासीली हा गंमत्या स्वभावाचा आनंदी माणूस होता; विक्तरचे घोड्यासारखे डोके होते व त्याच्या निमुळत्या चेहऱ्यावर खूप

ठिपके होते. दारात तो आपले रबरी बूट काढीत असतानाच त्याचा पेत्रूष्का-सारखा गेंगाणा आवाज मी ऐकला:

"अन्द्रेई-पापा, अन्द्रेई-पापा..."

मला त्याचे आश्चर्य वाटले आणि भीतीही वाटली.

याकोवमामा आपले गिटार घेऊन आला. त्याने आपल्याबरोबर शांत स्वभावाचा, टक्कलवाला, एकडोळ्या घड्याळजी आणला होता. त्या घड्याळजीने लांब काळा कोट अंगात चढविल्यामुळे तो एखाद्या जोग्याप्रमाणे दिसत होता. एका बाजूला कलते डोके ठेवून व एका बोटाने आपल्या तुळतुळीत, घोटीव, दुभंगलेल्या हनुवटीला आधार देऊन तो नेहमी एका कोपऱ्यात हसऱ्या मुद्रेने बसून राही. त्याचा वर्ण काळसर होता आणि आपल्या एका डोळ्याने तो प्रत्येकाकडे विशेष कुतूहलाने पहात राही. तो कमी बोलायचा आणि सतत एकच वाक्य बोलायचा:

"उगीच तसदी करून घेऊ नका—तसं सारं सारखंच..."

मी त्याला पहिल्यांदा पाहिले तेव्हा अचानक मला फार पूर्वीचा काळ आठवला (त्यावेळी आम्ही नोवाया रस्त्यावर रहात होतो); तेव्हा रस्त्यावर अशुभसूचक नगाऱ्यांचा आवाज मी ऐकला होता व सैनिकांनी आणि लोकांनी वेढलेली एक उंच काळी गाडी तुरुंगाकडून गांवाच्या चौकाकडे जाताना पाहिली होती. त्या गाडीतील बाकड्यावर डोक्यावर गोल टोपी घातलेला व हातकड्या बांधलेला एक माणूस बसला होता. त्याच्या शरीराच्या हेलकाव्यांबरोबर साखळ्यांचा खळखळ आवाज होत होता. त्याच्या गळ्या-भोवती एक काळा बोर्ड अडकवलेला होता व त्यावर मोठ्या पांढऱ्या अक्षरां-मध्ये काहीतरी लिहिलेले होते. त्या माणसाचे डोके खाली झुकलेले होते—जणू तो ती अक्षरे वाचीत होता...

"हा माझा मुलगा," माझ्या आईने माझी घड्याळजीशी ओळख करून दिली. पण मी हात मागे धरून घाबरून मागे सरकलो.

"उगीच तसदी करून घेऊ नका," उजव्या कानापर्यंत भयानक रीतीने जबडा ताणीत तो म्हणाला. माझ्या कमरेच्या पट्ट्याला धरून त्याने मला स्वत:कडे खेचले व मोठ्या सफाईने गर्रकन मला गोल फिरविले.

"मोठा झकास दणदणीत पोरगा आहे," पसंती व्यक्त करीत त्याने मला मोकळे सोडले.

मी कातडी आरामखुर्चीत बसलो. मला झोपता येईल एवढी ती मोठी होती. ही खुर्ची प्रिन्स ग्रूझीन्स्कीची होती अशी आजोबा नेहमी बढाई मारीत. सारी माणसे विनोदी बनण्यासाठी किती सायास करीत होती आणि तो याकोवमामा किती चमत्कारिकपणे व संशयास्पदपणे आपल्या चेहऱ्यावरील भाव बदलीत होता, याचे मी त्या कोपऱ्यात बसून निरीक्षण करीत होतो. त्याचा चेहरा रोड आणि तेलकट होता व त्यावरून घामाच्या धारा वहात होत्या. जेव्हा तो हसायचा तेव्हा त्याचे जाड ओठ डावीकडे मुडपायचे व छोटेसे नाक उकडलेल्या कणकेच्या गोळ्यासारखे हलायचे. त्याचे मोठे फताडे कानही हालचाल करायचे. कधी त्याच्या एका डोळ्यावरच्या भुवईची कमान होताच ते वर जायचे, तर कधी गालफडांवर खाली घसरायचे. मला असे वाटायचे की, जर त्याने प्रयत्न केला तर तो आपल्या नाकावर हात ठेवल्याप्रमाणे त्या कानांची घडी घालू शकेल. मधूनमधून तो उसासा टाकून आपली बत्त्यासारखी गोल छोटीशी काळसर जीभ तोंडाबाहेर काढायचा आणि आपल्या जाड, मेणचट ओटांवरून ती गोलाकार फिरवायचा. या गोष्टींची गंमत वाटण्यापेक्षा मला आश्चर्य जास्त वाटले व त्याच्यावरून नजर बाजूला काढणे मला शक्य होईना.

पाहुणेमंडळी रमबरोबर चहा पीत होती. त्याचा जळक्या कांद्यांप्रमाणे वास येत होता. तसेच आजीने बनविलेल्या सोनेरी, हिरव्या किंवा डांबरासारख्या काळ्याकुट्ट मद्यार्कांचीही चव चाखली जात होती. मुरवलेले वेगवेगळे पदार्थ आणि पॉपीच्या बिया घातलेले मधाळ केक पाहुणे खात होते. सारेजण पोटभर भरले होते, त्यांना घाम फुटला होता आणि माझ्या आजीचे ते कौतुक करीत होते. खाऊन-पिऊन झाल्यानंतर तांबड्याबुंद चेहऱ्यांनी मंडळी विसावली आणि याकोवमामाला गिटार वाजविण्याचा त्यांनी उगीचच आग्रह केला.

गिटारवर वाकून त्याने तारा छेडल्या व भसाड्या आवाजात तो गाऊ लागला :

काढले दिवस आम्ही कसेबसे,
गोंधळ खूप त्यात भले नसे.
कझानची बाईल आली रे ऽ
नव्या मर्दाला धुंडायला ऽऽ ...

मला हे गाणे अगदीच करुण वाटले. आजी याकोवमामाला म्हणाली:

"याकोव, काहीतरी चांगलं गाणं म्हण बाबा! मोत्र्या, त्यावेळची गाणी तुला आठवतात का ग?"

"आजकाल गाणी म्हणायची नवी तऱ्हा आलीय ना बाई," आपल्या पोषाखाची अक्कडबाज सळसळ करीत धोबीण म्हणाली.

माझी आजी जणू कुठेतरी दूर होती अशा थाटात माझ्या मामाने तिच्याकडे अर्धमिटल्या डोळ्यांनी पाहिले व तेच दु:खी सूर छेडीत ते घाणेरडे शब्द तो गात राहिला.

आजोबांचे घड्याळजीबरोबर काहीतरी हितगुज चालले होते. आपल्या बोटांनी ते त्याला काहीतरी दाखवीत होते. घड्याळजीने भुवई उंचावून माझ्या आईच्या दिशेने कटाक्ष टाकला, मान डोलावली व त्याच्या ओलसर चेहऱ्यावर एक सूक्ष्म बदल पसरला.

आई नेहमीप्रमाणे सेर्गेयेव कुटुंबापाशी बसली होती व वासीलीबरोबर शांत, गंभीर आवाजात बोलत होती.

"अस्सं! विचार केला पाहिजे त्याबाबतीत," वासीली उसासा टाकून म्हणाला.

विक्तरने एक तुस्त स्मित केले, आपल्या पायांची चाळवाचाळव केली आणि किनऱ्या आवाजात एकदम गाणे म्हणायला आरंभ केला:

"अन्द्रेई-पापा, अन्द्रेई-पापा..."

सारेजण बोलायचे थांबले व त्यांनी विक्तरकडे कटाक्ष टाकले.

"थेट्रात शिकलाय तो हे गाणं," त्याच्या आईने मोठ्या अभिमानाने खुलासा केला. "थेट्रात ते हे गाणं म्हणतात."

अशा प्रकारच्या दोन-तीन सायंकाळी साजऱ्या झाल्या. कमालीच्या कंटाळवाणेपणापायी त्या लक्षात राहिल्या. मग एका रविवारी दुपारच्या वेळीच घड्याळजी आमच्या घरी आला. मी माझ्या आईच्या खोलीत बसलो होतो आणि जुनी मण्यांची वेलबुट्टी उलगडायला तिला मदत करीत होतो. अचानक धाडकन दार उघडले आणि आजीचा घाबराघुबरा चेहरा एकच वाक्य पुटपुटून पुन्हा नाहीसा झाला:

"वार्या, तो आलाय!"

माझी आई दचकली नाही किंवा तिच्या चेहऱ्यावरचा एकही स्नायू

हलला नाही. एक मिनिटभरानंतर दार पुन्हा उघडले गेले आणि आजोबा गंभीरपणे म्हणाले :

"वार्वारा, पोषाख करून बरोबर चल!"

"कुठं?" त्यांच्याकडे न पाहता आणि जागचे न उठता आईने विचारले.

"चल म्हणतो ना! देव तुझं भलं करो! उगीच वाद घालू नकोस. तो चंचल माणूस नाही, आपल्या कामात तरबेज आहे आणि बाप म्हणून अलेक्सेईचा चांगला सांभाळ करील..."

आजोबा नेहमीपेक्षा वेगळ्या तऱ्हेने बोलत होते आणि आपल्या हातांनी आपल्या मांड्यांवर थापट्या मारीत होते. पण जणू काही त्यांना आपले बाहू सरळ करायची इच्छा असावी व ते त्यांना मागे खेचून धरत होते अशा रीतीने त्यांचे कोपरे थरथरत होते.

"ते कधीही घडणार नाही हे मी तुम्हाला आधीच सांगितलंय," माझी आई शांतपणे म्हणाली.

एखाद्या आंधळ्या माणसाप्रमाणे हात पुढे धरून चाचपडत आजोबा तिच्यापाशी आले.

"मुकाट्यानं चल, नाहीतर झिंज्या पकडून खेचत नेईन!" घोगऱ्या आवाजात ते ओरडले. त्यांचे सर्वांग थरथरत होते.

"तुम्ही मला खेचून नेणार?" उठत आई म्हणाली. तिचा चेहरा पांढराफटक पडला होता, तिच्या आकुंचित डोळ्यांमध्ये धमकी उमटली होती. भराभरा तिने आपल्या अंगातील पोलका व घागरा फेडून टाकायला आरंभ केला. जेव्हा तिच्या अंगावर फक्त आतील वस्त्रे राहिली तेव्हा ती आजोबांना म्हणाली :

"ठीक आहे. न्या मला खेचत!"

त्यांनी दातओठ खात तिला मुठींनी धमकावले.

"वार्वारा, कपडे घाल अंगावर!"

आईने त्यांना बाजूला ढकलले आणि ती दाराशी गेली.

"चला, येताय ना?" ती ओरडली.

"मी तुला हाकलून देईन!" आजोबा फूत्कारले.

"मी त्याला भीत नाही! तर मग?"

तिने दार उघडले, पण आजोबांनी तिच्या परकराची किनार धरली व ते गुडघ्यांवर खाली बसले.

"वार्वारा, चांडाळणी, अशानं तुझी अगदी वाईट अखेर होईल! मला लाज आणू नको. अग ए! ऐकलंस का!" ते विव्हळले. "आ... ई आ... ई... ऽऽ!"

एव्हाना आजीने आईची वाट रोखली होती व कोंबडीच्या पिल्लाला शूः शूः करून पळवावे तसे ती तिला आत ढकलीत होती.

"वार्का, मूर्खे! आत हो निर्लज्ज सटवे!" ती पुटपुटली.

एकदा आईला खोलीत आणल्यानंतर तिने दाराला कडी घातली व नंतर ती आजोबांकडे वळली. एका हाताने तिने त्यांना फरशीपासून वर उचलले आणि दुसऱ्या हाताने दरडावून म्हटले:

"अरे मूर्ख म्हाताऱ्या ऽऽ काडीची अक्कल नाही तुला!"

एखादी चिंधीची बाहुली ठेवावी त्याप्रमाणे तिने आजोबांना कोचावर बसविले. त्यांची मान लडबडत होती व तोंड उघडे पडले होते.

"अग ए, अंगात कपडे घाल!" माझ्या आईवर आजी ओरडली.

"मी त्याच्याकडं जाणार नाही, ऐकलंत?" आई आपले कपडे उचलीत म्हणाली.

आजीने मला कोचावरून ढकलीत म्हटले:

"भांडभर पाणी आण लौकर! पळ!"

ती अगदी अस्पष्ट आवाजात बोलत होती. पण अत्यंत शांतपणे आणि अधिकारवाणीने बोलत होती. मी व्हरांड्यात धावलो. बाहेरच्या खोलीत कुणीतरी सावकाशपणे फेऱ्या मारीत असल्याची चाहूल ऐकू येत होती.

"उद्या मी जाईन इथून!" माझ्या आईचा आवाज मी ऐकला.

स्वैपाकघरात जाऊन मी स्वप्नात असल्याप्रमाणे खिडकीशी बसलो. आजोबा धुसफुसत होते आणि कण्हत होते, आजी खालच्या दबल्या आवाजात बोलत होती, मग धाडकन दाराचा आवाज झाला व सारे काही शांत झाले. ती शांतता फार भयाण होती. मला कशासाठी पाठविले होते याची अचानक मला आठवण झाली व भांडेभर पाणी घेऊन मी व्हरांड्याकडे निघालो. घराच्या पुढच्या भागात घड्याळजी खालच्या मानेने, केसाळ टोपी झटकीत व घोगरे आवाज काढीत बाहेर पडताना दिसला. त्याच्या

पाठोपाठ माझी आजी आपल्या पोटावर हाताची घडी घालून आली व झुकून शांतपणे म्हणाली :

"तुम्ही स्वतःच समजू शकता – एखाद्या माणसाला तुमच्याकडं बळजबरीनं पाठवण्यात काय अर्थ आहे?"

तो धडपडत अडखळत दारामधून बाहेर अंगणात गेला. आजीने क्रूसाचे चिन्ह केले व ती दारातच थरथर कापत उभी राहिली. तिचे अंग हसण्यामुळे का रडण्यामुळे कापत होते ते मला समजले नाही.

"काय झालं?" मी तिच्यापाशी धावत जात विचारले.

माझ्या हातातील पाण्याचे भांडे तिने हिसकावून घेतले. पाणी हिंदकळून माझे पाय ओले झाले. ती माझ्यावर ओरडली :

"पाणी आणायला किती लांब गेला होतास? बंद कर ते दार!"

ती आईच्या खोलीत परत गेली व मी स्वैपाकघरात परतलो. तेथे मला पलिकडील खोलीतील कण्हण्याचे, उसाशांचे, पुटपुटण्याचे आवाज ऐकू येत होते. जणू आपल्या ताकदीपलिकडचे ओझे ती माणसे दुसरीकडे ढकलीत होती, असा भास होत होता.

त्या दिवशी हवा सुरेख होती. हिवाळी सूर्याची लांब किरणे दोन खिडक्यांच्या थिजलेल्या तावदानांमधून आत पडली होती. जेवणासाठी टेबलावर जय्यत तयारी मांडून ठेवलेली होती. जस्ताच्या बशा चकाकत होत्या, तसेच सोनेरी रंगाचे क्वास व आजोबांसाठी वोदका भरलेली काचपात्रे मांडलेली होती. आंबवलेले धान्य व वासाला पिवळी फुले मिसळल्यामुळे वोदकाला हिरवा रंग चढला होता. खिडकीच्या तावदानावरील थिजलेल्या वर्तुळामधून पलिकडच्या घरांवरील छपरांवरच्या चमकत्या बर्फाचे व कुंपणाच्या खांबांच्या रूपेरी शेंड्यांचे आणि पक्ष्यांच्या घरट्यांचे मला ओझरते दर्शन घडले. खिडक्यांच्या चौकटींमधून टांगलेल्या सूर्यप्रकाशित पिंजऱ्यांमधून मी पकडलेले पक्षी बागडत होते. माणसाळलेले पक्षी आनंदाने चिवचिवत होते, उंच स्वरात गाणी गात होते. पण ह्या रूपेरी दिवसाचे संगीत आणि स्वच्छ सूर्यप्रकाश मला आनंदी करू शकले नाही. तो दिवस नको नकोसा झाला होता. प्रत्येक गोष्ट नकोशी वाटत होती. मी माझ्या पाखरांना मोकळे सोडून दिले असते. पण पिंजरे खाली काढण्याच्या उद्योगात मी

होतो तेवढ्यात आजी स्वैपाकघरात धावतपळत आली व मांड्यांवर थापट्या मारीत चुलाण्याकडे जात ओरडली :

"आग लागो मेल्यांनो तुम्हा सगळ्यांना! अकुलीना, थेरडे अशी कशी ग मूर्ख!"

भट्टीमधून तिने पिरोग* बाहेर काढला, आपल्या बोटांनी त्याच्या जळलेल्या कवचावर टिचक्या मारल्या व संतापाने तिने थू: थू: केले.

"जळून कोळसा झाला! सैतानांनो, तुम्हा साऱ्यांचा सत्यानाश होवो! घुबडा, तिथं बसून डोळे काय फिरवत राहिलास! फुटक्या भांड्यांसारखा सगळ्यांचा एक फटक्यात चुरा करून टाकीन!"

ती रडू लागली, पिरोग उलटसुलट वळवून पाहू लागली, त्याच्या कोरड्या कवचावर टिचक्या मारू लागली, आपल्या अश्रूंमध्ये त्याला भिजवू लागली.

माझी आई आणि आजोबा स्वैपाकघरात आले तेव्हा आजीने तो जळका पिरोग दाणदिशी टेबलावर फेकला. सगळ्या बशा खळखळल्या.

"तुमच्यामुळे काय झालं बघा! सैतान तुमचा सत्यानाश करो!"

माझी आई आता शांत झाली होती आणि आनंदात होती. तिने आजीला मिठी मारली व जळक्या पिरोगबद्दल आजीने विसरून जावे म्हणून तिच्याशी लाडीगोडी लावून ती बोलू लागली. आजोबा टेबलाशी आपल्या जागी बसले. ते थकलेले दिसत होते व त्यांच्या चेहऱ्यावरील सुरकुत्या ठसठशीत जाणवत होत्या. गळ्याभोवती नॅपकिन गुंडाळता गुंडाळता आपले सुजलेले डोळे सूर्याच्या दिशेने किलकिले करीत ते पुटपुटले :

"ठीक आहे, विसरून जा! यापूर्वी आपण पिरोग खाल्लाय. देवसुद्धा थोडा कंजूस आहे—वर्षांचा मोबदला मिनिटांमध्ये देतो आणि व्याजाचं नांवच काढत नाही! बैस वार्या... विसरून जा!"

त्यांचे मन गलबलून गेल्यासारखे दिसत होते. सबंध जेवणभर ते देवाबद्दल बोलत होते व बाप होण्यामुळे भोगाव्या लागणाऱ्या यातनांबद्दल बोलत होते. आजीने चिडून त्यांचे बोलणे मध्येच थांबविले :

"मुकाट बसून जेवा बघू! जरा कमी बोललात तर बरं होईल!"

---

*एक रशियन पक्वान्न. – अनु.

आई हसली. तिचे नितळ डोळे चमकत होते. मला हळूच ढोशीत तिने विचारले :

"थोडया वेळापूर्वी घाबरला होतास का रे?"

मी खरे म्हणजे तेवढा घाबरलो नव्हतो, पण आता मला अस्वस्थ वाटत होते आणि असे काय घडले होते ते मला समजत नव्हते.

रविवारचे जेवण नेहमी जसे भरपूर व खूप वेळपर्यंत चालत असे, तसेच त्याही दिवशी झाले. अवघ्या अर्ध्या तासापूर्वी हीच माणसे एकमेकांवर ओरडत होती, एकमेकांच्या अंगावर मारायला धावली होती, हुंदके देत होती, रागाने थरथरत होती, यावर विश्वास ठेवणे कठीण होते. तसेच हे सारे खरे होते आणि त्यासाठी त्यांना कष्ट पडले होते, यावरही माझा विश्वास नव्हता. त्यांच्या रडण्याची व ओरडण्याची, अधूनमधून एकदम पेटणाऱ्या व तितक्याच लौकर विझणाऱ्या भांडणांची मला सवय झाली होती. आरंभी या सर्व गोष्टी मी जेवढया मनाला लावून घेत असे, तेवढया आता घेईनासा झालो.

फार पुढे मला समजून आले की, दारिद्रय आणि आयुष्यातील रटाळपणा यांच्यापायी रशियन माणसे आपल्या दुःखामध्ये थोडे वैचित्र्य आणू पहात, लहान मुलांप्रमाणे खेळ करीत व आपल्या दुर्दैवांची त्यांना क्वचितच लाज वाटत असे.

आयुष्य जेव्हा एकसुरी बनते तेव्हा दुःखसुद्धा हवेसे वाटते, आगसुद्धा रुचिपालट ठरते. भकास चेहऱ्यावर चामखीळसुद्धा शोभा आणते!

## ११

या प्रसंगानंतर माझी आई ताठ आणि भक्कम बनली. घराची सारी सूत्रे तिने आपल्या हाती घेतली. तर आजोबा एकदम शांत झाले, कोणत्याही बाबतीत लक्ष घालीनासे झाले. त्यांचे हे वागणे त्यांच्या स्वभावाला धरून नव्हते.

ते घरातून जवळ जवळ अजिबात बाहेर पडेनासे झाले. पोटमाळ्यावरील खोलीत एकटेच बसून "माझ्या वडिलांनी केलेली टिपणे" नांवाचे एक गूढ पुस्तक वाचत असत. हे पुस्तक ते आपल्या तिजोरीत मोठ्या बंदोबस्ताने

कडी-कुलूप लावून ठेवीत. ते पुस्तक बाहेर काढण्यापूर्वी आजोबा नेहमी आपले हात धूत असत, असे अनेकदा माझ्या नजरेस आले होते. पुस्तक छोटे, जाडजूड आणि कमावलेल्या कातड्याच्या बांधणीचे होते. शीर्षकाच्या पहिल्या निळसर पानावर धूसर शाईत पुढील अक्षरे होती:

"सन्माननीय वसीली कशीरिन यांना प्रेमादरपूर्वक व कृतज्ञतापूर्वक."

खाली सहीचा फराटा अशा रीतीने ओढलेला होता की, ते उडत्या पक्ष्याचे चित्र असल्याचा भास व्हावा. नांव मला अपरिचित होते. आजोबा अत्यंत काळजीपूर्वक ते जाड कातडी वेष्टन उघडीत, रूपेरी काड्यांचा चष्मा डोळ्यांवर चढवीत आणि नाकावर चष्मा ठाकठीक करीत खूप वेळपर्यंत त्या शाईने लिहिलेल्या अक्षरांकडे टक लावून पहात रहात. अनेकदा मी त्या पुस्तकाबद्दल त्यांच्यापाशी चौकशी केली, पण नेहमी ते मोठा आव आणून उत्तर देत:

"ते तुला माहीत असण्याची गरज नाही. थोडा थांब—मी मेल्यानंतर हे पुस्तक आणि माझा केसाळ कोट मी तुझ्यासाठी ठेवून जाईन."

माझ्या आईशी ते क्वचित आणि जास्त प्रेमाने बोलू लागले. जेव्हा ती त्यांच्याशी बोलायची तेव्हा अत्यंत लक्षपूर्वक ते ऐकत, हाताने किंचित हातवारे करीत, प्योत्रकाकांप्रमाणे डोळ्यांची उघडझाप करीत आणि पुटपुटत:

"जसं तुला वाटेल, तसं कर."

त्यांच्या ट्रंकांमध्ये चित्रविचित्र पोषाख खच्चून भरलेले होते. जरीकाम केलेले बायकांचे लांब झगे, सॅटिनची जाकीटे, सोनेरी तारांचे विणकाम केलेले कापड, मोती जडवलेले साराफानी, कीकी, कोकोश्नीकी* रंगीबेरंगी रुमाल, जाडजूड मोर्दोवियन कंठमाळा व बहुरंगी रत्नांचे मणी यांचा त्यांच्यापाशी संग्रह होता. एकदा त्यांनी ह्या सर्व वस्तू माझ्या आईच्या खोलीत आणल्या व खुर्च्या-टेबलावर पसरून मांडल्या. आईने त्या वस्तूंच्या सौंदर्याचे कौतुक केले तेव्हा ते म्हणाले:

---

*साराफानी—बिनबाह्यांचे लांब पोषाख; कीकी व कोकोश्नीकी—शिरोभूषणे. **—अनु.**

"माझ्या काळात माणसं आजच्यापेक्षा जास्त सुंदर आणि भारी कपडे ल्यायची! कपडे खूप भारी असायचे, पण माणसं जास्त साधी आणि जास्त प्रेमानं जगायची! आता मला वाटतं की, तसं मागं जाण होणार नाही. अंगावर घालून बघ... हे पोषाख तुला होतात का बघ..."

एक दिवस आई शेजारच्या खोलीत गेली व सोनेरी विणकाम केलेला गडद निळा साराफान अंगात घालून आणि मोत्यांचे शिरोभूषण चढवून परतली.

"आपल्या मर्जीला मी आले का?" माझ्या आजोबांसमोर लवून सलाम करीत ती म्हणाली.

आजोबा थक्क होऊन तिच्याकडे कौतुकाने पहात राहिले. नंतर तिच्याभोवती फिरत, हातवारे करीत जणू स्वप्नात असल्याप्रमाणे पुटपुटत राहिले:

"अग वार्वारा, तू जर श्रीमंत असतीस आणि भली माणसं तुझ्याभोवती असती तर किती किती बरं झालं असतं!"

घराच्या दर्शनी भागातील दोन खोल्यांमध्ये माझ्या आईने आपले बिऱ्हाड थाटले होते. अनेकदा तेथे ती पाहुण्यांना बोलवायची. बहुतेक वेळा मक्सिमोव बंधू त्या पाहुण्यांमध्ये असत. प्योत्र हा प्रचंड बांध्याचा मोठ्या सोनेरी दाढीचा व निळसर डोळयांचा देखणा लष्करी अंमलदार होता. त्या म्हाताऱ्याच्या टकलावर थुंकल्याबद्दल ह्या प्योत्रच्या समोरच माझ्या आजोबांनी मला पूर्वी चोप दिला होता. त्याचा भाऊ येवगेनी हाही उंचनिंच होता, पण त्याचा चेहरा फिकट होता, लांबोडे पाय होते आणि छोटी टोकदार काळी दाढी होती. काटेरी फळांसारखे त्याचे डोळे होते. तो नेहमी हिरवा गणवेष परिधान करीत असे. त्यावर सोनेरी बटणे होती आणि त्याच्या निमुळत्या खांद्यांवर हुद्याच्या सोनेरी पट्ट्या होत्या. आपल्या भव्य कपाळावरील लांब, लाटालाटांचे केस डोक्याला झटका देऊन मागे सारण्याची व नम्रपणे हसण्याची त्याची लकब होती. तो सतत काहीतरी घोगऱ्या आवाजात सांगत असे व जे काही सांगायचे असे त्या आधी हमखासपणे एक वाक्य उच्चारीत असे:

"हे पहा, मी त्या गोष्टीकडं पाहतो तेव्हा..."

अर्धमिटल्या डोळयांनी माझी आई त्याचे बोलणे ऐकत असे व मधूनच किंचित हसून त्याच्या बोलण्यात खंड पाडीत असे:

"मला माफ करा, पण येवगेनी वसील्येविच, तुम्ही अजून लहान मुलासारखं बोलता..."

"बरोबर – अगदी कुक्कुलं बाळ!" धिप्पाड लष्करी अधिकारी आपल्या बोलण्यावर जोर देण्यासाठी आपल्या मांडीवर थाप मारून आईला दुजोरा द्यायचा.

नाताळची सुटी खूप गंमतीत गेली. जवळ जवळ रोज संध्याकाळी माझी आई आणि तिची मित्रमंडळी वेगवेगळे पोषाख करून कुणाकुणाच्या भेटींना जात. आईचा पोषाख नेहमी सर्वांत सुंदर असे.

दरवेळी ती हसरी-नाचरी मंडळी घराच्या फाटकाबाहेर गेली म्हणजे घर जणू जमिनीत खचल्यासारखे भासायचे. प्रत्येक वस्तू रटाळ आणि भयाण शांत वाटायची. एखाद्या म्हाताऱ्या बदकाप्रमाणे आजी तुरुतुरू चालत घरातील खोल्या साफ करीत फिरायची, तर शोभिवंत फरशीच्या शेकोटीशी पाठ करून अंग शेकीत आजोबा स्वतःशी पुटपुटत रहायचे :

"ठीक आहे, ठीक आहे, वागू दे तिला तिच्या मनासारखं... काय निष्पन्न होतंय त्यातून ते पाहू पुढं. ."

नाताळच्या सुटीनंतर मला आणि मिखाईलमामाचा मुलगा साशा, अशा दोघांना घेऊन आई शाळेत गेली. साशाच्या वडिलांनी दुसऱ्यांदा लग्न केले होते आणि त्याच्या सावत्र आईला तो सुरवातीलाच आवडेनासा झाला होता. ती त्याला सारखा मार द्यायची, म्हणून आजीने आजोबांच्या मागे लकडा लावून साशाला आमच्या घरी रहायला आणले होते. आम्ही दोघे सुमारे महिनाभर शाळेत गेलो. त्या काळात मी जे काही शिकलो त्यातील एकच गोष्ट माझ्या लक्षात राहिली की, जेव्हा माझे नांव काय म्हणून कुणी प्रश्न करी तेव्हा "पेश्कोव" एवढेच उत्तर देणे पुरेसे नव्हते. मला म्हणावे लागे :

"माझे नांव पेश्कोव!"

तसेच मला मास्तरना उलट बोलता येत नसे :

"अहो श्रीयुत, उगीच माझ्या अंगावर ओरडू नका. मी तुम्हाला भीत नाही..."

शाळेबद्दल माझ्या मनात तात्काळ तिटकारा उत्पन्न झाला. याउलट माझ्या मामेभावाला अगदी सुरुवातीपासून शाळा खूप आवडली व त्याची

खूप मित्रमंडळी बनली. पण एके दिवशी धड्याच्या वेळी त्याला डुलकी लागली आणि झोपेतच तो ओरडला :

"न -- नाही, मी मुळीच करणार नाही!"

जेव्हा त्याला जाग आली तेव्हा वर्गाबाहेर जाण्याची त्याने परवानगी मागितली. त्याबद्दल मुलांनी त्याची क्रूरपणे थट्टा केली. दुसऱ्या दिवशी शाळेत जाताना सेन्नाया चौकाच्या गल्लीपाशी गेल्यावर तो थांबला व म्हणाला :

"तू माझ्याशिवाय पुढं जा. आज मी शाळेत येणार नाही. त्यापेक्षा फिरायला जाईन."

खाली बसून त्याने बर्फात आपली पुस्तके पुरली आणि तो निघून गेला. जानेवारीमधील तो एक चकचकीत उन्हे पडलेला दिवस होता. सारा आसमंत सूर्यप्रकाशात न्हाऊन निघाला होता. माझ्या मामेभावाचा मला हेवा वाटला. पण आईच्या धाकाने मुकाट दातओठ खात शाळेला गेलो. साशाने बर्फात पुरलेली पुस्तके साहजिकच चोरीला गेली व दुसऱ्या दिवशी शाळेत न जाण्यासाठी त्याला खरेखुरे कारण सापडले. तिसऱ्या दिवशी आजोबांना त्याच्या खोटेपणाचा शोध लागला.

आम्हा दोघांनाही उभे करून चौकशी सुरू झाली. आमच्या उलटतपासणीसाठी स्वैपाकघरातील टेबलामागे आजोबा, आजी व माझी आई, असे तिघे बसले. आजोबांच्या प्रश्नाला साशाने दिलेले गंमतीदार उत्तर मला आठवते :

"तू शाळेपर्यंत पोचलाच नाहीस असं कसं झालं?"

"ती कुठं होती तेच मी विसरलो," आपल्या भित्र्या डोळयांनी आजोबांच्या चेहऱ्याकडे सरळ पहात तो उत्तरला.

"तू विसरलास?"

"हो. मी खूप शोधलं, खूप शोधलं..."

"तू अलेक्सेईच्या मागोमाग जायचंस. त्याला शाळेचा रस्ता आठवत होता."

"मला तो दिसेनासा झाला."

"कोण? अलेक्सेई?"

"हो."

"असं कसं झालं?"

साशा एक क्षणभर विचार करीत राहिला आणि नंतर उसासा टाकून म्हणाला:

"बर्फाचं वादळ चालू होतं—मला काहीच दिसत नव्हतं."

सारेजण हसले, कारण हवा स्वच्छ होती आणि ऊन पडले होते. साशाही मंदसा हसला. आजोबा दात विचकून खवचटपणे म्हणाले:

"तू त्याचा हात किंवा पट्टा धरून ठेवला नाहीस का?"

"मी धरला होता, पण वाऱ्याच्या जोरानं माझा हात सुटला."

तो अगदी सावकाश आणि निराश सुरात बोलत होता. त्याचे ते बावळट, व्यर्थ खोटे बोलणे ऐकणे मला अवघड जाऊ लागले. त्याच्या हट्टीपणाचा अर्थ मला समजत नव्हता.

आम्हा दोघांनाही चांगलाच मार बसला व वाकड्या हाताच्या एका सेवानिवृत्त म्हाताऱ्या बंबवाल्याची आम्हाला शाळेपर्यंत सोबत करण्यासाठी नेमणूक झाली. ज्ञानाच्या मार्गापासून साशाने भरकटू नये म्हणून त्याच्यावर नजर ठेवण्याचे काम त्या म्हाताऱ्यावर सोपविण्यात आले होते. पण सारे वाया गेले. दुसऱ्या दिवशी आम्ही गल्लीपाशी पोहोचताच साशाने आपला एक नमदी बूट पायातून काढून डावीकडे भिरकावला, दुसरा बूट काढून उजवीकडे भिरकावला व नुसत्या पायमोजांमध्ये तो चौकामधून पळून पसार झाला. म्हातारा आ वासून बघत राहिला. शेवटी त्याने दोन्ही बूट शोधून काढले व भेदरल्या मन:स्थितीत तो मला परत घरी घेऊन आला.

सबंध दिवसभर माझ्या आजोबांनी, आईने आणि आजीने पसार झालेल्या साशाच्या शोधात गाव पालथे घातले. सरतेशेवटी संध्याकाळच्या सुमारास मठाशेजारच्या चिर्कोवच्या दारुच्या दुकानात त्यांना तो सापडला. साशा तेथे नाच करून लोकांची करमणूक करीत होता. साशाच्या निग्रही मौनामुळे घरची माणसे एवढी भांबावून गेली होती की, त्याला घरी आणल्यानंतर मुळीच मार बसला नाही. माझ्याशेजारी फळीवर तो अंथरुणात पडल्यानंतर हवेत पाय उडवीत शांतपणे म्हणाला:

"माझ्या सावत्रआईला मी आवडत नाही, माझ्या वडलांना मी आवडत नाही, माझ्या आजोबांना मी आवडत नाही. मग मी त्यांच्याबरोबर कशाला रहायचं? दरोडेखोर कुठं राहतात त्याची मी आजीकडून माहिती विचारून

घेईन आणि त्यांच्यापाशी पळून जाईन. मग तुम्हा सर्वांना पश्चात्ताप होईल! चल, आपण बरोबरच जाऊ या?"

मला त्याच्याबरोबर पळून जाणे शक्य नव्हते. त्यावेळी माझ्यासमोर आयुष्याचे दुसरे ध्येय होते—मोठ्या सोनेरी दाढीचा लष्करी अंमलदार बनायचे! आणि त्यासाठी अभ्यास करणे आवश्यक होते. साशाला मी माझी योजना सांगितली तेव्हा क्षणभर त्याने विचार केला व मग आपली संमती दिली.

"तेसुद्धा छान आहे. तू अंमलदार बनशील तेव्हा मी दरोडेखोरांचा नायक होईन आणि मग मला पकडण्याची कामगिरी तुझ्यावर पडेल. आपल्यापैकी एकजण दुसऱ्याला ठार मारील किंवा कैद करील. मी मात्र वाट्टेल ते झालं तरी तुला ठार मारणार नाही."

"मीसुद्धा तुला ठार मारणार नाही."

ह्या निष्कर्षावर आम्ही आमची चर्चा थांबविली.

आजी आत येऊन चुलाण्यावर चढली आणि आमच्याशी गप्पा मारू लागली..

"काय रे माझ्या छोट्या उंदरांनो? कसे आहात रे माझ्या पिटुकल्यांनो!"

आमच्याबद्दल तिला फार अनुकंपा वाटली व साशाची सावत्र आई, खाणावळवाल्याची मुलगी, लठ्ठ नदेज्दामामी, हिची ती निंदा करू लागली. बोलण्याच्या भरात सर्व सावत्रआयांची आणि सावत्रबापांची ती निंदा करू लागली. त्याच ओघात तिने आम्हाला चतुर संन्यासी इयोन याची गोष्ट सांगायला आरंभ केला. ह्या इयोनने लहान असतानाच आपल्या सावत्र-आईला देवापुढे न्यायासाठी उभे केले होते. त्याचे वडील बेलोये तळ्यावर मच्छीमार होते:

भारले मच्छीमाराला चेटक्या बायकोने,
ठेवले सतत गुंगवून मद्याच्या प्याल्याने,
मिसळून वीष निजवले त्याला होडीत,
होडी नव्हतीच ती, घातले दफनपेटीत.
धरले सुकाणू तिने स्वतःच्या हाताशी,

वल्हवीत होडी नेली तळयाच्या मध्याशी,
पाणी होते खोल धावत चक्राकार तळाशी,
कुलटेची करणी पाहून शरमले स्वत:शी.
घालवायला तोल जेव्हा होडीमध्ये वाकली,
साक्षीला नव्हते कुणी तेव्हा होडी कलंडली,
धोंड्यासारखा सरळ गेला नवरा तळाशी,
झराझरा पोहत आली बायको तीराशी.
धरतीवर लोळण घेत आकांत तिने मांडला,
ठार मारून नवऱ्याला दु:खाचा कांगावा केला
ऐकून विलाप तिचा जन सारे कळवळले,
विधवेचे दु:ख पाहून मन त्यांचे विरघळले.
तरुणपणी वैधव्य आले
वाईट गे वाईट झाले
पण माणसाचे मरण
परमेश्वरा हाती आहे!

मात्र सावत्रपुत्र इयोनुश्कोचा विश्वास बसेना,
माचेखाच्या* डोळीचे अश्रू खरे त्याला वाटेना,
जाणायला सत्य डिवचले तिला त्याने,
हात ठेवून काळजावर आव्हान केले त्याने:

अगे कपटनिपुण स्त्रिये,
कृष्णकृत्ये, मायाविनी,
खोटा वाहतोय तुझ्या आसवांचा पूर,
काळजात वाहतोय खरा आनंदाचा पूर.
निवाडा कराया खऱ्या-खोट्याचा,
चला घेऊ हवाला देवाचा.
घेऊ हाती एकेक सुरा धारदार,
देऊ भिरकावून आकाशी आरपार.

---

* माचे खा – रशियन भाषेत सावत्रआई. – **अनु.**

असेल दोष माझा: उडेल माझे मुंडके,
असशील दोषी तू: उडेल तुझे डोके.

सावकाश वळून माचेखाने पाहिले,
नजरेत तिच्या जहर वीष होते भरले.
ठाम उभी त्याच्या पुढ्यात ठाकली,
कर्णकठोर वीजेसारखी कडाडली:

अरे मूर्खा षंढा, अवेळी जन्मलास,
मानवरूपी लांडगिणीच्या गर्भातून सांडलास!
भाषा तुझी शोभते तुझ्या जातकुळीला,
शरम नाही वाटत कंड्या पिकवायला?

ऐकले सारे जमलेल्या जनांनी,
आरोप-प्रत्यारोप ऐकले कानांनी,
जड काळजाने कटाक्ष त्यांनी फेकले,
हलक्या आवाजी एकमेकांशी कुजबुजले.
वयोवृद्ध एक कोळी झाला पुढे,
सभोवार झुकला आप्तजनांपुढे,
तोलून-मापून शब्द बोलला पुढे:

भल्या माणसांनो, सुरा द्या माझ्या हाती,
मीच भिरकावून देतो आकाशात वरती,
शिरच्छेद केवळ तो त्याचा करील,
दोष असेल ज्याचा तोच ठार होईल.

आणून दिला सुरा एक त्यांनी श्रेष्ठाला,
शुभ्र माथ्यावर उचलून त्याने आकाशी भिरकावला,
पक्ष्यासारखा नभोमंडळी तो भरारला.
परतायची सुरा खूप वाट त्यांनी पाहिली,

स्फटिकशुभ्र आकाशी नजर त्यांनी लावली,
टोप्या काढून माथ्याच्या एकत्र सारे जमले,
तळ्याकाठी नि:शब्द अख्खी रात्र उभे राहिले,
शेवटी पाण्यावर पहाटेची आभा फाकली,
माचेखाच्या वदनी प्रभा आशेची उजळली.
अचानक सुरा पाकोळीसारखा झेपावला,
सरळ आकाशातून माचेखाच्या छातीत घुसला!
भाविक जन खाली गुडघ्यावर झुकले,
देवाच्या न्यायाचे त्यांनी गोडवे गायले.
आला एक मच्छीमार इओनपाशी,
त्याला गेला घेऊन दूर आश्रमाशी,
केर्झेनेत्स नांवाच्या दूर नदीपाशी,
कीतेझ नांवाच्या रम्य गांवापाशी...*

दुसऱ्या दिवशी मी जागा झालो तेव्हा सबंध अंगावर तांबडे डाग उमटलेले होते. देवीची लागण होण्याची ती सुरुवात होती. मला अंधाऱ्या पोटमाळ्यावर ठेवण्यात आले. तेथे मी प्रदीर्घ काळ जवळ जवळ आंधळ्या अवस्थेत पडून होतो. माझ्या हाता-पायांना मोठमोठी बँडेजची फडकी बांधून ठेवलेली होती. मला कमालीची भयानक स्वप्ने पडत होती. अशाच एका भयानक स्वप्नापायी माझा पुरता निकाल लागणार होता. माझ्या भेटीला फक्त माझी आजी यायची आणि लहान बाळाला भरवितात त्याप्रमाणे मला चमच्याने खाऊ घालायची. अनेक गोष्टी आणि दंतकथा सांगायची. मी बरा होण्याच्या मार्गावर होतो, म्हणून माझे हात आणि पाय आता बांधलेले नव्हते. मात्र

---

*ताम्बोव गुबेर्नियामधील बरीसोग्लेबस्की ऊयेझ्दमधील कोल्यूपानोव्का गांवी मी या कथेचे दुसरे रूप ऐकले. तिच्यात, सावत्रमातेची सावत्रपुत्राने निंदा केल्याबद्दल तो सुरा त्याला ठार मारतो. – **लेखक.**

**कीतेझ** – एक प्राचीन प्रसिद्ध शहर. चिंघिझखानाचा मुलगा बातो याच्या स्वारीच्या वेळी हे शहर आपोआप भूमिगत झाले व त्या जागी 'स्वेतलोयार' तळे वर आले. – सं.

मी चेहरा खाजवू नये म्हणून हातमोजे घातलेले होते. एके संध्याकाळी माझी आजी नेहमीप्रमाणे आली नाही व त्यामुळे मी चिंतेत पडलो. एकदम मला भास झाला की, पोटमाळयाच्या धुळकट जिन्यावर ती पालथी पडलीय आणि तिचे हात पसरलेले आहेत. तिच्या मानेवर प्योत्रकाकांप्रमाणे भलामोठा घाव होता व त्या धुळकट सावल्यांमधून मोठ्या हिरव्या डोळयांचे एक प्रचंड मांजर आधाशीपणे तिच्या अंगावर हळूच चढत होते.

मी बिछान्यातून उडी मारली, माझ्या पायांनी आणि खांद्याने दुहेरी तावदानांची खिडकी फोडली व तिच्यामधून सरळ खाली उडी घेतली ती बर्फावर! त्या संध्याकाळी माझ्या आईकडे पाहुणे होते, त्यामुळे मी खिडकी फोडल्याचा आवाज त्या गोंधळात कुणाला ऐकू गेला नाही आणि काही काळपर्यंत मी तसाच एकाकी बर्फात पडून होतो. सुदैवाने एकही हाड मोडले नव्हते. फक्त खांदा निखळला होता व काचेमुळे मला जोरात कापले होते. मात्र जबरदस्त धक्का बसल्यामुळे माझ्या पायांमधील शक्ती गेली आणि मी पांगळा बनलो. सुमारे तीन महिनेपर्यंत मला चालता येत नव्हते. माझ्या खोलीत मी बिछान्यावर पडून घरामधील वाढती चाहूल ऐकत होतो. दारांची वारंवार उघडझाप होत असायची व लोकांची वर्दळ वाढली होती.

छपरांवर हिमवादळांचा घू घू आवाज ऐकू येत होता. पोटमाळयाच्या दारापलिकडे वाऱ्याचे घुमणे ऐकू येत होते. धुराडचामधून तो आत घुसत होता, खिडक्यांची दारे खडखडवीत होता. दिवसा मला कावळयांची काव-काव ऐकू यायची, तर निवांत रात्री दूरवरच्या लांडग्यांच्या अभद्र आरोळ्या ऐकू यायच्या. ह्या अशा संगीताच्या साथीवर माझे मन परिपक्व बनत गेले. मग लाजतबुजत आणि चोरपावलांनी वसंताचा मोसम आला. दर दिवसागणिक त्याच्या आगमनाची चाहूल खिडकीमधून वाढत्या प्रमाणात जाणवू लागली. मांजरांची आरडाओरड छपरांवर ऐकू येऊ लागली. वसंतामधील छोटे छोटे ओहळांचे खळखळते आवाज भिंतींमधून आत घुसून येऊ लागले. बर्फाच्या लोंबत्या काडचांचे तुटताना होणारे कट् कट् आवाज, छपरांवरून घसरणाऱ्या बर्फाचे आवाज, घंटानाद अशा वेगवेगळ्या ध्वनींचा भरघोसपणा जाणवू लागला. या घनगंभीर आवाजांची हिवाळयात उणीव भासली होती.

आजी मला पहायला आली. अलिकडे तिच्या शब्दांना वोदकाचा वास जास्त जास्त प्रमाणात येऊ लागला होता. एवढेच नव्हे तर एक पांढरे

चहाचे मोठे भांडे आणून माझ्या बिछान्याआड दडवून ठेवायला तिने आरंभ केला होता. डोळे मिचकावून ती मला ताकीद द्यायची :

"तुझ्या भुतासारख्या आजोबांना याबद्दल बोलायचं नाही हं सोनुल्या!"

"तू का पितेस?"

"श्शू:! तू मोठा झालास म्हणजे समजेल.!"

मग त्या चहाच्या भांड्यामधून ती वोदकाचा एक घोट प्यायची, आपल्या बाहीने तोंड पुसायची आणि प्रेमाने माझ्याकडे पाहून हसत म्हणायची :

"तर माझ्या छान छान बाळा, काल मी तुला कुणाबद्दल सांगत होते बरं?"

"माझ्या वडलांबद्दल!"

"आणि कुठपर्यंतची हकिकत मी सांगितली?"

तिने कोठपर्यंत सांगितले होते याची मी तिला जाणीव दिल्यानंतर तालबद्ध शैलीत तिच्या वाणीचा ओघ तासन तास वाहू लागायचा.

एके दिवशी ती खूप दमली होती, प्यायलेली नव्हती आणि दु:खी होती, अशावेळी तिने स्वत:च मला माझ्या वडिलांविषयी सांगायला सुरुवात केली होती.

"काल रात्री स्वप्नात मला तुझे वडील दिसले. शीळ घालीत आणि हातात भोजाच्या झाडाची काठी धरून मैदानातून ते चालले होते. अंगावर ठिपके ठिपके असलेला एक कुत्रा जीभ बाहेर काढून त्यांच्यामागून धावत होता. का कुणास ठाऊक, पण अलिकडे माक्सिम साव्वातेयेविच माझ्या स्वप्नात सारखे येतात. बहुधा त्यांचा आत्मा अस्वस्थ होऊन फिरतोय..."

त्यानंतर सलग अनेक संध्याकाळी तिने मला माझ्या वडिलांविषयीच्या कथा सांगितल्या. तिच्या स्वत:च्या गोष्टींप्रमाणेच त्याही मनोरंजक होत्या.

माझ्या वडिलांचे वडील एक सैनिक होते. पुढे बढती मिळून ते अंमलदार बनले, पण हाताखालच्या लोकांना क्रूरपणे वागविल्याबद्दल त्यांना सैबेरियात हद्दपार करण्यात आले. तेथेच सैबेरियात कुठेतरी माझ्या वडिलांचा जन्म झाला. त्यांचे आयुष्य खूप खडतर होते व वय लहान असतानाच त्यांनी घरामधून पळून जाण्याचे प्रयत्न सुरू केले. एक दिवस त्यांच्या वडिलांनी शिकारी कुत्रा सांगाती घेऊन एखाद्या सशाचा पाठलाग करावा तसा जंगलभर

आपल्या मुलाचा शोध केला. दुसऱ्या वेळी एकदा मुलगा सापडल्यावर त्यांनी निर्दयपणे त्याला खूप मारहाण केली, शेवटी शेजाऱ्यांनी त्याची सुटका करून त्याला दडवून ठेवले.

"मुलांना नेहमी मारतात का?" मी विचारले.

"नेहमी," आजी शांतपणे उत्तरली.

माझे वडील अगदी लहान असतानाच त्यांची आई वारली आणि ते नऊ वर्षांचे असताना त्यांचे वडीलही वारले. त्यांच्या धर्मपित्याने त्यांना दत्तक घेतले. हा धर्मपिता एक सुतार होता. त्याने पर्म शहरात माझ्या वडिलांना सुतारांच्या संघात दाखल केले. पण माझे वडील तेथून पळाले. प्रारंभी आंधळ्यांना घेऊन ते बाजारातून फिरत. पण सोळाव्या वर्षी ते नीझ्नी-नोवगरदला आले व कोल्चिनच्या मालकीच्या वाफेच्या बोटींवरील एका सुतारासाठी काम करू लागले. विसाव्या वर्षापर्यंत कॅबिनेट बनविण्यात व फर्निचरवर गाद्या-गिरद्या बसविण्यात त्यांनी पारंगतता मिळविली. ज्या दुकानात ते काम करीत ते दुकान कोवालिखा रस्त्यावरच्या माझ्या आजोबांच्या घराशेजारीच होते.

"बैठं कुंपण आणि चपळ पाय," आजी हसून म्हणाली. "तर आम्ही दोघी, म्हणजे मी आणि वार्या, बागेत रासबेरी वेचत होतो. एकदम मी वर पाहिलं तो काय — तुझे वडील कुंपणावर! मी तर पुरती घाबरून गेले. सफरचंदाच्या झाडांमधून ते आमच्याकडं चालत आले. केवढा धिप्पाड पुरुष! अंगात पांढरा सदरा आणि मखमाली मांडचोळणा, अनवाणी पाय आणि डोईवर टोपी नाही. लांब केस मागं आवरून धरायला कपाळावर एक पट्टी बांधलेली. कशाला ते तिथं आले असतील असं वाटतं तुला? तुझ्या आईला मागणी घालायला! त्यापूर्वी काहीवेळा खिडकीखालून जाताना मी त्याला पाहिलं होतं. आणि जेव्हा जेव्हा तो नजरेला पडला होता तेव्हा तेव्हा मनात आलं होतं, 'हा माणूस चांगला जावई होईल!' तर जेव्हा तो माझ्यापाशी आला तेव्हा मी म्हटलं, 'भल्या माणसा, तुला सरळ रस्ता माहीत नाही का?' चटकन तो गुडघ्यावर वाकला आणि म्हणाला, 'अकुलीना इवानोव्ना, माझं सर्वस्व मी तुमच्या पायाशी ठेवतोय. आणि वार्या इथंच आहे. येशूखातर आमच्या लग्नाला मदत करा.' तुला सांगते; माझ्या दृष्टीनं ते काहीतरी भलतंच लचांड निघालं! मला एवढा धक्का बसला की

माझी वाचाच बसली. वर पाहते तर तुझी कैदाशीण आई सफरचंदाच्या झाडामागे लपत होती, तिचा चेहरा रासबेरीसारखा लालबुंद झालेला आणि डोळ्यात आसवं आणून तुझ्या वडलांना खुणा करत होती. मग मी म्हणाले, 'अगे भाबडे पोरी, असला काहीतरी उद्योग करण्यापरीस नष्ट का झाली नाहीस? वार्वारा, तुला वेड तर लागलं नाही? आणि तू तरुण माणसा, तू काय करतोस याची कल्पना आहे? हे एवढं भोजाचं झाड वाकवणं तुझ्या ताकदीचं आहे का?' त्या काळात तुझे आजोबा खूप श्रीमंत होते. अजून मुलांना काही वाटणी दिली नव्हती. चार घरं मालकीची होती, खूप पैसा गाठीशी होता आणि चारचौघात मान होता. सतत नऊ वर्षं कारखान्याचे प्रमुख म्हणून काम केल्याबद्दल त्याआधीच थोड्या दिवसांपूर्वी त्यांचा लोकांनी सत्कार करून मानवस्त्रं दिली होती. काय त्या काळात दिमाख असायचा त्यांचा! तर मला काय सांगायचं ते धडधडत्या काळजानं मी तुझ्या वडलांना सुनावलं. पण त्यांची केविलवाणी अवस्था पाहून मला खूप दयाही येत होती. मग तुझे वडील उठून उभे राहिले आणि मला म्हणाले: "वसीली वसील्येविच आपखुषीनं मला वार्या देणार नाहीत हे मला ठाऊक आहे. म्हणून मी तिला पळवूनच नेलं पाहिजे आणि त्या कामी आम्हाला तुमची मदत पाहिजे!' म्हणे माझी मदत! मी त्याला हाकलून लावायचा प्रयत्न केला; पण जागचा हलायला तयार नाही. 'पाहिजे तर दगडानं मला मारा, पण मदत केलीच पाहिजे! तसा मी सोडणार नाही!' त्यांनी माझ्यापाशी धरणंच धरलं. तेवढ्यात वार्वारा तिथं आली आणि त्यांच्या खांद्यावर हात ठेवून म्हणते: 'आम्ही तसे आधीच नवरा-बायको बनलोय. मे महिन्यापासून! पण आता विधीपूर्वक लग्नाची आम्हाला गरज आहे.' जणू त्यांनी माझ्यावर आघात करावा त्याप्रमाणं मी खाली कोसळले!"

हसल्यामुळे आजीचे सारे अंग गदगदा हलले. मग तिने तपकिरीची चिमूट ओढली, डोळ्यातील पाणी पुसले आणि एक सुखाचा सुस्कारा टाकून पुढे हकीकत सांगायला सुरुवात केली:

"नवरा-बायकोसारखं नुसतं राहणं आणि लग्न करणं, यातला फरक समजायला अजून तू खूप लहान आहेस. पण लग्नाशिवाय एखाद्या मुलीनं बाळाला जन्म देणं फार भयानक मानलं जातं. तू मोठा होशील तेव्हा ही

गोष्ट लक्षात ठेव आणि कधीही कुणाही कुमारिकेला असा फसवू नकोस. कुमारिका संकटात पडली आणि लहान मूल बेवारशी ठरलं तर फार मोठं पाप लागेल तुला! कधीही हे विसरू नको, समजलं! स्त्रीविषयी मनात नेहमी करुणा बाळग आणि अंतःकरणापासून तिच्यावर प्रेम कर. नुसत्या चैनीखातर स्त्रीला वापरू नको! ही फार चांगली गोष्ट मी तुझ्या भल्यासाठी सांगत्येय!"

क्षणभर आजी चिंतनात मग्न झाली. नंतर तिने स्वतःला सावरले व आपली कहाणी पुढे सुरू केली.

"तर करण्यासारखं काय होतं? मी माक्सिमच्या डोक्यावर एक तडाखा हाणला आणि वार्वाराची वेणी जोरानं खेचली. त्यावर तुझ्या वडलांनी फार शहाणपणाची गोष्ट सांगितली. म्हणाले, 'मार दिलात तरी आमच्यात काही फरक पडणार नाही.' त्यावर तुझी आई म्हणते: 'आधी मार्ग शोध आणि नंतर आम्हाला मार.' तर मी माक्सिमला विचारलं, 'जवळ काही पैसे आहेत?' उत्तरला, 'थोडे होते, पण वार्याला अंगठी घ्यायला खर्चले. 'तीनही रूबल?' 'नाही. जवळ जवळ शंभर!' त्या काळात वस्तू स्वस्त होत्या आणि पैशाची किंमत फार होती. तुझ्या आईकडं आणि वडलांकडं मी नजर टाकली—लहान मुलांसारखी दोघं उभी होती! वेडपट पोरं! 'तुझ्या नजरेला पडू नये म्हणून मी फळीखाली अंगठी लपवून ठेवलीय,' तुझी आई म्हणाली. 'आम्ही ती विकू.' अगदी लहान मुलांसारखीच वागत होती की नाही? तर ते काही असलं तरी आठवड्याच्या आत त्या दोघांचं रीतसर लगीन लावायचं आम्ही ठरवलं. पाद्र्याशी वेळ ठरवण्याची जबाबदारी माझ्यावर होती. किती रडले म्हणून सांगू! तुझ्या आजोबांच्या भीतीनं सारखा माझ्या काळजाचा थरकाप होत होता. वार्वारा तर भिऊन गार झाली होती. तर आम्ही सगळ्या गोष्टी ठरवल्या.

"पण तुझ्या वडलांचा एक शत्रू होता. एक कारागीर. अगदी वाईट माणूस. बरेच दिवसांपासून त्यानं तुझ्या आई-वडलांवर पाळत ठेवली होती आणि सारा प्रकार ताडला होता. तर मी माझ्या एकुलत्या एक मुलीला जेवढं उत्तम सजवणं शक्य होतं तेवढं सजवलं आणि तिला फाटकापाशी घेऊन गेले. पलिकडच्या कोपऱ्यावर त्रोयका वाट पहात उभी होती. ती त्रोयकात बसली, माक्सिमनं शीळ मारली आणि ते सुसाट गेले. आसवं

ढाळत मी घरात परतले तर दाराशी तो दुष्ट माणूस उभा! म्हणतो कसा: 'तसा मी मनाचा चांगला आहे आणि त्यांच्या सुखात बिब्बा घालायची माझी इच्छा नाही. पण अकुलीना इवानोव्ना, तुम्ही मला फक्त पन्नास रूबल द्या!' माझ्यापाशी पैसे नव्हते, बँकेत माझं खातं नव्हतं, पैसे साठवणं मला आवडत नव्हतं आणि मी कधी साठवले नव्हते. तर मी मूर्खासारखी त्याला म्हणतेय, 'माझ्यापाशी पैसे नाहीत, आणि तुला मी काही देणार नाही!' तर म्हणतो: 'मग वचन द्या.' 'मी वचन देऊ? आणि ते पुरं करायला पैसे कुठून आणू?' 'श्रीमंत नवऱ्यापासून पैसे चोरणं एवढं अवघड आहे?' तो विचारतो. मला बावळटीला तेव्हा सुचलं नाही की त्याला आणखी थोडा वेळ तसंच बोलत ठेवायला हवं होतं. पण मी त्याच्या तोंडावर थुंकले आणि घरचा रस्ता धरला. तो माझ्याआधी अंगणात धावला आणि केवढा तमाशा केलान् त्यानं!"

आजीने डोळे मिटले आणि एक फिकट स्मितरेषा तिच्या चेहऱ्यावर उमटली.

"त्यानंतरचा जो अविचारीपणा घडला त्याची आठवणसुद्धा आज अंगावर काटा आणते. तुझ्या आजोबांनी एखाद्या क्रूर जंगली जनावरासारखी आरोळी ठोकली! त्यांच्यावर हा फार मोठा वाईट आघात होता. वार्वाराकडं बघून नेहमी म्हणायचे की, एखाद्या उमरावाशी नाहीतर खूप शिकलेल्या माणसाशी तिचं लग्न लावून देईन. तर हा उमराव भेटला! हा असला शिकलेला माणूस निघाला! पण कुणाकुणाच्या लग्नाच्या गाठी बांधून द्यायच्या ते आपल्यापेक्षा मेरी मातेलाच जास्त माहीत! एखाद्या आगीच्या लोळासारखे तुझे आजोबा अंगणात बाहेर धावले. याकोव आणि मिखाईलला त्यांनी हाका मारल्या, क्लीम गाडीवानाला आणि चेहऱ्यावर काळे ठिपके असलेल्या त्या चुगलखोर कारागीराला त्यांनी बोलावलं. त्यांनी हातात एक सोटा आणि पट्टयाला बांधलेला लोखंडी गोळा घेतलेला मी पाहिला. मिखाईलनं बंदूक घेतली. आमचे घोडे चांगले वेगानं धावणारे होते आणि आमची बग्गी वजनानं हलकी होती. तुझे आजोबा नक्की त्यांना गाठणार अशी माझी मनात खात्री पटली. पण वार्वाराचं रक्षण करणाऱ्या देवदूतांनी ऐनवेळी मला बुद्धी दिली. मी सुरी घेतली आणि दांड्यापाशी जू कापलं. रस्त्यावर दांडा तुटून पडावा अशी व्यवस्था केली. आणि नेमकं तसंच झालं. दांडा

तुटून लोंबकळायला लागला. तुझे आजोबा, मिखाईल आणि क्लीम यांचे प्राण अगदी थोडक्यात बचावले. त्यामुळं त्यांचा रस्त्यात खोळंबा झाला आणि ते चर्चमध्ये पोचले तेव्हा माक्सिम आणि वार्वाराचं वेदीवर लग्न लागून गेलं होतं. परमेश्वराची कृपा!

"आमची माणसं माक्सिमवर तुटून पडली. पण माक्सिम मोठा ताकदीचा गडी! अशी ताकद फार थोडयांपाशी असते. त्यानं मिखाईलला वेदीवरून भिरकावून दिलं. त्याचा हात निखळला. क्लीमला एका ठोशात लोळवलं. ते बघून तुझे आजोबा, याकोव आणि कारागीर यांची पुढं जायची हिंमत झाली नाही.

"माक्सिमनं डोकं शांत ठेवलं. 'सोटा खाली ठेवा,' त्यानं तुझ्या आजोबांना म्हटलं. 'मी शांतताप्रेमी माणूस आहे आणि जे काही मी घेतलंय ते मला देवाच्या कृपेनं मिळालंय. कुणाही माणसाला ते माझ्यापासून छिनावून घ्यायचा अधिकार नाही. तसं माझ्यापासून वार्वाराला छिनावून घेऊ नका, एवढंच मी तुम्हाला सांगतो!' आमची माणसं माघारी फिरली. आजोबा बग्गीत बसून ओरडले, 'वार्वारा! यापुढं तू माझी मुलगी नाहीस आणि यापुढं तुझं तोंड पहायची माझी इच्छा नाही! तू जिवंत किंवा मेलेली माझ्या दृष्टीनं सारखंच!' घरी येऊन त्यांनी मला झोडून काढलं. खूप शिवीगाळ केली. पण मी नुसती कण्हले. एक शब्द उच्चारला नाही. सारं काही काळाच्या ओघाबरोबर वाहून जाईल आणि जे घडायचं तेच घडेल अशी माझी खात्री होती. नंतर मला म्हणाले: 'हे बघ अकुलीना, तुझी मुलगी तुला कायमची मुकली हे लक्षात ठेव! इतःपर तुला मुलगी नाही, या जगात कुठंही ती नाही, समजलं?' मी मनातल्या मनात म्हणत राहिले, 'गाजरकेशा, बोल हवं तेवढं खोटं! तुला राग लौकर येतो, पण तो फार वेळ टिकत नाही!'"

श्वास रोखून मी ऐकत होतो. तिच्या निवेदनामधील काही भागांबद्दल मला आश्चर्य वाटले होते. आईचे लग्न आजोबांनी अगदी वेगळ्या रीतीने वर्णन करून सांगितले होते. त्यांचा लग्नाला विरोध होता आणि लग्नानंतर आईला त्यांच्या घरात पाय ठेवायला मज्जाव होता. पण त्यांच्या निवेदना-नुसार आईचे लग्न ही गुप्त बाब नव्हती आणि लग्नाला ते स्वतः हजर होते. कोणाची हकिकत खरी होती हे आजीला विचारायचा मला धीर

झाला नाही, कारण तिची हकिकत जास्त रोमांचकारी असल्याने मला ती आवडली होती. बोलताना ती सारखी मागे-पुढे डोलत होती. निवेदनामध्ये एखादा दु:खी अथवा भयानक प्रसंग आला म्हणजे तिच्या डोलण्याचा वेग वाढायचा व जणू प्रहारापासून बचाव करण्यासाठी ती एक हात वर उचलायची. वारंवार ती डोळे मिटून घ्यायची. तिच्या जाड भुवया थरथरत रहायच्या आणि तिच्या गालांवरच्या सुरकुत्यांमधून प्रेमळ स्मित पाझरत रहायचे. ज्या आंधळ्या तऱ्हेने ती प्रत्येक गोष्टीला क्षमा करायची, त्याने माझे अंत:करण हेलावून जायचे. पण काही वेळा मात्र तिने निषेधाचे कठोर शब्द उच्चारलेले ऐकायची मला तीव्र इच्छा व्हायची.

"तर पहिले एक-दोन आठवडे वार्या आणि मॅक्सिम कुठं होते याची मला काहीच कल्पना नव्हती. पण नंतर त्यांनी एका छोट्या मुलाबरोबर निरोप पाठवला. पुढच्या शनिवारी मी चर्चमध्ये प्रार्थनेला जाण्याचं निमित्त करून बाहेर पडले आणि त्या दोघांना भेटायला गेले. खूप लांबच्या सूये-तिन्स्की रस्त्यावरच्या एका घराच्या एका भागात त्यांनी बिऱ्हाड थाटलं होतं. त्या आवारात सर्व तऱ्हेचे कामगार रहात होते. खूप घाण होती तिथं आणि गोंगाटसुद्धा. पण त्या दोघांचं तिकडं लक्षच नव्हतं. आनंदानं बागडणाऱ्या मांजराच्या पिलांच्या जोडीप्रमाणं दोघं एकमेकांवर प्रेम करण्यात रमली होती. त्यांच्यासाठी मी चहा, साखर, काही कडधान्यं, मुरंबा, पीठ, वाळवलेल्या अळंब्या आणि थोडे पैसे घेऊन गेले होते. किती ते माहीत नाही, पण आजोबांपासून जेवढे चोरणं शक्य होतं तेवढे चोरून नेले होते. दुसऱ्यांसाठी चोरी करण्यात पाप नाही. स्वत:साठी मात्र पैसे चोरू नयेत! पण तुझा बाप त्यातलं काहीच घेईना. 'आम्ही काय भिकारी आहोत का?' दुखावून त्यानं विचारलं. वार्यानंसुद्धा त्याचाच सूर लावला. 'आई, कशाला या साऱ्या गोष्टी आणल्यास?' तरी मी त्यांना त्या सगळ्या वस्तू घ्यायला लावल्या. 'अरे वेड्यांनो, देवानंच तुम्हाला अशी आई पाठवून दिलीय', मी त्याला म्हणाले, 'आणि मूर्खा, मी तुझी रक्तामांसाची आई बनलेय! स्वत:च्या आईचा अपमान करावा असं कुठं लिहून ठेवलंय? इथं खाली तुम्ही जर आईचा अपमान केलात, तर वर देवाच्या आईला तुम्ही रडायला लावता!' ते ऐकल्यावर मॅक्सिमनं मला दंडाला धरून खोलीभर फिरवलं आणि माझ्याबरोबर थोडा नाचलासुद्धा! अस्वलासारखा भक्कम होता!

आपल्या नवऱ्याचं कौतुक वाटून वार्या अभिमानानं त्याच्या भोवती भोवती फिरत होती. एखाद्या अस्सल गृहिणीप्रमाणं आपल्या घराचं कौतुक करत होती. तिचं बोलणं ऐकताना हसून हसून माझ्या तर बरगड्या दुखायला लागल्या! चहाबरोबर तिनं दिलेल्या वात्रुश्की* खाताना लांडग्याचेसुद्धा दात तुटले असते! पनीर म्हणजे नुसती रेती!

"तर बरेच दिवस असंच चाललं होतं. तुझा जन्म व्हायची वेळ आली होती, तरी आजोबा आपले गप्पच! महाहट्टी खवीस होता म्हातारा! मी चोरून तुझ्या आई-वडलांकडे जातच होते, तुझ्या आजोबांना ते माहीत होतं, पण तरीही माहीत नसल्याचा बहाणा करत होते. आमच्या घरात वार्वाराचं नांव घ्यायला कुणालाही परवानगी नव्हती आणि कुणीही तिच्या नांवाचा उल्लेख करत नसे. मीसुद्धा तिचं नांव घ्यायची नाही. पण बापाचं अंतःकरण फार काळ वैर धरणार नाही याची मला सदैव कल्पना होती. आणि ती वेळ अखेर आली. एके रात्री बर्फाचं वादळ भणभणत होतं, लांडग्यांच्या कळपानं हल्ला चढवावा तसा वारा खिडक्यांवर तुटून पडत होता, धुराडी किंचाळत होती. नरकातले सारे सैतान जणू मोकाट सुटले होते. तुझे आजोबा आणि मी शेजारी शेजारी अंथरुणावर पडलो होतो. काहीकेल्या झोप येत नव्हती. मी त्यांना म्हणाले, 'गरीबांच्या दृष्टीनं आजची रात्र फार भयाण आहे. आणि ज्यांच्या मनांवर दुःखाची ओझी आहेत त्यांना तर आणखीच वाईट!' एकदम आजोबांनी विचारलं, 'त्यांचं कसं काय चाललंय?' मी उत्तरले, 'बरं चाललंय!' मला ते विचारतात, 'कुणाची चौकशी करतोय असं वाटलं तुला?' 'आपली मुलगी वार्वारा आणि जावई माक्सिम यांची!' 'त्यांचीच मी चौकशी करतोय हे कसं ताडलंस?' 'हा खेळ आता पुरे झाला. त्यानं कुणाला आनंद होतोय?' मी म्हणाले. त्यांनी एक मोठ्ठा उसासा टाकला आणि म्हणाले, 'अरे सैतानांनो! अरे बदमाषांनो! तो अडाणी मूर्ख कसा आहे?' म्हणजे तुझे वडील – तर मी म्हणाले 'तो खरंच मूर्ख आहे. काही काम करत नाही आणि दुसऱ्यांच्या जीवावर जगतो. आता आपले याकोव आणि मिखाईल यांनासुद्धा मूर्खच म्हणावं लागेल! काम करून घरात पैसे कोण आणतं? तुम्ही! आणि

---

*चक्का भरलेले गोल समोसे. – **अनु**.

त्यांची तुम्हाला खूप मदत होते.' त्यावर त्यांनी मला शिव्या घातल्या, नाही नाही ती नांवं ठेवली. पण मी काहीही बोलले नाही. 'एखाद्या माणसाचा काही ठावठिकाणा माहीत नसताना एकदम त्याला आपला कसा मानायचा?' ते म्हणाले. पण बोलून बोलून ते थकून जाईपर्यंत मी गप्प बसून राहिले. मग म्हणाले, 'जरा जाऊन बघून या, कसं राहतात ते! दोघं छान नांदताहेत.' 'ह्याः! मी का म्हणून जाऊ? त्यांना हवं तर येऊं दे!' ते म्हणाले. त्यावर मला आनंदानं रडू कोसळलं आणि त्यांनी माझी केसाची वेणी सोडवायला सुरवात केली. माझ्या केसांशी खेळायला फार आवडायचं त्यांना! तोंडातल्या तोंडात पुटपुटले, 'म्हातारे! उगीच ओरडू नकोस. मला काय काळीज नाही असं वाटलं तुला?' दुसऱ्या कुणाहीपेक्षा आपण जास्त शहाणे आहोत असं खूळ डोक्यात शिरण्यापूर्वी तुझे आजोबा फार चांगल्या मनाचे होते. त्यानंतर मात्र ते दुष्ट आणि मूर्ख बनले.

"मोक्षाच्या रविवारी तुझे आई-वडील आम्हाला भेटायला आले. दोघंही खूप मोठी, नीटनेटकी आणि देखणी दिसत होती. माक्सिम तुझ्या आजोबां-शेजारी उभा राहिला तेव्हा ते जेमतेम त्याच्या खांद्यापर्यंत पोचत होते. माक्सिम त्यांना म्हणाला, 'मी हुंडा घ्यायला तुमच्याकडं आलोय असा समज करून घेऊ नका वसीली वसील्येविच. खरंच तसं समजू नका. मी इथं आलोय ते माझ्या बायकोच्या वडलांना नमस्कार करायला.' तुझ्या आजोबांना तुझ्या बापाचं बोलणं आवडलं आणि हसून ते म्हणाले, 'अरेच्या! असा डांबीस आहेस होय तू! बरं, आता मूर्खपणा पुरे झाला. माझ्याकडं येऊन रहा बघू.' माक्सिम कपाळाला आठ्या घालून म्हणाला, 'त्याचा निर्णय वार्यावर अवलंबून. तिला पाहिजे तसं घडेल. मला सारं सारखंच.' मग पुन्हा त्यांच्यात वादावादी सुरू झाली. काही केल्या थांबेनात. तुझ्या बापाला मी डोळ्यांनी इशारे करीत होते, टेबलाखालून पायांनी लाथा मारून खुणावत होते, पण तो आपलं म्हणणं सोडायला तयार होईना! काय सुंदर डोळे होते त्याचे! नितळ आणि तेजस्वी. वर काळ्याभोर भुवया. काहीवेळा तो भुवयांना खाली डोळ्यांवर ओढायचा, त्याचा चेहरा दगडा-सारखा कठीण बनायचा आणि अशावेळी माझं सोडून तो कुणाचंही ऐकायचा नाही. मी त्याच्यावर माझ्या पोटच्या मुलांपेक्षा जास्त प्रेम केलं आणि त्याला ते ठाऊक होतं. त्यानंही माझ्यावर तशीच माया केली. मला मिठी

मारायचा, नाहीतर हातांवर उचलून सबंध खोलीभर फिरवत म्हणायचा, 'तूच माझी खरी आई—धरतीमातेसारखी! वार्वारापेक्षा माझं तुझ्यावर जास्त प्रेम आहे!' तुझी आई त्या दिवसात मोठी चलाख कैदाशीण होती. त्याच्या अंगावर धावून जात ती ओरडायची, 'अरे अकलेच्या कांद्या, अरे कोबीच्या गड्डया, असं बोलायची तुझी हिंमतच कशी झाली?' आणि मग आम्हा तिघांची खोलीभर पळापळ चालायची. मोठी मजा यायची! बछड्या, ते दिवस मोठे सुखाचे होते. इतका छान नाचायचा तुझा बाप. आणि गाणी फार सुरेख गायचा. आंधळ्या भिकाऱ्यांपासून खूप गाणी शिकला होता. आंधळ्यांशी गाण्यात दुसरं कुणी बरोबरी करू शकत नाही.

"तर बागेसमोरच्या खोल्यांमध्ये ते रहायला आले. तिथंच तुझा जन्म झाला—दुपारच्या वेळी. तुझे वडील दुपारच्या जेवणासाठी घरी आले; तर तुमची स्वारी अवतरलेली त्यांच्या स्वागताला. आनंदानं नुसता वेडा झाला होता तुझा बाप. पोर जन्माला घालणं म्हणजे जणू जगातलं सर्वांत अवघड काम असं समजून तुझ्या आईचे काय काय लाड करत होता. त्यानं मला आपल्या खांद्यावर बसवली आणि अंगणापर्यंत नेऊन तुझ्या आजोबांना आणखी एक नातू झाल्याची वर्दी दिली. आजोबासुद्धा त्याचा उत्साह बघून हसून म्हणाले, 'अरे माक्सिम, काय सैतान आहेस रे!'

"तुझ्या मामांना मात्र तुझा बाप आवडत नसे. कारण तो दारू प्यायचा नाही, त्याची जीभ तिखट होती आणि वेगवेगळ्या खोड्या करण्यात तो फार पटाईत होता. त्याच्या त्या खोड्या मात्र त्याच्या चांगुलपणाला गालबोट लावायच्या. लेंटच्या दिवसात एकदा अचानक जोराचं वारं सुटलं. सबंध घरात शिट्ट्या वाजू लागल्या, घूं घूं आवाज घुमू लागला आणि सगळ्यांची पाचावर धारण बसली. सर्व पुतळ्यांपुढले दिवे पेटवा आणि प्रार्थना सुरू करा, असं ओरडत तुझे आजोबा पळापळ करू लागले. मग अचानक एकदम सारा गोधळ थांबला आणि ती शांतता जास्तच भयाण वाटू लागली. याकोवमामानं खरा प्रकार ताडला. 'ही माक्सिमची करामत असली पाहिजे,' तो म्हणाला. आणि पुढं एकदा स्वतः माक्सिमनंच कबूल केलं. पोटमाळ्यावरच्या खिडकीत त्यानं वेगवेगळ्या बाटल्या अशा पद्धतीनं रचून ठेवल्या की, वाऱ्याचा आवाज त्यांच्यामधून भयाण रीतीनं घुमावा.

आजोबांनी त्याला ताकीद दिली, 'माक्सिम, जरा सांभाळून वाग! नाहीतर तुझ्या ह्या करामतींमुळं पुन्हा एकदा सैबेरियाच्या वाटेला लागशील!'

"हिवाळा खूप कडक होता. स्तेपमधले लांडगे इकडं घुसले. आज काय कुत्रा गायब, तर उद्या घोडं बिथरलं, तर परवा झिंगलेल्या पहारेकऱ्याला लांडग्यांनी फाडून खाल्लेला! असा त्या लांडग्यांनी खूप धुमाकूळ घातला होता. तुझा बाप हाती बंदूक घ्यायचा, घसरजोडे चढवायचा आणि रात्रीचा बाहेर जायचा. नेहमी एक किंवा दोन लांडगे मारून आणायचा. त्यांची कातडी तो सोलून काढायचा, त्यांच्यात पेंढा भरायचा आणि त्यांच्या डोळ्यांच्या जागी काचा बसवून, जिवंत लांडग्यांचा भास निर्माण करायचा. एके रात्री तुझा मिखाईलमामा संडासला गेला होता. एकदम विस्फारल्या डोळ्यांनी तो पळत घरात परत आला, त्याच्या डोक्यावरचे केस भीतीनं ताठ उभे राहिले होते, त्याची जीभ लुळी पडल्यानं त्याला बोलताही येत नव्हतं. स्वतःच्याच विजारीत पाय अडकून तो पडला आणि कसाबसा ओरडला: 'लांडगा!' प्रत्येकानं हाताला सापडेल ती वस्तू उचलली आणि संडासकडं धाव घेतली. आणि खरंच, संडासच्या भोकामधून लांडग्याचं मुंडकं डोकावत होतं. त्यांनी त्याच्यावर गोळ्या झाडल्या, काठ्या मारल्या, पण लांडगा आपला जागच्या जागीच! म्हणून त्यांनी त्याला हात लावला, तर नुसती कातडी, पेंढा भरलेलं डोकं आणि पुढचे पाय खिळे मारून संडास-च्या तोंडाला ठोकलेले! तुझे आजोबा तेव्हा माक्सिमवर खूप संतापले होते. फार फार चिडले होते! लौकरच याकोवही तुझ्या बापाबरोबर खोड्या करण्यात सामील व्हायला लागला. माक्सिम एका कार्डबोर्डावर माणसाच्या डोक्याचा आकार कापून काढायचा, त्याला डोळे, नाक, तोंड रंगवायचा, केसाऐवजी काथ्या चिकटवायचा. मग तो आणि याकोव रस्त्यावर फिरायला जायचे, आणि लोकांच्या खिडक्यांमध्ये ते बुजगावणं दाखवून लोकांना घाबरवायचे. बिचारे शेजारी साहजिकच घाबरून ओरडायचे. काहीवेळा ते स्वतः चादरी गुंडाळून फिरायचे. एकदा त्यांनी एका पाद्र्याला घाबरवलं. पाद्री धावत पहारेकऱ्याकडं गेला. पहारेकऱ्याचंही धाबं दणाणलं आणि त्यानं धोक्याची घंटा बडवली. अशा सारख्या काही ना काही खोड्या करत रहायचे. त्यांना किती बोललं तरी त्यांचे उद्योग थांबायचे नाही. कसल्यातरी

फालतू गोष्टीला घाबरून माणसं वेड्यासारखी पळत सुटतात ते पहायला किती गंमत येते, असं माक्सिम हसून म्हणायचा.

"एका खोडीमुळं मात्र त्याच्या प्राणावर बेतलं होतं. तुझा मिखाईलमामा हा त्याच्या बापासारखाच. मनाचा दुष्ट आणि नेहमी डूक धरून बसणारा. तुझ्या वडलांचा काटा काढायचं त्यानं ठरवलं. हिवाळ्याच्या सुरवातीला एके दिवशी माक्सिम, तुझे दोन मामा आणि एक पाद्री असे चौघेजण कुठूनतरी परत घरी येत होते (त्या पाद्र्यानं पुढं एका गाडीवानाला मरेपर्यंत मारल्या-बद्दल त्याला चर्चमधून हाकलून लावण्यात आलं). यामस्काया रस्त्यावरून ते येत होते. त्यांनी बर्फावरून घसरण्याच्या खेळाचा बहाणा करून तुझ्या वडलांना द्युकोव तळ्यापाशी नेलं. पण तळ्यापाशी जाताच त्यांनी तुझ्या वडलांना बर्फातल्या एका भोकात ढकललं – मला वाटतं मी यापूर्वी तुला सांगितलंय..."

"मामा असे दुष्टपणं का वागले?"

"ते तसे दुष्ट नाही," तपकिरीची चिमूट ओढीत आजी शांतपणे उत्तरली. "ते मूर्ख आहेत. मीश्का धूर्त आणि मूर्ख आहे. पण याकोव अगदीच मेषपात्र आहे... तर त्यांनी तुझ्या बापाला खाली बर्फातल्या पाण्यात लोटलं. तुझ्या बापानं कशीबशी बर्फाची कडा धरली, तर तुझे मामा त्याच्या बोटांवर बुटांसकट थयथया नाचले. सुदैवानं तुझा बाप शद्धीवर होता आणि तुझे मामा दारू पिऊन झिंगलेले होते. ते दोघे त्याच्या डोक्यावर बर्फाचे खडे मारत होते, पण त्यांचा नेम बसत नव्हता. दरम्यान तुझ्या बापानं पाण्याखाली बुडी मारून कशीबशी तग धरली. तो बुडून मेला अशी तुझ्या मामांची समजूत झाली. पण ते निघून जाताच तुझा बाप बाहेर आला आणि सरळ चौकातल्या पोलिस ठाण्यावर धावत गेला. तिथल्या ठाणेदाराला त्याची आणि आमच्या सबंध कुटुंबाची माहिती होती. असा अपघात कसा झाला, अशी त्यानं तुझ्या वडलांकडं चौकशी केली."

आजीने क्रूसाचे चिन्ह केले व कृतज्ञ भावनेने ती पुटपुटली:

"माक्सिम साव्वातेयेविचच्या आत्म्याला, त्या सात्त्विक आणि लायक माणसाच्या आत्म्याला, परमेश्वर सद्‌गती देवो! काय घडलं त्यातलं एका अवाक्षरानं त्यानं पोलिसांना सांगितलं नाही. म्हणाला – सगळा दोष माझा! दारू पिऊन झिंगलो आणि तळ्यात पडलो. पण ठाणेदार म्हणाला की, तो खोटं बोलतोय. तो कधीही दारू प्यायचा नाही. तिथं पोलिस ठाण्यावर

त्यांनी तुझ्या बापाच्या अंगाला वोदका चोळली, कोरडे कपडे घातले, गरम केसाळ कोटात गुंडाळलं आणि घरी आणलं. ठाणेदार स्वत: आणि दोन पोलिस त्याला घेऊन घरी आले. याकोव आणि मिखाईल अजून घरी आले नव्हते. आपल्या आईबापांचा उद्धार करत गुत्ते पालथे घालत होते. तुझ्या आईनं आणि मी पहिल्यांदा माक्सिमला ओळखलाच नाही. सबंध काळानिळा पडला होता, बोटांचा चेंदामेंदा झाला होता, रक्त वहात होतं आणि कपाळावर बर्फासारखं काहीतरी दिसत होतं. पण तो बर्फ वितळेना. नंतर समजलं की, त्या धक्क्यानं त्याचे केस एकदम पांढरे झाले होते!

"वार्वारा ओरडली, 'माक्सिम, त्यांनी काय दशा केली तुझी?' ठाणेदार घरभर चौकशी करत फिरत होता, प्रश्न विचारत होता. काहीतरी वाईट घडलं होतं याची मला काळजात जाणीव झाली. वार्वाराला मी ठाणेदाराबरोबर बोलण्यात गुंतवली आणि माक्सिमला एकटा गाठून खरं काय ते समजून घ्यायचा प्रयत्न केला. तो हळूच म्हणाला, 'मिखाईलला आणि याकोवला शोधून काढा. आम्ही यामस्काया रस्त्यावरच एकमेकांचा निरोप घेतला, असं त्यांना सांगायला लावा. ते पक्रोवकाला गेले आणि मी प्यादिल्नीला वळलो. हे सांगण्यात गडबड करू नका, नाहीतर आम्ही पोलिसांच्या भानगडीत अडकू.' मी आजोबांपाशी गेले. त्यांना सांगितलं, 'तुम्ही ठाणेदाराशी बोलत बसा. तोवर मी फाटकाशी जाऊन आपल्या चिरंजीवांची वाट पाहते.' जे काही घडलं होतं ते मी त्यांना सांगितलं. त्यांनी थरथर कापतच कपडे ठाकठीक करत म्हटलं, 'तरी मला वाटलंच होतं! असं काहीतरी घडणार म्हणून!' पण ते खोटं होतं. त्यांना काहीही ठाऊक नव्हतं. तर माझ्या लाडक्या बाळांना मी फाटकाशीच भेटले. पहिल्यांदा त्यांच्या कानफटात एकेक जोरात लगावून दिली. मीश्का घाबरून एकदम ठिकाणावर आला, पण याकोव पार झिंगला होता. तो बरळला, 'मला काहीही ठाऊक नाही. ही सगळी मीश्काची करणी! तो माझ्यापेक्षा वयानं मोठा आहे.' आम्ही ठाणेदाराची कशीबशी समजूत पटवली. भला माणूस होता! म्हणाला, 'ध्यानात ठेवा! आता जर काही घडलं, तर गुन्हेगार कोण ते मला चांगलं ठाऊक आहे.' आणि निघून गेला. मग तुझे आजोबा माक्सिमपाशी जाऊन म्हणाले: 'उपकार झाले पोरा! तुझ्या जागी दुसरा माणूस वेगळं वागला असता, हे मला चांगलं ठाऊक आहे. पोरी, असा

माणूस या घरात आणलास म्हणून तुझेही उपकार मानतो.' मनात असलं म्हणजे तुझे आजोबा फार छान बोलायचे. पुढं ते असे मूर्ख आणि कुढे बनले. तर आम्ही तिघंच तिथं उरलो तेव्हा माक्सिम रडायला लागला. त्याचं मन सैरभैर झालं होतं. ओरडून म्हणाला: 'का त्यांनी माझ्याशी असं वागावं? काय मी त्यांचं आजपर्यंत वाईट केलंय? अम्मा, का त्यांनी असं केलं?' मला तो नेहमी 'आई' ऐवजी लहान मुलासारखं 'अम्मा' म्हणायचा. त्याचा स्वभावच लहान मुलासारखा होता. मी तरी काय करणार? त्याच्याजवळं बसून रडत राहिले. सरतेशेवटी ती माझी मुलं होती आणि त्यांची मला दया वाटणारच! तुझ्या आईनं पोलक्याची सारी बटणं तोडली आणि भांडण केल्याप्रमाणं सारा अस्ताव्यस्त अवतार करून बसली. ओरडून म्हणाली, 'माक्सिम, चल, इथून निघून जाऊ. माझे भाऊ आपले वैरी आहेत. मला त्यांची भीती वाटते. जाऊ या इथून!' मी तिला दटावलं. 'उगीच आगीत तेल ओतू नकोस! आधीच घरात धूर झालाय!' इकडं आजोबांनी त्या दोघा वेडपटांना माफी मागण्यासाठी धाडलं होतं. तुझ्या आईनं मीश्काच्या एक थोबाडीत लगावून म्हटलं—'ही तुला माफी केली!' तुझे वडील सारखे त्यांना विचारत राहिले: 'बंधूनो, असं कसं वागू शकला तुम्ही? मला तुम्ही जन्माचा पांगळा करून ठेवला असतंत! माझ्या बोटांविना मी कारागीर कसा राहणार? आँ?' त्यांनी काहीतरी गुळमुळू उत्तरं दिली. तुझे वडील पुढं जवळ जवळ सात आठवडे आजारी होते. अंथरुणावर पडल्या पडल्या सारखे म्हणायचे: 'अम्मा, दुसऱ्या कुठल्या-तरी गांवाला जाऊ. मला इथं वीट आलाय!' लौकरच त्याला अस्त्राखानला पाठवलं. तिथं झार भेटीला यायचा होता, म्हणून विजयकमान उभारायला तुझ्या बापाला तिथं पाठवलं होतं. वसंतामधल्या पहिल्याच बोटीनं ते इथून गेले. माझा अर्धा प्राण सोडून गेल्यासारखं वाटलं. त्यालाही खूप दु:ख झालं होतं. मी त्यांच्याबरोबर चलावं, असं सारखं म्हणत होता. पण वार्वाराला मात्र मनापासून आनंद झाला होता आणि निर्लज्ज सटवी आपला आनंद मुळीच लपवीत नव्हती! तर अशा रीतीनं ते आम्हाला सोडून गेले... संपलं सारं..."

आजीने वोदकाचा एक घोट घेतला, तपकिरीचा बार भरला आणि खिडकीबाहेर नजर टाकीत विचारमग्नपणे ती म्हणाली:

“तुझे वडील आणि मी, आम्ही काही एका रक्ताचे नव्हतो. पण आमचे विचार सारखे होते...”

तिचे गोष्ट सांगणे चालू असताना काहीवेळा मधूनच आजोबा तेथे येत, आपले खारीसारखे तोंड वर करून नाकाने हवा हुंगत, आजीकडे संशयाने कटाक्ष टाकीत, क्षणभर तिचे बोलणे ऐकत व नंतर पुटपुटत:

“खोटं, खोटं, सारं सारं खोटं...”

एकदा त्यांनी अनपेक्षितपणे विचारले:

“अलेक्सेई, ती इथं दारू पीत होती?”

“नाही.”

“खोटं बोलतोस. तुझ्या डोळ्यांवरून समजलं मला.”

ते तिथून निघून गेले, पण त्यांचा माझ्या सांगण्यावर विश्वास बसला नाही. त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहून आजीने डोळे मिचकावले आणि म्हणाली:

“मांजरा मांजरा धावशील किती, मासा भिऊन पळेल पुढती!”

एके दिवशी खोलीच्या मध्यभागी ते उभे राहिले व फरशीवर नजर रोखीत म्हणाले:

“ऐकलंस का ग...”

“अं?”

“पाहिलंस, काय घडतंय?”

“पाहतेय.”

“काय वाटतं तुला?”

“नशीब! दुसरं काय? त्या सभ्य माणसाबद्दल तुम्ही काय म्हणायचा ते आठवतं?”

“हं!”

“तुमचं म्हणणं बरोबर होतं!”

“कंगाल आहे.”

“तो तिचा प्रश्न!”

आजोबा बाहेर गेले. काहीतरी संकट आहे याची जाणीव होऊन मी आजीला विचारले:

“कशाबद्दल बोलत होता तुम्ही?”

“सगळ्या गोष्टी तुला समजल्याच पाहिजेत का?” माझ्या पायांना

मालीश करता करता ती गरजली. "तू लहान असतानाच तुला सारं समजलं, तर मोठेपणी तुला शोधायला काही शिल्लक उरायचं नाही." तिने हसून मान हलविली.

"हं, आजोबा... आजोबा! तुम्ही म्हणजे देवाच्या डोळ्यात पडलेलं फूल आहात! अलेक्सेई, तू काही बोलू नकोस, पण खरी गोष्ट म्हणजे तुझ्या आजोबांनी सारं काही गमावलंय – अगदी शेवटच्या कोपेकपर्यंत! एका माणसाला फार मोठी रक्कम कर्जाऊ दिली, कित्येक हजार आणि त्या माणसाचं दिवाळं वाजलंय..."

ती अधिकच विचारात गढली व खूप वेळपर्यंत गप्प बसून राहिली. तिच्या चेहऱ्यावरील स्मित पुसले गेले व त्याजागी दुःखाच्या छटा काळवंडल्या.

"कसला विचार करतेस?"

"तुला काय सांगावं त्याचा विचार करतेय," स्वतःला सावरून घेत ती उत्तरली. 'येवस्तिग्नेई'ची गोष्ट सांगू? तर अशी होती कहाणी:

कोणे एके काळी होता येवस्तिग्नेई उपाध्याय,
समजायचा स्वतःला अकलेचा महामहोपाध्याय,
झार किंवा पाद्री यांच्याहून मानायचा हुशार,
व्यापाऱ्याच्या अकलेहून म्हणे याचा पल्ला फार!
नाचतो थयथया वेडपट पीरासारखा,
वटारतो डोळे म्हाताऱ्या घुबडासारखा,
शहाणपण शिकवी शेजाऱ्यांना अखंड,
दिसते विपरीत याला सारे भू-खंड.
मनोरा पाहिला – बुटकाच आहे!
बग्गीतून फिरला – सावकाशच चालते!
सफरचंद खाल्लं – गोडच नाही!
उन्हात बसला – उष्माच होतो!
पाहील त्या गोष्टीवर भाष्य त्याचं आहेच:

आजीने डोळे गरागरा फिरवले, गाल फुगवले आणि चेहऱ्यावर मूर्खपणाचा भाव आणून पुढच्या ओळी म्हटल्या:

"मीच बनवून दिलं असतं याहून छान!
पण ठाऊक आहेच तुम्हाला,
वाया घालवायला मजपाशी वेळ नाही फार!"

एक क्षणभर आजी थांबली. मग पुढे हळू आवाजात म्हणू लागली:

एके रात्री त्याच्याकडे आले सैतान आणि म्हणाले:
"इथं काहीच चांगलं नाही म्हणतोस गड्या?
मग येतोस का आमच्याबरोबर नरकात,
विहीरीपेक्षा उंच तिथं आगी पेटतात!"
उपाध्यायानं टोपी घातली न घातली,
तोच दोन सैतानांनी त्याची मानगूट धरली,
इतरांनी पंजात बळकट खेचला,
नख्या ओरबाडून बेजार केला,
पेटत्या आगीत लोटून दिला:
"काय उपाध्यायबुवा, कसा मजा आला?"
खरपूस भाजून निघताना चांगलीच जिरली,
उपाध्यायाची जुनी सवय तरी नाही सुटली,
मुरडून नाक नि मुडपून ओठ म्हणाली स्वारी:
"अहो नरकातल्या आगीला धूरच भारी!"

गोष्टीच्या अखेरी आजीने खूप लांब हेल काढला व हसली. नंतर चेहऱ्यावरचा भाव बदलून मला म्हणाली:

"त्या येवस्तिग्नेईनं आपला हेका कधीच सोडला नाही! तुझ्या आजोबां-सारखा! चल, आता झोप पाहू..."

माझी आई क्वचितच माझ्यापाशी पोटमाळ्यावरच्या खोलीत यायची आणि आली तरी काही मोजके शब्द बोलून घाईने परत जायची. ती जास्त सुंदर दिसू लागली होती आणि तिचे कपडेही पूर्वीपेक्षा जास्त चांगले असायचे. पण आजीप्रमाणेच तिच्याही हालचालींमध्ये मला गूढता जाणवत होती. ती आणि आजी माझ्यापासून काहीतरी लपवीत होत्या व ते रहस्य ओळखायचा मी प्रयत्न करीत होतो.

आजीच्या गोष्टींमध्ये आता मला तितकासा रस राहिला नाही. माझ्या वडिलांबद्दलच्या गोष्टीही माझ्या मनात प्रतिदिनी वाढणाऱ्या शंकांना थोपवू शकेनात.

"माझ्या वडलांचा आत्मा एवढा अस्वस्थ का झालाय?" एके दिवशी मी आजीला विचारले.

"मला काय ठाऊक?" आपल्या डोळ्यांवर हात ठेवीत ती उत्तरली. "तो देवाचा प्रश्न आहे. आपल्याला समजण्यासारखी ती बाब नव्हे..."

झोपेविना तळमळणाऱ्या रात्री मी गडद निळ्या आकाशामधील चांदण्यांची संथ मिरवणूक टक लावून पहात बसायचा. मला अनेक दुःखद कहाण्या आठवायच्या आणि त्या सर्व कहाण्यांचे नायक माझे वडील असायचे. ते एकाकी असायचे, त्यांच्या हाती एक काठी असायची आणि पायांशी एक केसाळ कुत्रा घोटाळत असायचा...

## १२

एके दिवशी दुपारी छोट्याशा वामकुक्षीनंतर मी जागा झालो तेव्हा मला जाणवले की माझ्या पायांनाही जाग आली होती. मी त्यांना बिछान्याच्या कडेवर लोंबकळत सोडले, पण पुन्हा ते बधीर आणि निर्जीव बनले. तरीही मनात विश्वास निर्माण झाला की माझे पाय अखंड शाबूत होते आणि पुन्हा एकदा मी चालू शकणार होतो. अत्यंत आनंदापायी मी चीत्कारलो आणि तक्तपोशीवर माझी पावले टेकवली. मी खाली पडलो, पण तसाच रांगत दारापर्यंत गेलो आणि तिथून जिन्याच्या पायऱ्यांवरून खाली गेलो. मला पाहिल्यावर प्रत्येकाला आश्चर्याचा केवढा प्रचंड धक्का बसेल याची मी मनातल्या मनात कल्पना करीत होतो.

आईच्या खोलीत माझ्या आजीच्या मांडीवर मी कसा आलो ते काही मला आठवत नाही, पण अपरिचित लोकांच्या गराड्यात मी तिथे पडलो होतो एवढे मात्र खरे! त्या लोकांमध्ये एक हडकुळी, हिरवटसर म्हातारी होती.

"गरम चहामधून त्याला थोडा रासबेरीचा मुरंबा द्या आणि दुलईमध्ये त्याला लपेटा..." गंभीर आवाजात ती हिरवी म्हातारी म्हणाली. तिच्या आवाजात बाकीचे सारे आवाज एकदम बुडून गेले.

तिच्या सर्व गोष्टी हिरव्या रंगाच्या होत्या : तिचा पोषाख, तिची टोपी, तिचा चेहरा, तिच्या डाव्या डोळ्याखालची चामखीळ. त्या चामखीळीमधून उगवलेले केससुद्धा गवतासारखे हिरवे होते. खालचा ओठ लोंबता ठेवून आणि वरचा ओठ वर उचलून वासल्या तोंडाने हिरवे दात दाखवीत ती माझ्याकडे टक लावून पहात होती. काळ्या हातमोजात गुरफटलेला एक हात तिने आपल्या डोळ्यांवर आडवा धरला होता.

"कोण आहे ही?" मी चाचरत विचारले.

"ती तुझी आणखी एक आजी होईल," कडवट आवाजात माझे आजोबा उत्तरले.

आई हसली आणि येवगेनी माक्सिमोवला माझ्या दिशेने ढकलीत म्हणाली.

"आणि हे तुझे भावी वडील!"

त्या पाठोपाठ ती काही अगम्य शब्द भराभरा बोलली. दरम्यान माक्सिमोव डोळे बारीक करीत माझ्यावर ओणवे होत म्हणाले :

"मी तुझ्यासाठी काही रंग विकत आणीन."

खोलीमध्ये फार झगझगीत प्रकाश होता. टेबलावर एका कोपऱ्यात चांदीची शमादाने उभी होती आणि प्रत्येक शमादानात पाच मेणबत्त्या होत्या. त्यांच्या मधोमध "माते! रडू नको" नांवाची आजोबांची आवडती पुतळी होती. चौकटीला साज आणणारे मोती चमकत होते आणि मेणबत्तीच्या प्रकाशात जणू विरघळत होते. सोनेरी धाग्यांमध्ये बसवलेली लाल माणके त्या प्रकाशात अग्निज्वाला फेकीत होती. अंधाऱ्या खिडक्यांमधून पांढुरके गोल चेहरे डोकावत होते. खिडक्यांच्या काचांना चपटी नाके दबलेली दिसत होती. माझ्या भोवतालच्या सर्व वस्तू गरगर फिरू लागल्या. ती हिरवी म्हातारी खाली वाकली व आपल्या थंडगार बोटांनी माझ्या कानांमागे चाचपून पहात पुटपुटली :

"अर्थात... काही झालं तरी..."

"त्याला चक्कर आलीय," माझी आजी म्हणाली आणि मला दाराशी घेऊन गेली.

पण मला चक्कर आलेली नव्हती. मी नुसते डोळे मिटून घेतले होते. मला ती जिन्यावरून वर घेऊन चालली होती तेव्हा मी म्हणालो :

"हे तू मला आधी सांगितलं का नाहीस?"

"बरं, बरं, आता काही बोलू नकोस. समजलं?"

"तुम्ही सगळ्यांनी मला असं फसवलंत..."

जेव्हा तिने मला बिछान्यावर ठेवले तेव्हा तिने उशीमध्ये डोके खुपसले आणि तिच्या अश्रूंचा बांध फुटला. तिच्या हुंदक्यांबरोबर तिचे शरीर गदगदा हलत होते. ती सारखी मला म्हणत होती:

"रड! रडून टाक एकदा!"

पण मला रडायची इच्छा होत नव्हती. पोटमाळ्यावरच्या त्या खोलीत अंधार होता आणि थंडी वाजत होती. माझ्या अंगाच्या थरथरीबरोबर बिछाना हलत होता आणि पलंगाची करकर वाजत होती. ती हिरवी बाई माझ्या नजरेसमोरून काही केल्या हलत नव्हती. मी झोपण्याचा बहाणा केला आणि माझी आजी मला एकटचाला तिथे सोडून गेली.

पुढचे काही दिवस अगदी संथ एकसुरी पार पडले. आईने आपला वाङनिश्चय जाहीर केला आणि ती निघून गेली. घरावर एक भीषण शांतता पसरली होती.

एके सकाळी आजोबा हातात कानस घेऊन अवतरले आणि त्यांनी खिडकीभोवतालचे लुकण खरवडायला सुरुवात केली. नंतर पाण्याचे तसराळे आणि काही फडकी घेऊन आजी आली.

"मग काय म्हातारे?" आजोबांनी शांत सुरात विचारले.

"काय?"

"आनंद वाटला?"

जिन्यावर तिने मला जसे उत्तर दिले होते तसेच आत्ता तिने आजोबांना उत्तर दिले:

"बरं, बरं, आता बोलू नका, समजलं?"

ह्या शब्दांना खास अर्थ होता. त्या शब्दांमागे काहीतरी फार मोठे आणि अप्रिय असे दडले होते. त्याची प्रत्येकाला कल्पना होती, पण त्याचा उल्लेख करण्याची कुणालाही इच्छा नव्हती.

आजोबांनी काळजीपूर्वक खिडकीची चौकट निखळून काढली आणि ती बरोबर घेऊन गेले. आजीने खिडकीची दारे सताड उघडी टाकली. बाहेर बागेत काही चिमण्या चिवचिवत होत्या. एक मैना गात होती. वितळणाऱ्या

बर्फामधून येणाऱ्या जमिनीच्या उन्मादक वासाने सारी खोली भरून गेली होती. चुलाण्याच्या निळसर फरशा भकास दिसत होत्या. त्यांच्याकडे नजर जाताच माझ्या अंगावर काटा उमटत होता. मी बिछान्यातून रांगत बाहेर पडलो.

"अनवाणी फिरू नको," आजीने ताकीद दिली.

"मी बागेत जातोय."

"ओल जाईपर्यंत थांब."

तिचे ऐकायची मला इच्छा नव्हती. मोठी माणसे आता मला नजरे-समोर नकोशी झाली होती.

जमिनीमधून गवताच्या फिकट हिरव्या कोंबांनी एव्हाना डोकी वर उचलली होती. सफरचंदाच्या झाडांवर कळया टप्पोऱ्या फुगत होत्या. पेत्रोव्नाच्या घराच्या छपरावर सुंदर हिरव्या शेवाळयाचा गालिचा पसरला होता. सगळीकडे पक्षी बागडत होते. गंधित, गुंजत्या हवेमुळे माझे डोके भिरभिरत होते. प्योत्र काकाने ज्या ठिकाणी स्वतःचा गळा कापून घेतला होता त्या खड्डयाच्या कडेशी बर्फाने पाडलेल्या तपकिरी लव्हाळयांची किनार पसरली होती. त्यांच्याकडे पाहण्यात आनंद नव्हता. ती लव्हाळी किंवा ते भकास जळके खुंट वसंताच्या वातावरणात अगदीच विसंगत भासत होते. खरे म्हणजे तो खड्डाच कमालीचा विसंगत भासत होता. ती लव्हाळी उपटून टाकावी, खुंट आणि विटा उचकटून फेकून द्याव्या, अंगणाच्या त्या कोपऱ्या-तली सर्व गदळ दूर सारावी आणि कुणाही मोठ्या माणसाला सांगाती न घेता त्या नीटस-स्वच्छ कोपऱ्यात अगदी एकट्याने उन्हाळा घालवावा अशी त्या क्षणी मला तीव्र इच्छा झाली. हे काम मी ताबडतोब हाती घेतले आणि त्या नादात आमच्या घरात अलिकडे घडलेल्या घटना विसरून जाण्यास मला मदत झाली. अर्थात मनाला झालेली जखम टोचत राहिलीच. पण सरत्या दिवसागणिक तिची वेदना कमी होत गेली.

"गाल का फुगवून बसलायस?" आजी आणि आई मला विचारायच्या. त्यांचा असा प्रश्न मला बेचैन करायचा. मी त्यांच्यावर रागावलो नव्हतो. पण घराशी निगडित अशी प्रत्येक गोष्ट मला अप्रिय वाटत होती. ती हिरवी बाई वारंवार आमच्याकडे चहाला किंवा जेवायला यायची. एखाद्या जुन्या कुंपणातील कुजक्या खांबासारखी बसून रहायची. अदृश्य धाग्यांनी तिचे

डोळे तिच्या चेहऱ्याला शिवून टाकले आहेत असे वाटायचे. खपाः खाचणां मध्ये तिचे डोळे सहजपणे गरागरा फिरायचे, सारे काही पहायचे, प्रत्येक गोष्टीची पारख करायचे. ती देवाशी बोलायची तेव्हा छताकडे तिची नजर वर उचलली जायची, सांसारिक गोष्टी बोलायची तेव्हा तिची नजर जमिनीकडे खिळलेली असायची. तिच्या भुवया भुशाच्या बनविल्या आहेत आणि काहीतरी अद्भुत पद्धतीने चिकटविलेल्या आहेत असे भासायचे. तिने तोंडात कोंबलेल्या सर्व वस्तू तिचे भलेमोठे रुंद दात आवाज न करता भरडून टाकीत. खाताना ती हातात काटा मोठ्या विचित्र, वाकड्या रीतीने धरायची. तिची करंगळी ताठ पुढे डोकवायची. तिच्या कानांपुढे अस्थिकूर्चांचे छोटे गोळे मागेपुढे होत. तिचे कान हलत आणि तिच्या सुरकुतलेल्या, पिवळया, अतिनितळ कातडीवरची चामखीळ हलायची तेव्हा तिच्यावरचे हिरवे केस थरथरत. ती आणि तिचा मुलगा एवढे टापटीप असत की त्यांच्याजवळ जाण्याची मला हिंमत होत नसे. कपड्याच्या गावणाचा आणि ऊदाचा वास येणारा आपला सुरकुतला हात मी चुंबावा म्हणून सुरवातीच्या काही दिवसात तिने खूप प्रयत्न केले. पण मी नेहमी दूर पळून जायचा.

"येवगेनी, ह्या पोराला फार काळजीपूर्वक शिस्त लावली पाहिजे, समजलं?" ती आपल्या मुलाला वारंवार बजावून सांगायची.

पण तो फक्त आज्ञाधारकपणे मान तुकवायचा, कपाळाला आठी घालायचा आणि तोंडातून चकार शब्द काढायचा नाही. त्या हिरव्या व्यक्तीच्या अस्तित्वामध्ये सर्वांच्या कपाळाला आठ्या पडलेल्या असत.

त्या म्हातारीचा आणि तिच्या मुलाचा, असा दोघांचाही मला विलक्षण तिटकारा वाटत असे. ही तिटकाऱ्याची भावना एवढी तीव्र होती की तिच्या-पायी अनेकदा माझी कणीक तिंबून निघाली होती. एके दिवशी आम्ही जेवत असताना डोळे गरगर फिरवीत ती म्हणाली:

"बाळा अलेक्सेई, तू एवढ्या घाईघाईनं का जेवतोस आणि एवढे मोठमोठे घास कशाला घेतोस? अन्न घशात अडकून गुदमरशील!"

मी माझ्या तोंडातून तुकडा काढला, त्यात माझा काटा खुपसला आणि तो तिच्यासमोर धरला.

"घ्या, तुम्हाला खूप हवासा वाटतोय ना," मी म्हणालो.

आईने मला टेबलावरून हाकलून लावले आणि अत्यंत अपमानास्पद रीतीने माझी पोटमाळ्यावरच्या खोलीत हकालपट्टी झाली.

थोड्या वेळानंतर आजी माझ्यापाशी आली. तिने तोंडावर हात दाबून धरला होता तरी तिला अमाप हसू आवरत नव्हते.

"देवा, परमेश्वरा! असा कसा डांबीस कारटा निपजलास रे तू!"

तिने ज्या रीतीने आपला हात तोंडावर दाबून धरला होता ती तऱ्हा मला आवडली नाही. म्हणून मी तिच्यापासून दूर पळालो आणि छपरावर चढून चिमणीमागे खूप वेळपर्यंत एकटाच बसून राहिलो. खोडी करावी आणि सर्वांना उद्देशून वाईट भाषा वापरावी अशी मला अनावर ऊर्मी येत होती. या ऊर्मीला दाबून ठेवायला मला खूप प्रयास पडले, पण मला तिला दाबावे लागले. एके दिवशी माझ्या भावी सावत्रबापाच्या आणि आजीच्या खुर्च्यांना मी चेरीची पेस्ट माखून ठेवली. ती दोघे फार गंमतीदार रीतीने खुर्च्यांना चिकटून बसली. अर्थात आजोबांनी मला त्याबद्दल खरपूस मार दिला. त्यानंतर माझी आई पोटमाळ्यावरच्या खोलीत माझ्यापाशी आली, तिने मला स्वत:जवळ ओढले, आपल्या गुडघ्यांमध्ये मला गच्च धरले आणि म्हणाली :

"एवढी गुंडगिरी का करतोस? तुझ्यामुळं माझी किती कुचंबणा होते ते तुला समजत नाही का?"

तिच्या डोळ्यांमध्ये टपोरे अश्रू तरारले आणि तिने माझे डोके धरून स्वत:च्या गालांपाशी धरले. त्यापेक्षा तिने मला मारले असते तर मला फार बरे वाटले असते. तिने रडणे थांबवावे यासाठी मक्सिमोवना पुन्हा त्रास न देण्याची शपथ त्या क्षणाला मी घेतली.

"आता कसा शहाण्यासारखा वागलास," ती प्रेमळ स्वरात म्हणाली. "तू.असं गुंडासारखं वागणं चांगलं नाही. लौकरच आम्ही लग्न करू आणि मॉस्कोला जाऊन येऊ. आणि आम्ही तिथून परत आल्यानंतर तू माझ्याबरोबर राहशील. येवगेनी वसील्येविच फार दयाळू आणि हुषार गृहस्थ आहेत. तुला ते नवकी आवडतील अशी मला खात्री आहे. तू जिम्नाशियममध्ये शिकायला जाशील, आत्ता ते आहेत तसा कॉलेज विद्यार्थी बनशील आणि त्यानंतर तू डॉक्टर होशील किंवा तुला हवा तो माणूस बनशील.

शिकलासवरलेला माणूस स्वत:ला पाहिजे तसा जगू शकतो. बरं आता खेळायला पळ..."

"नंतर" आणि "त्यानंतर" असले शब्द मला कुठेतरी खोलवर तिच्यापासून दूर नेत आहेत, दाट काळोखाकडे आणि एकलेपणाकडे नेत आहेत असे भासू लागले होते. तिने रंगविलेल्या भविष्य काळामध्ये मला काही सुखाचा सुगावा लागत नव्हता. मला आईला सांगावेसे वाटत होते: "नको करूस तू लग्न! मी काम करीन आणि तुझं भरणपोषण करीन."

पण मी तसे म्हटले नाही. माझी आई नेहमी माझ्या मनात हळुवार आणि उत्कट भावना निर्माण करी. पण त्या भावनांना व्यक्त करण्याचा धीर मला होत नसे.

दर दिवसागणिक माझ्या बागेतील कामाची प्रगती होत होती. सारी लव्हाळी आणि तण तोडून मी जागा साफ केली होती. खड्डयाच्या उतरत्या कडेभोवती विटा रचल्या होत्या. आणखी कांही विटांच्या साह्याने मला निजता येईल एवढा रुंद ओटा बांधला. रंगीत काचांचे आणि फुटक्या बशांचे तुकडे मी चिकणमातीच्या साह्याने विटांच्या फटींमध्ये बसवले. सूर्यप्रकाश पडला म्हणजे चर्चमधील पुतळयांप्रमाणे ते तुकडे चमकत.

"छान कल्पना लढवलीस," माझ्या कामाचे निरीक्षण करीत एक दिवस आजोबा म्हणाले. "मात्र लव्हाळी परत उगवतील, कारण त्यांची मुळं तू तशीच ठेवलीस. चल, मला फावडं आणून दे. मी त्यांना खणून काढतो."

मी त्यांना फावडे आणून दिले तेव्हा त्यांनी आपल्या दोन्ही हातांच्या तळव्यांवर थुंकून ते चोळले आणि "हूं" आवाज करीत फावडे जमिनीत खुपसले.

"ही मुळं फेकून दे. मी तुला सूर्यफुलं आणि उंच फुलझाडं लावून देतो. फार छान दिसतील."

एकाएकी ते फावडयावर नि:स्तब्ध ओणवे राहिले आणि काहीही बोलले नाही. मी त्यांच्याकडे दृष्टिक्षेप टाकला तेव्हा त्यांच्या डोळयांमधून आसवांच्या धारा वहात असलेल्या मला दिसल्या. एखाद्या हुशार कुत्र्याप्रमाणे त्यांचे डोळे बारीक आणि बुद्धिमान होते.

"काय झालं आजोबा?"

त्यांनी मान हलविली, आपल्या हाताने चेहरा पुसला व माझ्याकडे पाहिले.

"अरेच्चा, एवढ्यातच मला घाम फुटला. बघ, कितीतरी किडे आहेत तिथं!"

पुन्हा ते खणू लागले. मग अचानक म्हणाले:

"हे करण्यात काही अर्थ नाही. खरंच, अगदी निरर्थक आहे सारं! लौकरच हे घर मी विकणार आहे. बहुधा शरदाच्या मोसमात. तुझ्या आईच्या हुंड्यासाठी पैशांची गरज आहे. शेवटी काही झालं तरी तिनं व्यवस्थित राहिलं पाहिजे..."

हाताला झटका देत त्यांनी फावडे फेकून दिले आणि बागेच्या कोपऱ्याशी असलेल्या हमामखान्याकडे ते गेले. तिथे त्यांनी काही वाफे लावले होते. मी खणायला लागलो आणि लगेचच फावड्याचे पाते लागून माझा अंगठा कापला.

ह्या जखमेमुळे मला माझ्या आईच्या लग्नाला हजर राहता आले नाही. मी फक्त फाटकाबाहेरपर्यंत जाऊ शकलो. मक्सिमोवने तिचा हात धरला होता. मान खाली घालून ती रस्त्यावरून चालत होती. विटकरी फूटपाथच्या फुटक्या चिरांमधून उगवलेल्या कोवळ्या गवतामधून जपून पावले टाकीत ती जात होती. जणू खिळ्यांवरून ती चालली आहे असे भासत होते.

विवाहसोहळा अगदीच शांतपणे पार पडला. त्यानंतरच्या चहापानाच्या समारंभात काही आनंद नव्हता. माझी आई ताबडतोब तिच्या खोलीत गेली आणि आपल्या ट्रंका भरायला तिने सुरुवात केली. माझे सावत्रवडील माझ्यापाशी बसून म्हणाले:

"मी तुला काही रंग देईन म्हणून कबूल केलं होतं, पण इथं चांगले रंग मिळाले नाहीत आणि माझे स्वतःचे रंग काही मी तुला देऊ शकत नाही. मॉस्कोहून तुला थोडे रंग पाठवून देईन."

"त्यांचं मी काय करू?"

"तुला चित्रं काढायला आवडत नाही?"

"चित्रं कशी काढतात ते मला माहीत नाही."

"मग मी तुझ्यासाठी दुसरं काहीतरी पाठवीन."

तेवढ्यात माझी आई तेथे आली.

"आम्ही लौकरच परत येऊ," ती मला म्हणाली. "तुझ्या वडलांची

परीक्षा आटोपली आणि अभ्यास संपला म्हणजे ताबडतोब आम्ही परतू."

मी एखादा मोठा माणूस असल्याप्रमाणे ती दोघे माझ्याशी बोलत होती ते ऐकायला मला बरे वाटत होते. पण एखादा दाढीमिशावाला पुरुष अजून शिकतोय हे ऐकायला मात्र विचित्र वाटत होते.

"तुम्ही कसला अभ्यास करताय?"

"सर्वेक्षणाचा!"

ही काय भानगड होती त्याचा खुलासा करून घेण्याचा मी कंटाळा केला. सबंध घरावर एक दडपणारी शांतता पसरली होती. रात्र पडण्याची मी अधीरतेने वाट पहात होतो. चुलाण्याकडे पाठ करून आजोबा उभे होते आणि अर्धमिटल्या डोळ्यांनी खिडकीबाहेर टक लावून पहात होते. ती हिरवी बाई उसासे टाकीत आणि कुरकुरत सामानाची बांधाबांध करण्यात माझ्या आईला मदत करीत होती. दुपारपासूनच झिंगलेल्या आजीला तिने घराची अब्रू घालवू नये म्हणून पोटमाळ्यावरच्या खोलीत बंद करून ठेवले होते.

दुसऱ्या दिवशी भल्या सकाळीच आई प्रवासाला निघाली. निरोपाच्या वेळी तिने मला मिठी मारली. अगदी सहजपणे चटकन तिने मला वर उचलले आणि माझ्या डोळ्यांमध्ये रोखून पाहिले. तिची तशी नजर यापूर्वी मला कधीही दिसली नव्हती.

"बराय, येते रे!" असे म्हणून तिने माझी पापी घेतली.

"माझं ऐकत जा म्हणून सांग त्याला," अजूनही गुलाबी दिसणाऱ्या आकाशात टक लावून पहात अजोबा दुर्मुखलेपणे म्हणाले.

"तू तुझ्या आजोबांचं ऐकत जा," माझ्यावर क्रूसाचे चिन्ह करीत आईने ताकीद दिली. तिने काहीतरी दुसरे बोलावे अशी अपेक्षा मी करीत होतो. माझ्या आजोबांनी असा मध्येच खोडा घातल्याबद्दल मला त्यांचा खूप राग आला.

द्रोश्कीमध्ये ते बसले. आईचा घागरा कशाला तरी अडकला. तो सोडवायला तिला बराच वेळ लागला तेव्हा ती कमालीची त्रासली.

"अरे तिला मदत कर. दिसत नाही तुला?" आजोबा मला म्हणाले. पण मी स्वतःच्या दुःखात चूर असल्याने मदत करण्याच्या मनःस्थितीत नव्हतो.

तंग गडद निळ्या तुमानीमधील आपले लांबोडे पाय काळजीपूर्वकपणे

द्रोश्कीच्या आतं ओढून मक्सिमोव बसला. आजीने त्याच्या हाती दिलेली काही गाठोडी त्याने आपल्या गुडघ्यांवर रचून धरली व हनुवटीने त्यांना आधार दिला होता.

"पुरे!" अस्वस्थपणे आपल्या फिकट भुवयांना आकुंचित करीत तो गरजला.

ती हिरवी बाई आणि लष्करी अधिकारी असलेला तिचा मोठा मुलगा दुसऱ्या एका द्रोश्कीत बसले. एखाद्या मेणाच्या पुतळ्यासारखी ती ताठ बसली होती, तर तो आपल्या तलवारीच्या मुठीने आपली दाढी चोळीत होता आणि सारखा जांभया देत होता.

"तर मग तुम्ही युद्धावर निघालात?" आजोबांनी त्याला विचारले.

"होय. खरंच चाललोय."

"छान! त्या तुर्कांना जरा अद्दल घडवलीच पाहिजे!"

त्यांच्या द्रोश्की निघाल्या. आईने अनेकवेळा मागे वळून पाहिले आणि हातरुमाल हलवून दाखविला. घराच्या भिंतीचा आधार घेऊन आजी रडत उभी होती आणि हात हलवून आईला प्रत्युत्तर देत होती. आजोबा आपल्या डोळ्यांमधले अश्रू हाताच्या बोटांनी झटकून टाकीत होते.

"यातून का ऽऽ ही चांगलं निष्पन्न होणार नाही," ते पुटपुटले.

चाकोरीमधून खडखडत जाणारी द्रोश्की मी स्टुलावर बसून पहात होतो. कोपऱ्यावर वळून ते दिसेनासे झाले आणि माझ्या अंतःकरणात काहीतरी खाडकन बंद झाले... अगदी घट्ट...

अजून सकाळ पुरती उजाडलेली नव्हती. रस्ते रिते होते आणि खिडक्यांची झापे अजून मिटलेली होती. एवढा निखालस रितेपणा यापूर्वी कधीही मी पाहिला नव्हता. दूर कुठूनतरी धनगराच्या बासरीचे करुण सूर कानांवर येत होते.

"न्याहरीला चल," माझ्या खांद्याला पकडीत आजोबा मला म्हणाले. "माझ्या बरोबर राहणंच तुझ्या नशिबी आलेलं दिसतंय. एखाद्या विटकरीवर आगकाडी घासत रहावी तसं!"

सकाळपासून रात्र पडेपर्यंत मी आणि आजोबा अगदी मुकाट्याने बागेत काम करीत राहिलो. त्यांनी माती खणली, रासबेरीची झुडपे गच्च बांधली, सफरचंदाच्या झाडांवरचे शेवाळे खरडून काढले आणि सुरवंट चिरडून टाकले.

तर मी माझ्या कोपऱ्याची डागडुजी करीत राहिलो. आजोबांनी जळक्या खुंटांचे शेंडे छाटून टाकले आणि जमिनीत खांब रोवले. त्या खांबांवर मी माझे पक्ष्यांचे पिंजरे लटकाविले. ऊन आणि दंव यांच्यापासून माझ्या घराचे संरक्षण व्हावे म्हणून मी त्यावर वाळक्या लव्हाळ्यांचे छत विणून घातले. माझा कोपरा खूप छान सजला.

"आपल्याला आवश्यक असलेल्या गोष्टी स्वतःच करायला शिकणं छान असतं," आजोबा मला म्हणाले..

आयुष्यावरची त्यांची भाष्ये मला फार मौलिक वाटत. गवत पसरलेल्या माझ्या ओटचावर ते काहीवेळा पहुडत आणि शांत स्वरात माझ्याशी बोलत रहात. अशा वेळी त्यांच्या तोंडातून बाहेर पडणारा प्रत्येक शब्द खूप विचारांती उमटलेला आहे, असे मला जाणवत असे.

"आता तुझ्या आईपासून तू वेगळा झालेला तुकडा आहेस. आता तिला आणखी मुलं होतील आणि तिला ती तुझ्यापेक्षा जास्त प्रिय वाटतील. तुझी आजी दारू प्यायला लागलीय हे तू पाहतोसच!"

जणू काही तरी ऐकत असल्याप्रमाणे ते बराच वेळपर्यंत गप्प रहात आणि मग पुन्हा आपल्या तोंडामधून अवजड शब्द टाकायला आरंभ करीत:

"दारूची सवय लागायची ही तिची दुसरी खेप. मिखाईलला सैन्यात बोलावणं यायचं होतं तेव्हा पहिल्यांदा ती प्यायला लागली होती. त्याला रिक्रूट सर्टिफिकीट मी विकत घेऊन द्यावं असा खुळीनं आग्रह धरला. कदाचित त्यानं सैन्यात चाकरी बजावली असती तर तो वेगळा झाला असता. मी तरी कसला मूर्ख! आणि आता लौकरच मी मरीन. म्हणजे तू एकटा पडणार. समजलं? अगदी एकटा पडणार. सारी जबाबदारी तुझी तुझ्यावर. हं! स्वतःच स्वतःची वाट पहायला शीक. दुसऱ्यांची वाट पहात बसून राह्यची पाळी आणू नकोस. शांत आणि धीरगंभीर वागायला शीक. स्वतः निवडलेल्या मार्गाला चिकटून रहा. सर्वांचं ऐकून घे, पण शेवटी तुला उत्तम वाटेल तसंच वाग..."

पाऊस पडल्याचे दिवस वगळता मी आख्खा उन्हाळा बागेतच राहिलो. ऊबदार रात्री मी बाहेरच झोपायचा. बिछाना म्हणून आजीने मला नमदी कातडयाचा एक तुकडा दिला होता. अनेकवेळा ती माझ्यापाशी येऊन रात्र घालवायची. ओंजळभर कडबा आणून ती माझ्या कोचाशेजारी पसरायची

आणि माझ्याशेजारी अंग टाकून मला गोष्टी सांगायची. अधूनमधून अचानक उद्‌गारांनी तिच्या निवेदनात खंड पडायचा :

"बघ – उल्का! कुणाचा तरी आत्मा धरतीमातेच्या ओढीनं खाली आला! कुठंतरी भला माणूस जन्माला आला."

किंवा म्हणायची :

"बघ – नवा तारा उगवलाय! कसा हिऱ्यासारखा चमकतोय! आकाश म्हणजे देवाचं वस्त्र... किती दूर आहे... हिऱ्यामाणकांनी मढवलंय!"

"मूर्खांनो, असं बाहेर झोपून मराल!" आजोबा कुरकुरायचे. "पाठ अवघडेल किंवा चोर येऊन तुमचे गळे कापतील..."

आकाशात आगीच्या नद्यांचे महापूर सोडून सूर्य खाली जायचा. ती आग विझता विझता बागेतल्या हिरव्या मखमालीवर तांबूस-सोनेरी राखेचे शिंपण करायची. मग मात्र जग काळोखात बुडू लागायचे. ऊबदार संधि-प्रकाश सामावून घेता घेता त्याचा आकार फुगायचा आणि ते विस्तृत बनायचे. ऊन खाल्लेली पाने फांद्यांवर माना टाकायची आणि गवताची पाती धरतीवर लोळण घ्यायची. सारे काही संपन्न आणि मऊ मऊ बनायचे. त्यातून मंद संगीतासारखा गंध झिरपू लागायचा. दूरच्या मैदानांमधील लष्करी छावण्यां-मधून संगीताच्या सुरावटी वाहत यायच्या. आईच्या प्रेमाप्रमाणे रात्र आपल्या-बरोबर एक सामर्थ्यवान आणि ताजीतवानी भावना घेऊन यायची. आणि आईने हळुवार गोंजारावे तशी रात्रीची शांतता असायची. ऊबदार, केसाळ पंजाने जणू ती शांतता काळजाला हळूच गोंजारायची आणि आठवणीच्या कप्प्यात नकोशा असणाऱ्या गोष्टी हलकेच झटकून टाकायची – दिवसभरात साचलेली दाहकतेची धूळ झटकून टाकायची. आकाशाकडे नजर लावून बिछान्यावर पडायला मोठे छान वाटायचे. एकेक तारा जसा उगवत असे तशी आकाशाची गहनता अधिकच वाढत जाई. ह्या वाढत्या गहिराई जणू तुम्हाला जमिनीपासून हलकेच वर उचलत. आणि मग पृथ्वी तुमच्या आकृतीएवढी संकोचली आहे का भोवतालच्या वातावरणाशी एकरूप होण्याएवढा तुमचा विस्तार झालाय हे सांगणे कठीण होत असे. शांतता वाढायची, अंधार जास्त दाटायचा, पण बारिकशा आवाजांनी अदृश्य तारा कंप पावायच्या. झोपेतल्या पक्ष्यांचे गाणे, धावत्या साळूची सळसळ, माणसाचा आवाज – अशा प्रत्येक आवाजाला दिवसापेक्षा रात्री एक खास वेगळेपण प्राप्त होई.

संवेदनाशील शांततेमध्ये त्या ध्वनीला एक गोड ठाशीव रूप प्राप्त होई.

ॲकॉर्डियनचे संगीत, स्त्रीचे हसणे, फरसबंदीच्या विटांवर घासणारी टाच, कुत्र्याचे केकाटणे—ही सारी मावळत्या दिवसाची गळून पडणारी अखेरची पाने होती.

काहीवेळा बाहेर रस्त्यावर किंवा मोकळ्या जागी झिंगलेल्या आवाजांमधले अचानक भांडणाचे स्वर ऐकू येत आणि पाठोपाठ धावत्या पावलांचे आवाज. असले सामान्य आवाज लक्ष देण्याच्या लायकीचे नसत.

आजी आपल्या डोक्याखाली उशीला हात धरून तासनतास नुसती पडून रहायची. शांतचित्ताने ती कसल्यातरी आठवणी सांगत असायची. मी तिचे बोलणे ऐकतो किंवा नाही याची तिला अशावेळी मुळीच पर्वा नसे. ती नेमकी अशी काही अद्भुत कहाणी निवडून काढायची, की तिच्यामुळे रात्रीचे महत्त्व आणि सौंदर्य अधिकच वाढायचे.

तिच्या तालबद्ध बोलण्याच्या आवाजात मला कधीतरी गाढ झोप लागायची. सकाळी तोंडावर सूर्याची किरणे स्पर्श करू लागली आणि पक्षी कानात गाणी गाऊ लागले म्हणजे मला जाग यायची. उन्हांमुळे ऊब आलेली सकाळची हवा हळूच आळोखेपिळोखे द्यायची, सफरचंदाच्या झाडांची पाने दंवाचे थेंब झटकून टाकायची. गवताचा रंग जास्तच हिरवागार दिसू लागायचा आणि त्यावर ओठंगलेल्या धुक्याच्या पडद्यांमुळे त्याला स्फटिकासारखे पारदर्शीपण लाभायचे. सूर्याची किरणे आकाशभर पंख्याप्रमाणे पसरायची आणि आकाशाचा जांभळट रंग बदलून त्याला निळे बनवायची. कुठल्यातरी अदृश्य उंचीवरुन चंडोलाच्या गाण्याचे सूर कानी यायचे. नव्याने जन्मलेल्या दिवसाचे हे सारे ध्वनी आणि रंग माझ्या काळजात दंवाप्रमाणे झिरपत जायचे. माझ्या मनामध्ये मुग्ध आनंद निर्माण करायचे, जीवनासक्ती निर्माण करायचे, सर्व प्राणीमात्रांशी सुसंवादाने राहण्याची इच्छा निर्माण करायचे.

माझ्या सबंध आयुष्यात तो कालखंड सर्वांत जास्त शांततेचा आणि चिंतनाचा होता. त्या उन्हाळ्यात माझ्यामध्ये स्वतःच्या सामर्थ्याच्या भावनेची जोपासना घडली. मी लोकांना टाळू लागलो. ओवस्यान्निकोव कुटुंबामधील मुलांचे आवाज आणि त्यांचा ओरडा ऐकू आला म्हणजे त्यांच्यात जाऊन मिसळण्याची भावना माझ्या मनात पूर्वीप्रमाणे निर्माण होईनाशी झाली.

आणि भाऊ जेव्हा मला भेटायला येत तेव्हा आनंद होण्याऐवजी, माझ्या बागेची ते काहीतरी नासधूस करतील अशी धास्ती मला घेरू लागली. ती बाग म्हणजे माझ्या हातांनी मी बनविलेली पहिली गोष्ट होती.

माझ्या आजोबांची प्रवचनपर लांबलचक भाषणे ऐकण्याचाही मला कंटाळा आला. त्यांची भाषणे अधिकाधिक परखड आणि तक्रारवजा बनू लागली. माझ्या आजीबरोबर ते वारंवार भांडू लागले आणि तिला घराबाहेर काढण्याचा प्रयत्न करू लागले. अशा प्रसंगी ती याकोवमामाकडे किंवा मिखाईलमामाकडे जाऊन बसू लागली. काहीवेळा तर तिथे ती अनेक दिवसपर्यंत रहायची. मग आजोबा आम्हा दोघांसाठी स्वतःच स्वैंपाक करायचे. अन्न शिजवताना त्यांचा आरडाओरडा चालायचा, ते संतापाने शिव्यागाळी करायचे, स्वतःची बोटे भाजून घ्यायचे, बशा फोडायचे. दर दिवसागणिक जास्त जास्त हेकेखोर बनायचे.

जेव्हा बागेतील कोपऱ्यात ते माझ्या भेटीला येत तेव्हा हिरवळीवर ते आरामात बसून रहात आणि एकही शब्द न बोलता मला पहात रहात. मग अचानक विचारीत:

"तू काहीतरी बोलत का नाहीस?"

"मला नाही माहीत."

"आपण काही खाशी माणसं नाही," उपदेशाच्या सुरात ते बोलू लागत. "कुणीही आपल्याला काही शिकवणार नाही. आपलं आपल्यालाच सारं शिकलं पाहिजे. पुस्तकं दुसऱ्या लोकांसाठी लिहिली आहेत, शाळा अशा लोकांसाठी बांधल्या आहेत. पण आपल्यासाठी मात्र नव्हेत. आपल्याला आपणच सारं मिळवलं पाहिजे..."

बोलता बोलता त्यांचा चेहरा शून्यमनस्क होई. ते गप्प आणि निःस्तब्ध बनत. त्यांच्याकडे पहायला मला भीती वाटे.

त्या शरदाच्या मोसमात त्यांनी ते घर विकले. विक्रीपूर्वी, एके दिवशी सकाळी न्याहरीच्या वेळी त्यांनी कष्टी, निश्चयी स्वरात आजीला म्हटले:

"हे बघ, आधीच तुला बरीच वर्षं मी खाऊ घालतोय. पण आता संपलं सारं! आता तुला तुझ्या पोटासाठी स्वतःच धडपडलं पाहिजे."

आजीवर त्यांच्या ह्या घोषणेचा काहीही परिणाम घडलेला दिसला नाही. जणू ते असे काही सांगणार अशी तिची केव्हापासूनची अपेक्षा

असावी ! तिने सावकाशपणे आपली तपकिरीची डबी उचलली, आपल्या गुबगुबीत नाकात तपकीर कोंबली आणि मग ती उत्तरली :

"त्याला काही इलाज नाही. आहे ते साजरं करून घेतलंच पाहिजे."

एका बंद गल्लीच्या टोकाशी असलेल्या एका जुन्या घराच्या तळघरातील दोन अंधाऱ्या खोल्या आजोबांनी भाड्याने घेतल्या. जागा बदलण्याच्या वेळी आजीने एक जुना झाडाच्या सालीपासून बनवलेला लांब दोऱ्यांचा बूट चुलाण्याच्या खाली कोंबला आणि खाली फतकल मारून बसत ती अग्नि-पिशाच्चाला बोलावणे करू लागली :

"ये रे पिशाच्चा, ये रे ये, आत चढून बैस आणि चक्कर मारून दुसऱ्या घरात आम्हाला चांगले दिवस आण..."

बाहेर अंगणात असलेल्या आजोबांनी खिडकीमधून डोकावून आत पाहिले.

"ते बरोबर घेऊन येतेस ना? अग पाखंडे, मी तुला चांगला हिसका दाखवतो! माझी अब्रू काढतेस काय?"

"सांभाळा बरं! असं वागलात तर नक्की अपशकुन घडेल!" आजीने इशारा दिला. पण आजोबा विलक्षण संतापले होते. पिशाच्चाला बरोबर घेऊन जायला त्यांनी मनाई केली.

तीन दिवसपर्यंत आजोबा आपले फर्निचर व इतर वस्तू तातार दलालांना विकत होते. त्यांची सारखी घासाघीस चालत होती, शिव्यागाळी होत होती, तावातावाने सौदेबाजी चालली होती. आजी खिडकीमधून हा सारा प्रकार पहात होती. काहीवेळा ती हसायची, काही वेळा रडायची आणि हळूच म्हणायची :

"जा जा, घ्या सारं... मोडा सारं..."

बागेतील माझे खेळघर सोडून जायच्या कल्पनेने मलाही रडू कोसळत होते.

आमचे बिऱ्हाड हलविताना दोन घोडागाड्या आणल्या होत्या. ज्या गाडीवर मी बसलो होतो ती एवढी हिंदकळत होती, की सामानाच्या ढिगावरून कोणत्याही क्षणी मी रस्त्यावर फेकला गेलो असतो.

आणि असे सतत हादरे बसणाऱ्या परिस्थितीतच मी पुढची दोन वर्षे काढली – माझ्या आईच्या मरणापर्यंत!

आजोबांनी तळघरात बिऱ्हाड हलविल्यानंतर लौकरच माझी आई आम्हाला भेटायला आली. ती फिकट आणि कृश दिसत होती. तिच्या विस्फारल्या डोळ्यांमध्ये एक दुखरी आश्चर्याची जळती चमक होती. प्रत्येक गोष्टीचे ती एकतानतेने अवलोकन करीत होती. जणू आपल्या आई-वडिलांना आणि मला ती पहिल्यांदाच पहात होती! तिने आमच्याकडे पाहिले आणि ती काहीही बोलली नाही. माझे सावत्रवडील खोलीत येरझाऱ्या घालीत होते, खालच्या आवाजात शीळ वाजवीत होते, खाकरून घसा साफ करीत होते आणि पाठीमागे धरलेल्या हातांच्या अंगठ्यांची सारखी चाळवाचाळत करीत होते.

"अग बाई, केवढा मोठा झालास रे!" आपल्या हातांच्या गरम तळव्यांमध्ये माझे गाल धरीत आई म्हणाली. तिने तपकिरी रंगाचा एक भलामोठा, बेढब झगा घातला होता. तिने पोट खूप फुगीर दिसत होते.

"काय रे, तुझं कसं काय चाललंय?" माझ्या सावत्रवडिलांनी हस्तांदोलनासाठी माझ्यापुढे हात धरीत विचारले.

त्यांनी नाकाने हवा हुंगीत म्हटले: "इथं ओल आहे."

ती दोघेही कमालीची थकलेली आणि पुरती विस्कटलेली दिसत होती. जणू जीव घेऊन सतत पळत असावीत आणि शांत पडून चांगली विश्रांती घेण्याव्यतिरिक्त त्या क्षणाला त्यांना दुसरी कोणतीही इच्छा नसावी असे वाटत होते.

आम्ही उदासवाणेपणे चहापान उरकले. खिडक्यांच्या तावदानांवरून ओघळणारे पावसाचे पाणी निरखीत आजोबांनी चहा पिता पिता विचारले:

"तर आगीत तुम्ही सारं काही गमावलंत?"

"अगदी सगळं!" माझे सावत्रवडील खंबीर सुरात म्हणाले. "आम्ही कसाबसा आमचा जीव तेवढा वाचवला."

"हं! आग म्हणजे काही थट्टा नव्हे!"

आई आजीच्या दिशेने झुकली आणि तिच्या कानात काहीतरी पुटपुटली. त्यासरशी झगझगीत प्रकाशात माणसाचे डोळे एकदम किलकिले होतात तसे आजीचे डोळे आकुंचित झाले. वातावरण आणखीच उदास बनले.

एकदम आजोबा तुसडेपणे, मोठ्या आणि शांत आवाजात उद्गारले:

"येवगेनी वसील्येव, माझ्या कानांवर बातम्या आल्या आहेत की

आग-बीग काहीही लागली नव्हती, तर तुम्ही सारं काही पत्त्यांच्या जुगारात गमावून बसलात!"

खोलीत स्मशानशांतता पसरली. फक्त खिडकीवर आदळणारे पावसाचे थेंब आणि समोवारची वाफ त्या शांततेचा भंग करीत होते.

"बाबा..." अखेरीस माझी आई बोलली.

"काय, बाबा काय?" आजोबा गरजले. "आता पुढं काय? तिशीतल्या बाईनं विशीतल्या पोराशी लग्न करणं म्हणजे मूर्खपणा आहे, असं मी तुला बजावलं नव्हतं? आता भोगताय आपल्या कर्माची फळं-होय की नाही? काय चांगला नमुना शोधलास! तुला गरती बाई बनवलं की नाही त्यानं? पोरी, कसा काय वाटला हा अनुभव?"

आणि ते चौघेही एकमेकांवर एकाच वेळी ओरडू लागले. सर्वांत वरची पट्टी होती माझ्या सावत्रबापाची. मी बाहेरच्या दाराशी गेलो आणि बधीर मनाने लाकडांच्या ढिगावर बसून राहिलो. ही माझी आई नव्हतीच मुळी! ही अगदी वेगळी बाई होती. खोलीमध्ये मला याची अंधुक जाणीव झाली होती. पण आता इथे अंधारात बसल्यानंतर मला माझी आई पूर्वी कशी होती ते अगदी ठळकपणे आठवले.

नंतर मी सोर्मावा येथील नव्या घरात कसा गेलो ते काही आठवत नाही. त्या घरातील लाकडी ओंडक्यांच्या भिंती उघडचाबोडक्या होत्या. त्या ओडक्यांमधील फटी तागाच्या दोऱ्यांनी बुजविलेल्या होत्या व त्यांमधून असंख्य झुरळे रहात होती. आई आणि माझे सावत्रवडील रस्त्यालगतच्या दोन खोल्यांमध्ये रहात होते, तर आजी आणि मी स्वैपाकघरात रहात होतो. त्या स्वैपाकघराला एक खिडकी होती आणि त्यातून घराचे छप्पर दिसायचे. त्या छपरापलिकडे गिरण्यांची काळी धुराडी आकाशात वर गेलेली दिसायची. त्यांच्यामधून दाट, काळ्या धुराची वेटोळी भसाभसा बाहेर पडत असायची. हिवाळ्यातील वारे तो धूर सबंध वस्तीभर सैरभैर पसरवून टाकीत. आमच्या थंडगार खोल्यांमधून ह्या धुराचा तेलकट वास सदैव भरून राहिलेला असे. भल्या सकाळीच गिरणीचा भोंगा लांडग्यासारखी कर्कश्य आरोळी ठोकायचा:

"अू ऽऽ ऑ! अू ऽऽऽ ऑ!"

बाकड्यावर उभे राहून वरच्या खिडकीच्या तावदानामधून डोकावले म्हणजे प्रकाशाने उजळलेल्या गिरण्यांच्या फाटकांचे मला ओझरते दर्शन

घडायचे. तोंडात दात नसलेल्या एखाद्या म्हाताऱ्या भिकाऱ्याने आ वासावा तशी ती गिरण्यांची दारे भासत आणि छोटचा माणसांचे कळपच्या कळप ती गिळून टाकीत. दुपारी पुन्हा एकदा भोंगा वाजे. दारांचे काळे ओठ उघडायचे आणि खोल भगदाडामधून गिरणी तीच छोटी माणसे बाहेर ओकून टाकायची. आता त्या माणसांचा चावून चोथा झालेला असायचा. रस्त्यांमधून त्यांचे काळे प्रवाह वाहू लागायचे आणि सुसाट बर्फाळ वारा त्यांना घराघरांमधून आत लोटायचा. आकाश क्वचितच नजरेला पडायचे. त्या कामगारवस्तीच्या छपरांवर आणि काजळीने काळवंडलेल्या बर्फाळ किनाऱ्यांवर काळ्या ढगांचे अवाढव्य छप्पर सदैव ओठंगलेले असायचे. त्याच्या उदास एकसुरीपणामुळे कल्पनाशक्ती खुंटायची आणि डोळ्यांपुढे अंधारी यायची.

सायंकाळी गिरणीवर एक मंद लालसर प्रकाश घोटाळत रहायचा. त्या प्रकाशाने धुराडयांची टोके उजळून निघत. त्यामुळे असे भासायचे की, ती धुराडी जमिनीपासून वर आली नसून त्या भयानक ढगामधून उगवलेली होती, भरपूर आग खाऊन समाधानाने डरॉंव डरॉंव ढेकर देत होती. हेच दृश्य रोजच्या रोज बघणे कमालीचे असह्य होते. माझे अंतःकरण दुखऱ्या दुष्टबुद्धीने ठसठसत होते. आजी घरातील सर्व काम करीत होती. स्वैपाक-पाणी करण्यात, फरशा पुसण्यात, लाकूड फोडण्यात, पाणी वाहून आणण्यात ती सकाळपासून रात्रीपर्यंत गुंतलेली असायची. संध्याकाळी ती थकून कण्हायची. काहीवेळा, संध्याकाळचा स्वैपाक बनविल्यानंतर, ती आपले आखूड दुलईदार जाकीट अंगात चढवायची, आपला लांब घागरा नीट खोचून घ्यायची आणि गावात फिरायला जायची.

"म्हाताऱ्याचं कसं काय चाललंय ते पाहून येते," ती म्हणायची.

"मला घेऊन चल ना!"

"गारठून मरशील! वारं बघ किती सुसाट सुटलंय!" ती मला म्हणायची. बर्फाने झाकून गेलेले रस्ते तुडवीत सात वेर्स्ता अंतर चालून ती गावापर्यंत जायची. गरोदर असलेली, कांती पिवळी पडलेली आणि तोंडाला सूज आलेली माझी आई एक लांब किनारीची फाटकी राखाडी शाल गुंडाळून अंगाची मुटकुळी करून बसून रहायची. त्या शालीचा मला तिटकारा होता. माझ्या आईच्या भव्य, सुंदर देहाला ती शाल बेंगरूळ बनवायची. तिची फाटकी किनार मला मुळीच आवडत नसे. मी ती फाडून

काढायचा. त्या घराचा, त्या गिरणीचा, त्या सबंध वस्तीचा मला तिटकारा आला होता. फाटके नमदी बूट घालून माझी आई खोकत फिरायची. खोकताना तिचे प्रचंड पोट गदगदा हलायचे. तिच्या राखाडी-निळसर डोळ्यांमध्ये कठोर, कोरडा राग पेटायचा किंवा बोडक्या भिंतींना डोळे चिकटविल्याप्रमाणे शून्य नजरेने ती त्यांच्याकडे एकटक पहात बसायची. काहीवेळा ती अखंड तासभर रस्त्याकडे नजर लावून बसायची. तो रस्ता जणू जबड्यासारखा होता. त्यातील काही दात वृद्धापकाळामुळे काळवंडले होते आणि वेडेवाकडे बनले होते, तर काही दात संपूर्ण पडले होते; त्या पडलेल्या दातांच्या जागी बसविलेले बेंगरूळ नवे दात त्या जबड्यात विशोभित वाटत होते.

"आपण इथं का राहतो?" मी आईला विचारले.

"कृपा करून हा प्रश्न विचारू नको," ती उत्तरली.

अलिकडे ती माझ्याशी अगदी कमी बोलायची. फक्त आज्ञा ठोकायची किंवा विनंत्या करायची :

"मला हे आणून दे... ते घेऊन जा... दुकानात पळ...'

खेळायला ती मला क्वचितच बाहेर पाठवीत असे, कारण माझ्या बरोबरीच्या मुलांकडून बेदम मार खाऊनच मी नेहमी घरी परतायचा. मारामाऱ्या करणे एवढाच माझा एक आनंद होता आणि माझ्या मनस्वी स्वभावाला अनुसरून मी दणकून स्वतःला मारामाऱ्यांमध्ये झोकून द्यायचा. त्याबद्दल आई मला पट्ट्याने झोडपून काढायची, पण त्यामुळे चेव येऊन पुढच्या वेळी मी जास्तच जोराने मारामारी करायचा. अर्थातच आई जास्त कडक शिक्षा करायची. एकदा मी तिला दम भरून सांगितले की, जर ती मला असाच मार देत राहिली तर मी तिच्या हाताला चावा घेईन आणि दूर मैदानांमध्ये गोठून मरण्यासाठी पळून जाईन. तिची भीतीने पाचावर धारण बसली आणि मला बाजूला ढकलून ती खोलीत येरझाऱ्या घालू लागली.

"सैतान आहे मेला!" धापा टाकीत ती उद्गारली.

प्रेम नांवाची सजग, कंपायमान इंद्रधनुष्यी भावना माझ्या अंतःकरणामधून हळूहळू विझत गेली. तिच्या जागी प्रत्येकाविषयी आणि प्रत्येक गोष्टीविषयी आत्यंतिक तिरस्काराची भावना घर करू लागली. मी असमाधानाने धुमसू लागलो. ह्या नीरस, मूर्ख जगात आपण एकटे असल्याचा विषाद वळावू लागला.

माझे सावत्रवडील माझ्याशी कडकपणे वागत आणि आईशी अत्यंत कमी बोलत. त्यांना सतत धाप लागायची आणि ते खोकत असायचे. आपले वाकडे दात साफ करीत ' सदानकदा आरशासमोर उभे असत. माझ्या आईशी ते वारंवार भांडण करू लागले. ते अत्यंत थंडपणे आणि दुराव्याने तिच्याशी बोलू लागले व त्याचा मला विलक्षण राग येई. ते काय बोलतात ते मी ऐकू नये म्हणून भांडणाच्या वेळी ते स्वैपाकघराचे दार लावून घेत. पण त्यांच्या घोगऱ्या आवाजातील शब्दनशब्द ऐकायचा मी चंग बांधला होता.

एकदा पाय आपटून ते मोठ्यांदा ओरडले:

"थेरडे, तुझ्या फुगलेल्या पोटापायी या घरात कुणाला बोलावणं मला अशक्य ठरलंय!"

आश्चर्याची आणि संतापाची भावना अनावर होऊन मी फळीवर उडी मारली. वरच्या छताला माझे डोके एवढे जोराने आपटले, की माझी जीभ माझ्याच दातांखाली कचकन चावली गेली.

शनिवारी अनेक कामगार माझ्या सावत्रवडिलांपाशी यायचे आणि कंपनीच्या दुकानात शिधा विकत घेऊ शकणारी कूपने त्यांना विकायचे. कार-खान्यामध्ये त्या कामगारांना मजुरीऐवजी ही कूपने मिळत असत. माझे सावत्रवडील ती कूपने निम्म्या किंमतीला विकत घेत. स्वैपाकघरात टेबलाशी मोठ्या रुबाबात बसून ते कामगाराना भेटत. प्रत्येक कूपन निरखून पहात कपाळाला आठ्या घालीत.

"दीड रूबल."

"येवगेनी वसील्येविच, ख्रिस्ताशपथ..."

"दीड रूबल!"

हे घोटाळ्याचे निराशामय जीवन फार काळ टिकले नाही. आई बाळंत होण्याच्या जरा आधी मला माझ्या आजोबांबरोबर रहायला पाठविण्यात आले. नापोल्नाया चर्चच्या वरच्या बाजूस, कुनाविनोमध्ये पेश्चानाया रस्त्यावरील एका दुमजली घरात त्यांचे बिऱ्हाड होते. त्यांच्या भाड्याने घेतलेल्या छोट्याशा खोलीत भला मोठा रशियन चुलाणा होता आणि अंगणाच्या दिशेला दोन खिडक्या होत्या.

"छान!" किरट्या आवाजात ते हसून म्हणाले. "असं म्हणतात की,

तुमचा सर्वांत चांगला मित्र म्हणजे तुमची आई असते. पण तुझ्या बाबतीत मात्र तुझा म्हातारा सैतान आजोबाच तुझा सगळयात चांगला मित्र ठरलाय! छ्या ऽ! काय माणसं तरी!"

नव्या घरात मी जरासा रूळतो न रूळतो तेवढयात आई आणि आजी नव्या बाळाला घेऊन आली. कामगारांना फसविल्याबद्दल माझ्या सावत्रवडिलांची कारखान्यामधील नोकरी गेली होती, मित्रांच्या मदतीने त्यांना ताबडतोब रेल्वे स्टेशनावर कॅशियरची नवी नोकरी मिळाली होती.

एका दगडी घराच्या तळघरात माझ्या आईबरोबर रहायला माझी पुन्हा पाठवणी होईपर्यंतच्या काळात बराचसा रिकामा वेळ वाहून गेला होता. आईने ताबडतोब मला शाळेत धाडले. अगदी पहिल्याच दिवसापासून शाळेबद्दल माझ्या मनात अढी बसली.

पहिल्या दिवशी मी शाळेत गेलो तेव्हा माझ्या पायात आईचे बूट होते, आजीच्या पोलक्यापासून बनविलेला कोट अंगात होता, पिवळा सदरा मी घातला होता व लांब विजार होती. या अवतारामुळे तात्काळ मी सर्वांच्या थट्टेचा विषय बनलो. माझ्या पिवळया सदऱ्यामुळे मला "चौकटचा एक्का" असे टोपणनांव मिळालो. पोरांशी मी माझे हिशेब सहजपणे चुकते केले. पण पाद्री आणि मास्तर यांना मात्र त्यामुळे मी मुळीच आवडलो नाही.

आमच्या मास्तराना टक्कल होते, त्यांचा चेहरा पिवळट होता आणि त्यांच्या नाकामधून वारंवार रक्त यायचे. वर्गात ते यायचे तेव्हा त्यांच्या दोन्ही नाकपुडयांमध्ये कापसाचे बोळे सरकवलेले असायचे. टेबलाशी बसून ते अनुनासिक आवाजात प्रश्न विचारीत, बोलता बोलता मध्येच थांबून नाकातील कापसाचा बोळा बाहेर ओढून काढत आणि त्याचे बारीक निरीक्षण करून मानेला एक झटका देत. त्यांचा चेहरा चपटा, पितळी रंगाचा आणि दुर्मुखला होता व त्यावरील रेषांमध्ये हिरवट रंगाचा ठसा उमटविला आहे असे भासायचे. त्यांच्या चेहऱ्यामधील सर्वांत हिडीस भाग म्हणजे त्यांचे पिचके डोळे. त्यांच्या एकूण चेहऱ्याला ते डोळे मुळीच शोभत नव्हते. माझ्या चेहऱ्याला ते डोळे सतत गिलावा करताहेत असे वाटायचे आणि माझ्या हाताने माझा गाल पुसण्याची मला भावना व्हायची.

पहिले काही दिवस मी मास्तरांच्या अगदी नाकासमोर, पहिल्याच बाकावर बसत होतो. पण ते अगदी असह्य झाले. माझ्याशिवाय त्यांना

जणू दुसरे कुणी द्विसतच नव्हते. आपल्या गेंगाण्या आवाजात ते म्हणत:

"पेस्को ऽऽ व, तुझा सदरा बदल! पेस्को ऽऽ व, चुळबूळ करू नको! पे ऽ स्को ऽऽ व, पुन्हा तुझ्या बुटांनी फरशीवर डबकं साचवलंय!"

मीसुद्धा अत्यंत वाईट खोडचा करून त्यांची परतफेड केली. एके दिवशी मी एक अर्धवट गोठलेले कलिंगड पैदा केले. ते खरवडून काढून अंधाऱ्या व्हरांड्यात दाराच्या कप्पीवर मी ते टांगून ठेवले. दरवाजा उघडला गेला तेव्हा कलिंगड हवेत वर उंचावले गेले, पण मास्तरांनी दरवाजा बंद करताच ते झटकन खाली आले आणि मास्तरांच्या टकलावर फिट्ट टोपीसारखे बसले. मास्तरांकडून चिठ्ठी घेऊन रात्रीचा वॉचमन मला त्या दिवशी घरापर्यंत सोडायला आला आणि खोडीबद्दल माझी घरात चांगलीच कणीक तिंबली गेली.

दुसऱ्या एका वेळी मी मास्तरांच्या टेबलाच्या कप्प्यात तपकीर शिंपडून ठेवली. त्यांना एवढ्या जोराच्या शिंका येऊ लागल्या, की शेवटी त्यांना वर्ग सोडून जावे लागले आणि स्वतःऐवजी आपल्या जावयाला वर्ग घ्यायला पाठवावे लागले. हा जावई लष्करी अधिकारी होता. त्यानी आम्हाला दोन गाणी सारखी म्हणायला लावली: "परमेश्वर झारचे रक्षण करो" आणि "अहा माझं स्वातंत्र्य, पवित्र स्वातंत्र्य." कुणी बेसुर गायला म्हणजे हातातील दंडुका घेऊन ते अशा रीतीने त्या मुलाच्या डोक्यावर हाणायचे, की त्याचा गंमतीदार आवाज व्हायचा, पण दुखायचे मात्र नाही.

धार्मिक विषय शिकविणारे मास्तर हे तरुण, देखणे, लोकरीसारखे भरपूर मऊ केस असलेले पाद्री होते. "जुन्या आणि नव्या करारांतील पवित्र गोष्टी" ची प्रत माझ्यापाशी नव्हती म्हणून मी त्यांना आवडत नव्हतो. तसेच मी त्यांच्या बोलण्याच्या पद्धतीची नक्कल करायचा म्हणून त्यांना आवडत नव्हतो.

वर्गात येताक्षणी ते म्हणायचे: "पेश्कोव, पुस्तक आणलंस की नाही? हो, पुस्तक!"

"नाही. मी नाही आणलं. हो!"

"'हो' म्हणजे काय?"

"नाही."

"घरी चालायला लाग! हो घरी. तुला शिकवण्याची माझी मुळीच इच्छा नाही. हो, मुळीच इच्छा नाही."

घरी पाठवणी केल्याबद्दल माझा मुळीच आक्षेप नव्हता. शाळा संपायची वेळ होईपर्यंत मी गावातील घाणेरड्या रस्त्यांवरून भटकत रहायचा आणि माझ्या भोवतालच्या गजबजलेल्या आयुष्याचे निरीक्षण करायचा.

पाद्रीबाबांचा चेहरा येशू ख्रिस्तासारखा छान होता. त्यांचे डोळे प्रेमळ आणि बायकी ठेवणीचे होते. त्यांचे छोटे हात ज्या वस्तूंना स्पर्श करीत त्या वस्तूंना ते कुरवाळीत आहेत असे भासायचे. मग ते पुस्तक असो, दंडुका असो किंवा पेन असो. जणू काही ते प्रत्येक वस्तूवर प्रेम करायचे, त्या वस्तूला सजीव मानायचे आणि निष्काळजीपणे ती वस्तू हाताळली तर तिला इजा होईल असे त्यांना वाटत असावे. मुलांबद्दल त्यांना तितकेसे प्रेम वाटत नसे, पण तरीही मुलांना त्यांचा लळा होता.

माझ्या अभ्यासात जरी मला समाधानकारक मार्क मिळत होते तरी माझ्या वर्तणुकीबद्दल मला शाळेतून हाकलून देण्यात येईल, असे लौकरच सांगण्यात आले. त्यामुळे मी अस्वस्थ झालो. त्याचे परिणाम निर्विवादपणे फार वाईट होणार होते. दर दिवसागणिक माझी आई जास्त जास्त चिडकी वागत होती आणि वारंवार मला झोडपून काढत होती.

पण शाळेतून हकालपट्टी होण्याच्या संकटामधून मी वाचलो. अगदी अनपेक्षितपणे बिशप ख्रिसान्फ* आमच्या शाळेला भेट द्यायला आले. त्यांना कुबड होते असे मला अजून आठवते.

घोळदार काळ्या अंगरख्यामधील हा छोटा माणूस वर्गात प्रवेशला आणि टेबलापाशी त्याने आपली जागा घेतली तेव्हा जिव्हाळ्याचे आणि उल्हासाचे अपरिचित असे वातावरण वर्गात पसरले.

"माझ्या बाळांनो, आपण थोड्या गप्पा मारू या," आपल्या प्रचंड घोळदार बाह्यांमधून हात बाहेर काढीत बिशप म्हणाले.

टेबलाशी मला बोलावण्याची पाळी सर्वांत शेवटी आली.

---

*बिशप ख्रिसान्फ हे "प्राचीन जगातील धर्म" ह्या तीन खंडांच्या पुस्तकाचे लेखक होते. तसेच "ईजिप्शिअन पुनर्जन्म" आणि "स्त्री व विवाह" ह्या लेखांचे लेखक होते. पैकी "स्त्री व विवाह" ह्या लेखाचा तारुण्यात माझ्यावर खूप परिणाम झाला होता. या लेखाचे शीर्षक मी कदाचित बरोबर नमूद केलेले नाही. पण १८७० नंतरच्या काळात, कुठल्यातरी धार्मिक मासिकात ते प्रसिद्ध झाले होते. – **लेखकाची टिप.**

"तुझं वय किती?" त्यांनी मला विचारले. "खरंच? बाप रे, वयाच्या मानानं चांगलाच उंच आहेस की! बाहेर पावसात बराच उभा राहिलास वाटतं?"

टोकदार, लांब नखे असलेला आपला बारकुळा एक हात त्यांनी टेबलावर ठेवला होता आणि माझ्याकडे प्रेमळ नजरेने टक लावून पाहताना दुसऱ्या हाताने ते आपली तुरळक दाढी कुरवाळीत होते.

"आता तुला आवडणारी पवित्र इतिहासातली एखादी गोष्ट सांग पाहू."

माझ्यापाशी पुस्तक नसल्यामुळे पवित्र इतिहासाचा मला अभ्यास करता आला नाही, असे मी त्यांना सांगितले तेव्हा त्यांनी आपल्या डोक्यावरची टोपी सरळ करीत म्हटले:

"पण असं कसं? तुला ह्या गोष्टी शिकल्याच पाहिजेत. अच्छा, पुस्तकाशिवाय तुला काही गोष्टी माहीत असतीलच्च की! कुठंतरी गोष्टी ऐकल्या आहेस? जुन्या करारातल्या स्तोत्रांचं पुस्तक ठाऊक आहे? छान! आणि प्रार्थना येतात? शाबास! आणि काही संतांची चरित्रं माहीत आहेत? श्लोकांमध्ये? अरेच्चा! तू तर चांगला पंडित दिसतोस!"

लालबुंद चेहरा करून धापा टाकीत आमचे पाद्रीबाबा आत आले. बिशपचा आशीर्वाद घेतल्यानंतर पाद्रीबाबा त्यांना माझ्याबद्दल सांगू लागले.

"जरा थांबा!" खुणेनेच बिशपनी त्यांना अडवले. मग माझ्याकडे पुन्हा वळून ते म्हणाले: "बरं, तर मग तू आम्हाला देवमाणूस अलेक्सेईबद्दल सांगतोस..."

श्लोक म्हणता म्हणता एक ओळ आठवेना म्हणून मी थांबलो तेव्हा ते म्हणाले: "बाळा, किती छान श्लोक आहेत नाही? तुला आणखी काय माहीत आहे? डेव्हिड राजाची गोष्ट येते? छान. मला ऐकायला खूप आवडेल!"

त्यांना माझ्या तोंडून गोष्ट ऐकायला आवडत होते, त्यांना श्लोकांचा नाद होता हे मला जाणवत होते. त्यांनी बराच वेळपर्यंत मला श्लोक म्हणू दिले आणि नंतर थांबविले.

"स्तोत्रांच्या पुस्तकातून तू मुळाक्षरं शिकलास का? तुला कुणी शिकवलं? तुझ्या छान छान आजोबांनी? तुझ्या वाईट्ट आजोबांनी! छे: छे:! त्यांना तू काही मनापासून वाईट म्हणत नाहीस! बरं, इथली माणसं मला सांगतात की, तू नेहमी काहीतरी खोड्या करतोस!"

मी लाजलो, पण माझी चूक मी कबूल केली. मास्तरांनी आणि पाद्रीबाबांनी पाल्हाळ लावून माझे गुन्हे सिद्ध केले. खालच्या नजरेने बिशप ऐकत होते.

"ऐकलंस, तुझ्याबद्दल ही माणसं काय म्हणतात?" अखेरीस सुस्कारा टाकून ते म्हणाले. "इकडं ये."

निलगिरीचा वास येणारा हात माझ्या डोक्यावर ठेवीत ते म्हणाले:

"तुला एवढ्या खोड्या का कराव्याशा वाटतात?"

"शाळा कंटाळवाणी वाटते."

"कंटाळवाणी? मुला, इथं काहीतरी गफलत वाटते. जर तुला शाळा कंटाळवाणी वाटत असेल, तर तू वाईट विद्यार्थी बनला असतास, पण तुझे मार्क तर दाखवतात की, तसा तू नाहीस. तेव्हा दुसरंच काही कारण असलं पाहिजे."

आपल्या झग्यामधून त्यांनी एक छोटी टिपणवही काढली आणि लिहिले:

"पेश्कोव, अलेक्सेई. हं! मुला, तुझा खोडसाळपणा बंद केलास तर बरं होईल. थोडं खोडकर वागायला हरकत नाही, पण लोकांना असं वागणं फार सहन होत नाही. काय रे मुलांनो, माझं बरोबर आहे की नाही?"

"तुमचं बरोबर आहे!" सर्वांचे उत्साही आवाज एकसुरात उमटले.

"आणि तुम्ही कसे वागता रे? मला वाटतं, अगदी थोड्या खोड्या करता ना?"

"मुळीच नाही. खू ऽऽ प!" मुले हसून म्हणाली.

बिशपनी मला जवळ ओढून घेतले आणि खुर्चीवर मागे टेकून बसता बसता चकित सुरात ते म्हणाले:

"तुला कल्पना आहे–तुझ्या वयात मीसुद्धा खूप खोडसाळ होतो. आपण सारे असं कशामुळं वागतो?"

त्यांच्या ह्या बोलण्यावर मास्तरांना आणि पाद्रीबाबांनासुद्धा हसू आले.

मुले खूप खदखदून हसली. बिशपनी त्यांना प्रश्न विचारले. मुलांना त्यांच्याच शब्दांमध्ये ते चतुराईने पकडत. त्यामुळे वर्गातील वातावरण अधिकाधिक आनंदी होऊ लागले. सरतेशेवटी उठत ते म्हणाले:

"डांबरटांनो, तुमचा निरोप घ्यायला मला वाईट वाटतं. पण मला आता निघायला हवं!"

आपल्या रुंद बाहीला मागे झटका देऊन त्यांनी हात वर केला आणि वर्गावर क्रूस चिन्ह केले.

"तुम्हा सर्वांचे कल्याण होवो. नमस्ते."

"नमस्ते! लौकर परत या!" मुले ओरडली.

"येईन, नक्की परत येईन," डोक्यावरची कुंची डोलवीत ते उत्तरले. "मी तुमच्यासाठी काही पुस्तकं घेऊन येईन." नंतर मास्तरांकडे वळून ते म्हणाले: "आता मुलांना घरी जाऊं दे."

व्हरांड्यात बिशपनी मला थांबविले आणि हळू आवाजात ते म्हणाले:

"यापुढं असा खोड्याळपणा करणार नाहीस असं मला वचन देतोस? अर्थात असा तू का वागतोस ते मला समजतं. बराय, चलतो."

त्यांच्या ह्या वागण्याने मी खूप गलबलून गेलो. एक विशिष्ट भावना माझ्या छातीत दाटून आली. त्यामुळे, वर्ग संपल्यानंतरसुद्धा जेव्हा मास्तरनी मला अडवून ठेवले आणि यापुढे मी गरीब कोकरासारखे कसे वागले पाहिजे यावर एक व्याख्यान झोडले, तेसुद्धा मी लक्षपूर्वक आणि आनंदाने ऐकले.

पाद्रीबाबा कोट अंगात चढविता चढविता प्रेमळ सुरात म्हणाले:

"यापुढं तू माझ्या धड्यांना बसत जा! हो, तुला बसलंच पाहिजे. मात्र शांत बसायचं! हो, शांत!"

शाळेत परिस्थिती सुधारली, पण घरात मात्र एक वाईट घटना घडली. मी आईचा एक रूबल चोरला. हा गुन्हा आधी ठरवून घडला नव्हता. एके संध्याकाळी, छोट्या बाळाला माझ्यापाशी ठेवून आई कुठेतरी बाहेर गेली होती. काहीतरी चाळा म्हणून मी माझ्या सावत्रवडिलांचे एक पुस्तक हातात घेतले. अलेक्सांदर "डॉक्टरची टिपणे" नांवाचे ते पुस्तक होते. त्या पुस्तकाच्या पानांमध्ये मला दहा रूबलची एक नोट आणि एक रूबलची एक नोट सापडली. ते पुस्तक मला वाचायला खूप अवघड होते म्हणून मी मिटून ठेवले. पण डोक्यात एकदम एक कल्पना चमकली: एक रूबलमध्ये मला 'पवित्र इतिहास' विकत घेता आला असता आणि 'रॉबिन्सन क्रूसो' हे पुस्तकही घेता आले असते. असे एक पुस्तक बाजारात आल्याचे मला नुकतेच समजले होते. एका कडक थंडीच्या दिवशी, मधल्या सुटीच्या वेळात मी मुलांना एक परीकथा सांगत होतो. अचानक त्यांच्यातला एक तुच्छतेने म्हणाला:

"परीकथांमध्ये काही दम नाही! आता 'रॉबिन्सन क्रूसो' ही खरी गोष्ट!"

आणखीही काही मुलांनी 'रॉबिन्सन क्रूसो' वाचले होते. त्यांनीही त्या पुस्तकाची स्तुती केली. आजीच्या गोष्टीला त्या मुलांनी फडतूस म्हणावे याचा मला राग आला होता. तेव्हा 'रॉबिन्सन क्रूसो' पैदा करून वाचायचे आणि ते वाईट आहे असे सिद्ध करायचे, असा मी निर्धार केला.

दुसऱ्या दिवशी मी शाळेत गेलो तेव्हा माझ्यापाशी 'पवित्र इतिहास' होता, अँडरसनच्या परीकथांचे पानांची टोके मुडपलेले दोन जुने खंड होते, तीन पौंड पांढरा पाव होता आणि एक पौंड सॉसेजेस होती. व्लादीमिर चर्चच्या शेजारच्या कोपऱ्यावरील एका अंधाऱ्या छोट्या पुस्तकाच्या दुकानात मला 'रॉबिन्सन क्रूसो' सापडले. पिवळ्या बांधणीतले ते अगदी पातळ पुस्तक होते. मुखपृष्ठावर एका दाढीवाल्या पुरुषाचे चित्र होते. त्याच्या डोक्यावर केसाळ टोपी होती आणि खांद्यावर वाघाचे कातडे होते. ते पुस्तक मला मुळीच आकर्षक वाटले नाही. याउलट परीकथांची जीर्ण बांधणीची पुस्तके मला कमालीची वेधक वाटली.

मोठ्या सुटीत मी माझ्याजवळचा पाव आणि सॉसेजेस मुलांना वाटली व 'बुलबुल' ही गोष्ट आम्ही वाचू लागलो. अगदी पहिल्या पानापासूनच त्या गोष्टीने आमच्या काळजाची पकड घेतली.

"चीनमध्ये सर्व माणसे चिनी आहेत आणि सम्राटसुद्धा चिनी आहे."

हे वाक्य मला खूप खूप आवडले होते याची मला अजूनही आठवण आहे. त्याच्यातील नर्मविनोद, त्याच्यातील हसरे संगीत आणि काहीतरी आणखी खूप छान असे मला फार आवडले होते.

शाळेत 'बुलबुल' वाचून पूर्ण करायला मला वेळ पुरला नव्हता. घरी आलो तेव्हा माझी आई अंड्यांची पोळी तळत होती. तीक्ष्ण स्वरात तिने मला विचारले:

"तू रूबल घेतलास?"

"होय. ही बघ त्याची पुस्तकं आणली..."

त्या दांडीच्या गरम तव्याने तिने मला बदडून काढले आणि परीकथांची पुस्तके कुठेतरी नेऊन दडवून ठेवली. मारापेक्षा ही शिक्षा मला जास्त वेदनादायी वाटली.

अनेक दिवसपर्यंत मी शाळेला गेलो नाही. दरम्यान मी काय केले होते ते माझ्या सावत्रवडिलांनी कामावरच्या लोकांना सांगितले होते व त्या लोकांनी आपल्या मुलांना ती हकीकत सांगितली होती. मुलांनी ती गोष्ट शाळेत सांगितली होती आणि जेव्हा मी शाळेत गेलो तेव्हा 'चोर' ह्या टोपणनांवाने माझे स्वागत झाले. हे नांव अगदी छोटे आणि स्पष्ट होते – पण अन्यायकारक होते. मी रूबल घेतला होता ही गोष्ट लपविली नव्हती, पण हे समजावून सांगण्याचा मी प्रयत्न केला त्यावर कुणाचा विश्वासच बसेना. तेव्हा मी घरी आलो आणि आईला स्पष्ट बजावले की, मी पुन्हा कधीही शाळेत जाणार नाही.

माझा भाऊ साशा ह्याला खिडकीशी बसून ती भरवीत होती. पुन्हा एकदा ती गरोदर होती. आपला काळवंडलेला चेहरा माझ्याकडे वळवून तिने भकास, त्रासिक नजरेने पाहिले. मासा तोंड उघडतो तशी तोंडाची हालचाल करीत हळू आवाजात ती म्हणाली:

"तू खोटं बोलतोस. तू रूबल घेतला होतास ही गोष्ट कुणीही ऐकली असणं शक्य नाही."

"जाऊन स्वतःच विचार त्यांना!"

"तूच त्यांना सांगितलं असलं पाहिजे. खरं सांग – तूच सांगितलंस ना मुलांना? खोटं बोलू नको – कुणी सांगितलं ते समजून घ्यायला मीच उद्या शाळेत जाते!"

मी त्या मुलाचे नांव सांगितले. तिचा चेहरा एकदम आक्रसला आणि तिच्या डोळ्यामधून आसवे वाहू लागली.

मी स्वैपाकघरात गेलो आणि चुलाण्यामागे असलेल्या माझ्या पलंगावर जाऊन पडलो. काही जुनी खोकी घेऊन त्यांच्यापासून तो बनविला होता. शेजारच्या खोलीतले आईचे हुंदके मला ऐकू येत होते.

"देवा रे देवा..." ती पुटपुटत होती.

ऊबदार, मेणचट कपड्यांचा वास मला असह्य झाला आणि मी बाहेर आवारात गेलो.

"कुठं चाललास?" आईने हाक मारली. "इथं माझ्यापाशी ये!"

आम्ही दोघे खाली बसलो होतो. साशा आईच्या मांडीवर होता आणि तिच्या पोलक्याची बटणे खेचत बोबडे बोलत होता.

मी आईला लगटून बसलो. तिने माझ्याभोवती हाताचा विळखा घातला.

"आपण खूप गरीब आहोत," ती म्हणाली. "प्रत्येक कामात आपल्याला..."

आपल्या गरम हातांनी तिने मला आवळले. तिला जे काही म्हणायचे होते ते ती पुरते बोलू शकली नाही.

"पशू आहे अगदी, पशू!" एकदम उसळून ती उद्गारली. हाच शब्द पूर्वी एकदा तिने उच्चारलेला मी ऐकला होता.

तिच्या बोलण्याची साशाने बोबडी नक्कल केली.

साशा म्हणजे फार चमत्कारिक बाळ होता. त्याचे डोके खूप मोठे होते. त्याच्या हसऱ्या निळ्या डोळ्यांमध्ये सदैव कसलीतरी अपेक्षा उमटलेली असायची. फार लौकरच्या वयात तो बोलायला लागला. तो कधीही रडायचा नाही. नेहमी आनंदात, मजेत असायचा. तो इतका अशक्त होता, की त्याला धड रांगायलासुद्धा यायचे नाही. पण मला पाहताच त्याला खूप आनंद होई. आपले छोटे हात पसरून माझ्या कानांशी इवल्या इवल्या बोटांनी तो खेळायचा. कसा कुणास ठाऊक, पण त्याच्या बोटांना जांभळ्या फुलांचा वास यायचा. अजिबात आजारी न पडता अचानक तो वारला. सकाळी तो नेहमीसारखा मजेत होता आणि संध्याकाळी प्रार्थनेसाठी चर्चच्या घंटा वाजत होत्या त्यावेळी त्याचे प्रेत टेबलावर ठेवलेले होते. दुसरे बाळ – निकोलाई – जन्माला आल्यानंतर लौकरच्याच काळात ही घटना घडली.

शाळेत निर्माण झालेला गोंधळ निपटून काढायचे वचन आईने पाळले होते आणि पुन्हा एकदा माझा अभ्यास सुरळीत चालू झाला होता. पण दुसऱ्या एका कारणामुळे मला पुन्हा आजोबांपाशी रहायला जावे लागले. त्याचे असे झाले:

एके दिवशी चहाच्या वेळी मी अंगणातून स्वैपाकघरात प्रवेशत होतो तेव्हा आईचे जिवाच्या आकांताचे ओरडणे माझ्या कानांवर पडले:

"येवगेनी, येवगेनी, जाऊ नको. मी तुझ्या पाया पडते!"

"मूर्खपणा आहे सगळा..." माझे सावत्रवडील खेकसले.

"मला ठाऊक आहे, तू तिच्याकडं जातोस!"

"मग? काय म्हणणं आहे?"

काही मिनिटेपर्यंत दोघेही गप्प राहिली. नंतर खोकल्याची उबळ दाबत आई म्हणाली:

"किती दुष्ट आणि हलकट पशू आहेस तू!"

त्यांनी तिला मारलेले मी ऐकले. मी खोलीत धावत गेलो. ती गुडघ्यावर खाली बसली होती, खुर्चीला तिने पाठ आणि हाताचे कोपरे टेकवले होते, तिने डोके मागे टेकले होते, तिच्या डोळ्यात विचित्र चमक होती. तर माझा सावत्रबाप तिच्यासमोर अगदी नव्या कोऱ्या सुटात चकचकीत उभा होता व आपल्या लांब पायाने तिच्या छातीवर लाथा मारीत होता. मी चटकन चांदीच्या मुठीची पाव कापायची सुरी उचलली. माझ्या आईपाशी माझ्या वडिलांची तेवढी एकच वस्तू उरली होती. सारी शक्ती पणाला लावून मी ती सुरी माझ्या सावत्रबापाच्या बगलेच्या दिशेने फेकली.

सुदैवाने माझ्या आईला माझ्या सावत्रबापाला दूर ढकलायला सवड मिळाली त्यामुळे सुरीने केवळ त्याचा कोट फाटला आणि शरीराला नुसती चाटून गेली. कूस पकडून त्याने एक आरोळी ठोकली व तो खोलीच्या बाहेर पळाला. आईने किंचाळून मला धरले आणि फरशीवर भिरकावले. आवारातून माझा सावत्रबाप परत आला तेव्हा त्याने माझ्या आईला माझ्यापासून दूर खेचले.

एवढे सारे घडूनही माझा सावत्रबाप जिकडे जायचे होते तिकडे निघून गेला. त्या दिवशी संध्याकाळी खूप उशीरा आई माझ्यापाशी आली. चुलाण्याच्या मागे मी माझ्या बिछान्यावर पडलो होतो. तिने हळूच मला मिठी घालून माझे चुंबन घेतले.

"लाडक्या, मला माफ कर. आज मी तुझ्याशी बरोबर वागले नाही. पण असा कसा वागलास तू? सुरी मारायची?"

माझ्या सावत्रबापाला मी ठार मारीन आणि स्वतःलाही मारून टाकीन, अशी मी शपथ घेतली. माझ्या शब्दांचा अर्थ मला चांगला कळत होता. आणि तसे मी नक्की वागलो असतो. निदानपक्षी तसा मी प्रयत्न केला असता. तो तिरस्करणीय पाय अजूनही माझ्या नजरेसमोर येतो. विजारीच्या टोकाला चकचकीत विणलेली किनार असलेला तो पाय निर्दयपणे स्त्रीच्या वक्षःस्थळावर आदळताना मला दिसत राहतो.

काहीवेळा जेव्हा त्या रानटी रशियन जीवनामधील घाणेरड्या सवयींची मला आठवण येते, तेव्हा त्यांच्यावर विचार करण्याची गरज आहे का, असा प्रश्न मला स्वतःला पडतो. पण अधिक विचार केल्यानंतर माझी

खात्री पटली, की त्या गोष्टी उजेडात आणल्या पाहिजेत. कारण त्या दुष्ट, चिवट अशा सत्य गोष्टी आहेत आणि आजही त्यांचे संपूर्ण निर्मूलन झालेले नाही. त्या सत्य घटना मुळापासून चव्हाटयावर मांडल्या पाहिजेत. आमच्या घाणेरडया आणि लाजिरवाण्या जीवनाचे संपूर्ण उच्चाटन केले पाहिजे. माणसाच्या काळजापासून आणि स्मृतीपासून त्या खेचून तोडून टाकल्या पाहिजेत.

अशा भयानक गोष्टींचे वर्णनं मी का करतो याचे अधिक विधायक कारण माझ्यापाशी आहे. त्या गोष्टी तिरस्करणीय असल्या हे खरे असले तरी आणि त्या गोष्टी नसत्या तर एरवी माणसांचे स्वभाव कितीतरी चांगले बनले असते हे खरे असले तरी, रशियन माणूस हा मूळचा मनाने [illegible] आहे आणि हित करणारा आहे. तेव्हा वाईट गोष्टींचा तो नक्की नाश [illegible]

आमचे जीवन आश्चर्यकारक आहे. त्यात केवळ पाशवीपणाचा [illegible] अमाप साचला आहे म्हणून नव्हे, तर त्या गाळाखाली तेजस्वी [illegible] सृजनशील शक्तीही चमकत आहेत. चांगल्याचा प्रभाव वाढतो आहे [illegible] अशी खात्री पटते [illegible] की, आमच्या लोकांमध्ये सरतेशेवटी सौंदर्याने [illegible] तेजस्वी मानवतेने [illegible] भरलेल्या जीवनाची जाग येते आहे.

## १३

पुन्हा एकदा मी माझ्या आजोबांबरोबर राहू लागलो [illegible]

"अरे डामरटा, आलास का!" मला पाहताच टेबलावर [illegible] टिचक्या मारीत ते उद्गारले. "आता मी काही तुला खायला [illegible] नाही. ती जबाबदारी यापुढं तुझ्या आजीची!"

"ते मी घेईन बघून," आजी म्हणाली. "एवढयाशा पोराला [illegible] काय अवघड आहे?"

"सोपं आहे ना? मग पोस त्याला!" ते मोठयांदा ओरडले. पण नंतर थोडया शांत आवाजात त्यांनी मला समजावून सांगितले: "आता आम्ही सर्व गोष्टी वेगवेगळया करतो. प्रत्येकजण आपापलं पाहतो."

खिडकीपाशी बसून आजी लेस विणत होती. पितळी पिनांनी चकाकणाऱ्या उशीवर तिच्या रीळांचा टणत्कार मोठा गंमतीदार होत होता.

वसंतामधील ऊन्हात ती उशी एखाद्या सोनेरी साळिंदरासारखी दिसत होती. खुद्द आजी ब्राँझच्या मुशीतून काढल्यासारखी दिसत होती. तिच्यात काहीही फरक पडला नव्हता. मात्र आजोबा जास्त बारकुळे झाले होते आणि त्यांच्या चेहऱ्यावर जास्त सुरकुत्या पडल्या होत्या. त्यांचे डोक्यावरचे केस विरळ झाले होते आणि त्यांच्या हालचालींमधील धीरगंभीर डौलदारपणा जाऊन त्या ऐवजी धांदरटपणा आला होता. त्यांचे हिरवे डोळे प्रत्येक गोष्टीकडे संशयाने पहात होते. आजीने हसत हसत तिच्यामध्ये आणि आजोबांमध्ये झालेल्या मालमत्तेच्या वाटणीची हकीकत सांगितली. त्यांनी तिला सर्व भांडी, काचसामान, बशा दिल्या होत्या व म्हणाले होते:

"हे सारं तुझं आणि यापेक्षा जास्त काही माझ्याकडं मागू नको!"

मग त्यांनी तिच्या सर्व जुन्या कपड्यांना आणि वस्तूंना स्वतःच्या ताब्यात घेतले होते. त्यात कोल्ह्याच्या कातड्याचा कोट होता. तिचे सारे सामान त्यांनी सातशे रूबलना विकले होते आणि आपल्या धर्मपुत्राला व्याजाने उसने पैसे दिले होते. त्यांचा धर्मपुत्र हा धर्मांतर केलेला यहुदी होता व तो फळांचा व्यापार करीत असे. आजोबा कमालीचे लोभी बनले होते. लोभीपणाच्या बाबतीत त्यांनी आपली सारी लाजलज्जा गुंडाळून ठेवली होती. पूर्वी त्यांनी ज्यांच्याबरोबर काम केले होते अशा श्रीमंत व्यापाऱ्यांना आणि कारागीरांना ते भेटायला जात. आपल्या मुलांनी आपल्याला बुडविले असे सांगून त्यांच्यापाशी पैसे मागत. आजोबांच्या पूर्वीच्या प्रतिष्ठेला मान देऊन ती माणसे त्यांना उदारपणे मदत करीत. आजोबा घरी येत आणि भल्या मोठ्या रकमेची नोट आजीच्या नाकासमोर नाचवीत एखाद्या शाळकरी मुलाप्रमाणे फुशारकी मारीत.

"पाहिलंस का मूर्ख म्हातारे? याच्या दशांशानं तुला कुणी पैसे देणार नाही!"

आजोबांनी एका नव्याने ओळख झालेल्या माणसाला व्याजाने पैसे दिले होते. हा माणूस उंच, टकल्या होता. केसाळ कातड्यांचा तो व्यापार करायचा. "चाबूक" असे त्याचे टोपणनांव होते. त्याची बहीण जाडजूड, लालबुंद गाल आणि काळे डोळे असलेली दुकानदारीण होती. अगदी काकवी-सारखे तिचे बोलणे-वागणे गोड आणि चिकट होते.

घरात प्रत्येक गोष्टीची विभागणी झालेली होती: आज आजीच्या

पैशाने आणलेल्या वस्तूंपासून जेवण बनायचे, तर उद्या आजोबा पाव आणि खाद्यपदार्थ विकत आणायचे. त्यांची पाळी असे त्या दिवशी जेवण अगदी भिकार असायचे. आजी चांगले मांस विकत आणायची, तर आजोबा फुफ्फुसे आणि आतडी आणायचे. प्रत्येकजणाने चहा आणि साखरेचा आपापला साठा ठेवला होता. पण चहा मात्र एकाच भांड्यात उकळत असत. मग आजोबा सावध सुरात आजीला म्हणायचे:

"जरा थांब – तू किती चहा घातलास ते आधी मला पाहू दे!"

चहाची पाने आपल्या तळहातावर पसरून त्यांची संख्या ते मोजीत.

"तुझ्या चहापेक्षा माझा चहा जास्त जाड आहे. त्यामुळं त्याचा अर्क चांगला निघतो. म्हणून तुला आणखी चहा घातला पाहिजे," ते आजीला म्हणत

आजी स्वतःसारखाच चहा आपल्याला ओतते किंवा नाही याची [illegible] बारकाईने पाहणी करीत. ती दोघेही सारख्याच संख्येने चहाचे प्या[illegible]

"शेवटचा प्याला घेणार?" किटलीतील चहाचे पाणी ओ[illegible] आजी विचारायची.

आजोबा चहाच्या किटलीत डोकावून पहात म्हणायचे: "[illegible] दोघांनाही शेवटचा प्याला घेता येईल असं वाटतं."

पुतळीसमोरच्या दिव्यासाठी तेलसुद्धा ती आळीपाळीने आणीत. [illegible] वर्षे एकत्र आयुष्य घालविल्यानंतर हे वागणे अगदी विचित्र होते!

आजोबांचे हे असे वागणे मला गंमतीचे वाटायचे, तसा त्यांचा ति[illegible] यायचा. आजीला मात्र ही सारी गंमतच वाटायची.

"विसरून जा रे!" ती मला म्हणायची. "त्याचं काय एवढं विशेष? ते आता म्हातारे झालेत, म्हणून असं तऱ्हेवाईक वागतात. चार विसा वय झालं! वर्षं तरी किती झाली बघ! वागले तऱ्हेवाईक तरी कुणाला दुखवीत नाहीत. आता तुझ्या-माझ्यापुरता भाकरतुकडा मी नेहमीच मिळवीन याची खात्री बाळग."

मीसुद्धा पैसे मिळवू लागलो होतो. रविवारी भल्या सकाळीच मी एक पोते घ्यायचा आणि रस्त्यांवर व आवारांमध्ये भटकून जुनी हाडे, चिंध्या, खिळे, कागद इ. वस्तू गोळा करायचा. भंगार खरेदी करणारा माणूस एक पूड चिंध्या किंवा कागद किंवा धातूला वीस कोपेक आम्हाला द्यायचा.

एक पूड हाडांसाठी आठ किंवा दहा कोपेक द्यायचा. आठवडाभराच्या दरम्यान, शाळा सुटल्यानंतरही मी ह्या वस्तू गोळा करायचा आणि त्यापासून दर शनिवारी तीस ते पन्नास कोपेकपर्यंत माझी कमाई व्हायची – त्या आठवड्यात नशीब जोरावर असेल तर याहून जास्त पैसेही मिळत. आजी माझे पैसे घ्यायची आणि आपल्या सदऱ्याच्या खिशात घाईघाईने ठेवीत नजर झुकवून माझे कौतुक करीत म्हणायची :

"गुणाचा रे तू माझा सोन्या! तू आणि मी कधी उपाशी राहणार नाही. होय की नाही?"

मी दिलेल्या पाच कोपेकच्या नाण्याकडे टक लावून मुळूमुळू रडत असलेली एक दिवस ती माझ्या दृष्टीस पडली. तिच्या गुबगुबीत नाकाच्या टोकाशी एक चमकदार अश्रू लोंबत होता.

पण मला असे आढळले की, हा असला कचरा गोळा करून विकण्यापेक्षा ओका नदीच्या किनाऱ्यावरच्या लाकडाच्या वखारींमधून फळ्या चोरणे जास्त किफायतशीर होते. किंवा जवळच असलेल्या वाळूच्या बेटावरूनही लाकडी फळ्या चोरता येत. त्या बेटावर दरसाल जत्रेत धातूसामानाचा व्यापार चाले व त्यासाठी तात्पुरती दुकाने उभारलेली असत. जत्रा संपल्यानंतर दुकाने मोडून त्याच्या फळ्या वाळूच्या बेटावर साठवून ठेवीत. वसंतामध्ये नदीला पूर येईपर्यंत ते लाकूड तेथेच पडून रहात असे. चांगल्या फळकुटाला घरमालक आम्हाला दहा कोपेक देत आणि एका दिवसाच्या दरम्यान आम्ही दोन किंवा तीन फळ्या चोरू शकत असू. मात्र हा चोरीचा उद्योग धुके अथवा पाऊस पडत असेल अशा दिवशी उरकावा लागे. कारण त्यावेळी राखणदार घरात बसून रहात.

हा उद्योग करणारे आम्हा पोरांचे टोळके फार छान होते. सान्का व्याखीर हा एका मोर्दोवियन भिकारणीचा दहा वर्षांचा मुलगा होता. त्याला 'कबूतर' ह्या नांवाने सारे ओळखत. त्याचा स्वभाव प्रेमळ होता, आणि तो नेहमी शांत, आनंदी असे. कस्त्रोमा हा अनाथ मुलगा अगदी हडकुळा आणि उतावळ्या स्वभावाचा होता. त्याचे डोळे काळेभोर टपोरे होते. पुढे वयाच्या तेराव्या वर्षी त्याने रिमांड होममध्ये गळफास लावून आत्महत्या केली. कबूतरांची जोडी चोरल्याबद्दल त्याला अटक करून रिमांड होममध्ये ठेवले होते. शिवाय तातार खाबी होता; बारा वर्षांचा हा पहिलवान

कमालीचा ताकदवान होता, पण त्याचा स्वभाव मात्र साधा, उदार होता. आठ वर्षांचा, चपट्या नाकाचा याझ हा स्मशानात खड्डे खणणाऱ्या आणि राखण करणाऱ्या माणसाचा मुलगा होता. तो माशाप्रमाणे चूपचाप वागायचा आणि त्याला "काळ्या आजाराची" बाधा होती. आणि आम्हा सर्वांत वयाने मोठा होता ग्रिश्का चूर्का. एका विधवा शिंपीणीचा हा मुलगा फार न्यायी आणि विचारी माणूस होता. गुद्दागुद्दी करण्यात तो तरबेज होता. आम्ही सारे एकाच गल्लीत रहात होतो.

चोरी करणे हा आमच्या वस्तीत गुन्हा मानला जात नसे. बहुतेक अर्धपोटी किरकोळ व्यापाऱ्यांचे ते नेहमीचे आणि जवळ जवळ एकमेव उदर-निर्वाहाचे साधन होते. दरसाल होणाऱ्या दीड महिन्याच्या जत्रेतील कमाईवर त्यांना सबंध वर्षभर जगता येणे अशक्य होते. म्हणून अनेक प्रतिष्ठित घरवाले "नदीवर पैसे करीत." म्हणजे भरतीबरोबर वाहून आलेले ओंडके आणि फळ्या एकत्र करून तात्पुरत्या बांधलेल्या तराफ्यांवर ते लोक त्या लाकडांच्या मोळ्या बांधीत. पण जास्त करून ते चोऱ्याच करीत. ओका आणि वोल्गा नद्यांच्या किनाऱ्यांवर त्यांच्या "वाटमाऱ्या" चालत. पडाव, मालवाहू जहाजे यांच्यावर चोऱ्या करीत, किनारपट्टीवर डल्ले मारीत. रविवारच्या दिवशी मोठी माणसे आपल्या करामती फुशारकीने सांगत आणि मुले त्यांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकून त्यापासून चोरीची विद्या शिकत.

वसंताच्या मोसमात जत्रेआधी पूर्वतयारी करायला काही आठवडे धामधूम चाले. दिवसभराच्या श्रमांनंतर झिंगलेले कारागीर आणि इतर कामगार रस्त्यांमधून भटकत. मग वस्तीमधली मुले त्यांचे खिसे कापण्याचा धंदा जोरात चालवीत. हा व्यवसाय सर्वमान्य आणि कायदेशीर बनला होता व मोठ्या माणसांच्या डोळ्यांदेखत बेधडकपणे पोरे पाहुण्यांचे खिसे कापत.

ती मुले सुतारांचे हातोडे चोरीत, जुळाऱ्यांपासून स्क्रूच्या चाव्या पळवीत, गाडीवानांपासून दांड्याचे खिळे लंपास करीत. पण आमची टोळी मात्र ह्या उद्योगात सामील होत नसे.

एक दिवस चूर्काने घोषणा केली: "मी चोरी करणार नाही. आई मला परवानगी देत नाही."

"आणि मला भीती वाटते," खाबी म्हणाला.

कस्त्रोमा नेहमी चोरांपासून लांब असायचा आणि "चोर" हा शब्द विशिष्ट लकबीने जोर देऊन उच्चारायचा. एखाद्या दारुड्याला काही मुले लुटत असलेली जर त्याला आढळली तर तो त्या मुलांचा पाठलाग करायचा आणि दयामाया न करता चोपायचा. हा दुर्मुखला, मोठ्या डोळ्यांचा मुलगा नेहमी मोठ्या माणसाप्रमाणे वागण्याचा प्रयत्न करायचा. गोदीकामगारांप्रमाणे झुलत तो चालत असे आणि बोलताना आवाज खर्जात व जाडाभरडा काढण्याचा तो प्रयत्न करी. एकूण तो आतल्या गाठीचा आणि जुनाट वाटे. त्याचे वागणे अनैसर्गिक भासे. चोरी करणे पाप आहे याबद्दल 'कबूतर'ची खात्री झाली होती.

पण वाळूच्या बेटावरून फळ्या आणि खांब पळवून आणणे हे चोरीमध्ये समाविष्ट नव्हते. ते काम करायला आमच्यापैकी कुणीही घाबरत नसे. आम्ही एक तंत्र शोधून काढले होते, त्यामुळे काम खूपच सोपे बनले होते. संध्याकाळच्या वेळी अंधार पडल्यानंतर किंवा धुक्याच्या दिवशी 'कबूतर' आणि याझ फुगीर, विसविशीत बर्फावरून वाळूच्या बेटाकडे जायला निघत. ते दोघे अगदी उघडपणे, राखणदारांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेण्याचा प्रयत्न करीत जात. याउलट आमच्यापैकी चौघे वेगवेगळ्या दिशांनी हळूच चोरपावलांनी तिथे घुसत असू. याझ आणि 'कबूतर' यांच्यावर नजर ठेवण्यात राखणदार गुंतून राहिलेले असत, तेवढ्यात आधी ठरल्या ठिकाणी आम्ही एकत्र भेटून आपापल्या फळ्या निवडत असू. दरम्यान आमच्या काफल्या-मधील साथींनी राखणदारांची खोडी काढून धूम ठोकली म्हणजे आमचा परतीचा प्रवास सुरू होई. आम्हा प्रत्येकापाशी वाकड्या खिळ्यासकट एक दोर असायचा आणि फळकुटाला खिळा अडकवून आम्ही ते बर्फावरून दोराने ओढत नेत असू. राखणदार क्वचितच आम्हाला पहात आणि जरी त्यांनी पाहिले तरी आम्हाला पकडू शकत नसत. फळकुटे विकून आलेली रक्कम आम्ही सहाजणांमध्ये सारखी वाटून घेत असू. सर्वसाधारणपणे प्रत्येकी पाच ते सात कोपेक येत.

आम्हाला हवे तेवढे खायला एका दिवसापुरते हे पैसे पुरेसे होते. पण 'कबूतर'च्या आईला त्याने वोदका आणून दिली नाही तर ती त्याला मारायची; कस्त्रोमाला कबूतरांच्या शिकारीला जायचे स्वप्न होते म्हणून तो पैसे साठवीत होता. चूर्काची आई आजारी होती, म्हणून त्याला

मिळतील तेवढे पैसे पाहिजेच होते. खाबीला आपल्या गावाला परत जायचे होते म्हणून तोसुद्धा पैसे साठवीत होता. त्याच्या काकाने त्याला त्या गावाहून नीझ्नी-नोवगरदला आणले होते व थोडयाच दिवसात तो काका बुडून मेला होता. खाबी आपल्या गावाचे नांव विसरला होता. वोल्गापाशी असलेल्या कामा नदीवर ते गाव होते एवढेच त्याला आठवत होते.

ह्या गावाबद्दलची कल्पना आम्हाला काही कारणाने मोठी गंमतीची वाटली. तिरकस डोळयाच्या त्या ताताराची आम्ही त्यावरून चेष्टा करीत असू :

हाये कुटंतरी येक गाव,
ठावं न्हाई त्येच नांव—
हाय मागुती का हाय पुढती
असायचं न्हायतर अधांतरी!

सुरुवातीला खाबी आमच्यावर या गाण्याबद्दल खूप [illegible]ायचा. पण "कबूतर"ने आपल्या नांवाला सार्थ अशा रीतीने त्याला [illegible]गोडी लावीत समजावले :

"चल रे, आपल्या मित्रांवर कुणी रागवत असतं [illegible]"

तातार खाबीला स्वतःचीच शरम वाटली. त्याने तो [illegible] स्वीकारला आणि पुढे पुढे तर कामा नदीवरच्या त्या गावाबद्दलचे [illegible] तोच गाऊ लागला.

अजूनही फळया चोरण्यापेक्षा सटरफटर वस्तू गोळा [illegible]णे आम्हाला श्रेयस्कर वाटत असे. वसंतामध्ये त्या कामाला जास्तच मजा [illegible]ायची. तेव्हा बर्फ वितळलेला असायचा आणि जत्रेच्या रिकाम्या मैदानातील फरसबंदी पावसाने स्वच्छ धुवून निघालेली असायची. जत्रेच्या मैदानातील गटारांमध्ये खिळे आणि धातूचे तुकडे नेहमीच सापडत असत. अनेकदा आम्हाला तांब्याची किंवा चांदीची नाणीही सापडत. पण राखणदारांनी आमचा पाठलाग करू नये आणि आमची पोती न्यायला आम्हाला परवानगी द्यावी म्हणून त्यांना दोन कोपेकची नाणी द्यावी लागत किंवा त्यांचे बूट चाटावे लागत. एकूण पाहता पैसे कमावणे काही सोपे नव्हते. पण त्या प्रयत्नात आम्ही एकमेकांचे चांगले मित्र बनलो. कधीतरी आमच्यात भांडणे होत, पण कधीही मारामारी झाल्याचे माझ्या आठवणीत नाही.

'कबूतर' आमच्यामधील भांडणे मिटवीत असे. आमच्या उफाळणाऱ्या भावना शांत करायला त्याला नेहमी योग्य ते शब्द सुचत. ते शब्द अगदी साधे असत, पण त्यामुळे आम्ही चकित होत असू आणि आमची आम्हालाच लाज वाटत असे. त्याला स्वतःलासुद्धा त्याच्या तोंडून बाहेर पडलेल्या शब्दांचे आश्चर्य वाटायचे. याझच्या दुष्ट खोडयांचा तो कधीही अपमान वाटून घ्यायचा नाही. प्रत्येक वाईट गोष्ट ही मूर्ख आणि निरर्थक समजून डोक्यातून तिच्याबद्दलचे विचार शांतपणे काढून टाकायचा.

"अरे तू असा कशासाठी वागलास?" तो असे विचारायचा आणि प्रत्येकाला स्पष्ट समजायचे की, त्या वागण्यात खरेच काही अर्थ नव्हता.

आपल्या आईला तो "माझी मोर्दोवियन" असे संबोधत असे आणि आम्हा कुणालाही ते विचित्र वाटत नसे.

"काल रात्री माझी मोर्दोवियन अगदी तर्रर्र झिंगून आली होती," हसून तो म्हणाला. त्याच्या छोटया वाटोळया डोळयात सोनेरी चमक होती. "उंबरठयावर अडकून पडली आणि म्हातारी वरच्या पट्टीत गाणं कोकलत होती!"

"कोणतं गाणं म्हणत होती?" चूर्काने गंभीरपणे विचारले.

संगीताच्या तालासाठी 'कबूतर' ने आपल्या मांडयांवर थापटया मारल्या आणि आपल्या लहान किनऱ्या आवाजात तो त्याच्या आईचे गाणे गाऊ लागला :

टक् टक् टक्!
खिडकीवर माझ्या –
जवान गुराख्यानं केली टकटक,
अन् लाडक्याच्या सांगाती निघाले तडक!

मावळती पेटली लाल दूर,
गोपाळाच्या पाव्याचे वाजले सूर
गाणी वाजली गोड गोड छान,
ऐकता गावाचं हरपलं भान!

त्याला अशी अनेक आनंदी गाणी माहीत होती व तो ती मोठ्या उत्साहाने गात असे.

"तर ती तशीच दारात झोपून गेली आणि उघड्या दारातून आत घुसणाऱ्या गार वाऱ्यानं मला चांगलीच हुडहुडी भरली," तो पुढे सांगू लागला. "तिचा बोजा दारामधून बाजूला ढकलायला मला काही जमेना. आज सकाळी मी तिला विचारलं, 'एवढी झिंगेपर्यंत कशाला पितेस?' तर म्हणाली, 'ठीक आहे. आणखी थोडे दिवस कळ काढ. मी लौकरच मरीन!'"

"खरंच, अशानं ती फार दिवस जगायची नाही," गंभीरपणे चूर्का म्हणाला.

"तुला वाईट वाटेल?" मी विचारले.

"अर्थात," थोड्याशा चकित सुरात 'कबूतर' उत्तरला. "ती माझ्याशी खूप चांगलं वागलीय."

मोर्दोवियन 'कबूतर'ला मारते हे आम्हाला माहीत असूनही आमची खात्री पटली होती की, ती मनाने फार चांगली होती. ज्या दिवशी आमची कमाई कमी असायची त्यादिवशी चूर्का म्हणायचा:

"आपण प्रत्येकजण 'कबूतर'ला एकेक कोपेक देऊ. म्हणजे तो त्याच्या आईसाठी वोदका विकत घेईल. नाहीतर ती त्याला बदडून काढील."

फक्त मला आणि चूर्काला लिहा-वाचायला येत होते. 'कबूतर'ला या गोष्टीबद्दल आमचा हेवा वाटायचा.

आपला उंदरासारखा टोकदार कान खेचत तो हळूच म्हणायचा, "माझी मोर्दोवियन मेली म्हणजे मग मीसुद्धा शाळेला जाणार आहे. मला शाळेत घ्यावं म्हणून मी मास्तरांच्या पायाची पापी घेईन. शिक्षण संपलं म्हणजे मी आर्चबिशपचा किंवा झारचा माळी म्हणून काम करीन."

त्या वसंतामध्ये मोर्दोवियन लाकडांचा ढीग अंगावर कोसळून मेली. ही घटना घडली तेव्हा तिच्या खाकोटीला वोदकाची बाटली होती व नवीन चर्च बांधण्यासाठी देणग्या गोळा करणारा एक म्हातारा तिच्या सांगाती होता. तिला इस्पितळात नेले तेव्हा चूर्का 'कबूतर'ला म्हणाला:

"माझ्या घरी येऊन रहा. माझी आई तुला लिहायला आणि वाचायला शिकवील."

त्यानंतर लौकरच एक दिवस 'कबूतर' एका दुकानासमोर थांबला:

"किणारा मालाचे दुकान," त्याने ताठ मानेने वाचले.

"ए बावळटा, किराणा असं वाच!" चूकने त्याची चूक सुधारली.

"मला माहीत आहे. अरक्षांची गडबड झाली!"

"अरक्षं नव्हे, अक्षरं!"

"शब्द आनंदानं उड्या मारतात–त्यांना मी वाचतो म्हणून असा आनंद होतोय!"

झाडांबद्दल आणि गवताबद्दल त्याला कमालीचे प्रेम वाटत असे. ते पाहून आम्हाला आश्चर्य वाटायचे, तशी गंमतही वाटायची.

आमची वस्ती वाळवंटी भागात होती. त्यामुळे तेथे झाडी विरळ होती. कुठेतरी अंगणांमधून मरगळलेली वाळुंजी, वाकलेली पांढऱ्या फुलांची झुडुपे किंवा कुंपणांआड दडलेले वाळके गवत दृष्टीस पडायचे. ह्या गवतावर जर आमच्यापैकी कुणी बसला तर 'कबूतर' आम्हाला रागाने ताकीद द्यायचा :

"गवत कशाला खराब करता? वाळूवर बसता येत नाही? तुम्हाला कशाचा काही फरक समजत नाही!"

ज्यावेळी तो आमच्या सांगाती असे तेव्हा ओका नदीच्या किनाऱ्यावर एखाद्या फुलणाऱ्या पांढऱ्या झाडाचे पान तोडायला किंवा वाळुंजी उपटायला आम्ही बिचकत असू.

"सैतानांनो, तुम्ही सगळया गोष्टींची नेहमी नासधूस का करता?" आश्चर्याने खांदे उडवीत तो म्हणायचा.

आणि त्याच्या त्या तशा बोलण्यामुळे आमची आम्हाला लाज वाटायची.

शनिवारी होणाऱ्या खेळाची पूर्वतयारी म्हणून सबंध आठवडाभर आम्ही झाडाच्या सालीच्या जुन्या लाप्ती गोळा करीत होतो. शनिवारी संध्याकाळी जेव्हा तातार गोदीकामगार सैबेरियन धक्क्यावर जायला निघायचे तेव्हा आम्ही एखाद्या रस्त्याच्या कोपऱ्यामागे लपत असू आणि त्यांना लाप्ती फेकून मारीत असू. पहिल्या पहिल्यांदा आमच्यावर ते खूप चिडले, त्यांनी आम्हाला शिवीगाळ केली, आमचा पाठलाग केला. पण लौकरच ते स्वतःच आमच्या खेळात सामील झाले. आगामी लढाईच्या अपेक्षेने तेसुद्धा सालीच्या लाप्तीचा दारूगोळा साठवून ठेवू लागले. आम्ही आमचा साठा कुठे लपवितो ते त्यांना समजल्यानंतर, एक-दोनदा तर त्यांनी आमचाच दारूगोळा पळवून नेला. पण यावर आम्ही हरकत घेतली.

"अशानं खेळ बरोबर होत नाही," आम्ही म्हणालो.

मग ते चोरलेला माल निम्मा निम्मा विभागत आणि लढाई सुरू होई. सर्वसाधारणपणे ते उघड्या मैदानात उभे असत आणि आम्ही आमची क्षेपणास्त्रे त्यांच्यावर भिरकावताना ओरडून गोंगाट करीत असू. तेसुद्धा मोठ्यांदा आरडाओरड करीत आणि आमच्यापैकी एखाद्याला त्यांनी नेम धरून मारलेले चप्पल बसले म्हणजे खदखदा हसत. असा मार बसलेला पोरगा पटकन वाळूत आपले नाक खुपसायचा.

काहीवेळा अंधार पडेपर्यंत हा खेळ चालायचा. किरकोळ व्यापारी कुठल्यातरी आडोशाला राहून आमचा खेळ बघत. उगीच सभ्यतेचा आव आणून आम्हाला नाके मुरडीत. पण धुळकट, राखाडी पक्ष्यांप्रमाणे चपला हवेमधून भिरभिरत रहात. काहीवेळा आमच्यापैकी एखाद्याला सणसणीत दणका बसायचा, पण स्पर्धेच्या आनंदात त्या वेदनेचे आणि जखमेचे फारसे वैषम्य वाटायचे नाही.

आम्ही जेवढे उत्तेजित होत असू, तेवढेच ते तातार उत्तेजित होत. लढाई संपल्यानंतर कधी कधी आम्ही त्यांच्याबरोबर त्यांच्या घरी जात असू. तेथे घोड्याच्या मटणाची मेजवानी मिळत असे. त्याच्या जोडीला एक खास भाजीही असायची. त्यानंतर चांगला कडक चहा आणि दाण्यांची केक मिळायची. त्या धिप्पाड माणसांचा आम्हाला फार लळा होता. त्यांच्यापैकी प्रत्येक जण एकाहून एक वरचढ भासायचा. त्यांच्या स्वभावात काहीतरी अगदी साधे आणि निरागस असे होते. ते कधीही अपमान वाटून घेत नसत आणि नेहमी एकमेकांशी प्रेमाने व कदर राखून वागत, ह्या गोष्टीचा माझ्यावर फार प्रभाव पडला होता.

सगळे तातार पोट दुखेपर्यंत खो खो हसायचे. हसता हसता सरतेशेवटी नर त्यांच्या गालांवर डोळ्यांमधून पाणी ओघळायचे. त्यांच्यापैकी एक जण नर हसताना विव्हळायचा आणि ओरडत रहायचा: "अग आई ग ऽऽ! आई आई ग ऽ! शब्द म्हणजे पक्षी; ऐकला शब्द — धरला पक्षी; सोनेरी पक्षी!" हा कासीमोवचा बाप्या होता. त्याचे नाकाचे हाड मोडले होते आणि त्याच्यात प्रचंड ताकद होती. एके दिवशी त्याने पडावामधून सत्तावीस पूड वजनाची चर्चची घंटा एकट्याने उचलून नदी किनाऱ्यापर्यंत आणली होती.

एके दिवशी त्याने 'कबूतर'ला आपल्या हाताच्या तळव्यावर बसविले आणि हवेत वर उचलले.

"आता आकाशातच रहा," तो म्हणाला.

पावसाळी दिवसात आम्ही याझच्या घरी एकत्र जमत असू. तो आणि त्याचे वडील स्मशानात एका खोपटात रहात. त्याचे वडील म्हणजे वेडचा-वाकडचा शरीराचा, लांब हातांचा, डोक्यावर आणि तोंडावर कळकट केसांचे पुंजके असलेला एक मळकट प्राणी होता. त्यांच्या बारकुळ्या मानेवर त्यांचे डोके एखाद्या सडलेल्या सलगमसारखे दिसायचे. ते आनंदाने आपले पिवळट डोळे किलकिले करायचे आणि भरभर पुटपुटायचे :

"देवा, रात्री सुखानं झोप दे रे!"

आम्ही थोडा चहा, थोडी साखर, पाव आणि याझच्या वडिलांसाठी थोडीशी वोदका खरेदी केली होती.

"ए खप्पड बाप्या, समोवार पेटव!" चूर्का हुकूम द्यायचा.

आणि तो बाप्या हसून हुकूम पाळायचा : पाणी उकळेपर्यंत आम्ही आमच्या गप्पा मारीत असू आणि ते आम्हाला सल्ला द्यायचे.

"चांगलं लक्ष ठेवा – परवा त्रूसोवांच्या घरी मर्तिकाचं जेवण असणार. तिथं खूप हाडं मिळतील!"

"त्रूसोवांची स्वैपाकीण स्वतःच हाडं गोळा करते," सर्वज्ञ चूर्का म्हणाला.

खिडकीमधून स्मशानभूमीकडे नजर लावीत 'व्याखीर' स्वप्नाळू आवाजात म्हणाला : "लौकरच हवा छान होईल आणि आपण राईमध्ये भटकायला जाऊ."

याझ फार क्वचित बोलायचा. उकीरडचांवर सापडलेली खेळणी – लाकडी शिपाई, पायतुटका घोडा, बटणे, पितळी तुकडे – आम्हाला दाखवीत असताना आपल्या उदास नजरेने आम्हाला निरखीत बसायचा.

त्याच्या वडिलांनी तुटके कप टेबलावर मांडले आणि समोवार आणला. कस्त्रोमाने चहा ओतला, तर म्हातारा वोदका प्यायला आणि घुबडासारख्या डोळ्यांनी आमच्याकडे खाली पहात पुटपुटला :

"रांडेच्यांनो, तुमचा नायनाट होवो! अरे माणसं आहात का कोण? छ्या: ऽ! चोरांची टोळी! देवा, रात्री सुखानं झोप दे रे!"

"पण आम्ही चोर नाही," 'कबूतर' म्हणाला.

"तर मग छोटे चोर आहात!"

याझचे वडील आम्हाला फार वैताग देऊ लागले म्हणजे चूर्का त्यांच्यावर खेकसायचा :

"चूप रे खप्पड बाप्या!"

वस्तीमध्ये किती माणसे आजारी आहेत याची यादी ते मोठ्याने मोजू लागले आणि त्यांच्यातील आधी कोण मरणार याबद्दल तर्क करू लागले, म्हणजे 'व्याखीर' ला, चूर्काला आणि मला तेथे बसणे असह्य होई. कुणाच्या मरणाच्या कल्पनेने ते आधीच जिभल्या चाटू लागत. त्यांच्या बोलण्यात करुणेचा अंश नसे. आम्हाला अशा बोलण्याचा तिटकारा येतो हे जेव्हा त्यांच्या लक्षात आले तेव्हा आम्हाला चिडविण्यासाठी ते मुद्दाम बोलत:

"हात्तिच्या! घाबरलात का रे टिल्ल्यांनो! आता लौकरच एक जाडच्या हातपाय झाडून मरणार आहे. त्याला कुजायला फार वेळ लागणार!"

आम्ही त्यांना गप्प बसविले, पण स्वस्थ बसायची त्यांची तयारी नव्हती.

"आणि लौकरच तुमची पाळी येईल! उकीरडे उपसून तुम्ही काही फार दिवस जगणार नाही!"

"ठीक आहे—मरू आम्ही! पण मेल्यावर आम्ही देवदूत बनू!" 'कबूतर' म्हणाला.

"तुम्ही? आणि देवदूत?" याझच्या वडिलांनी क्षणभर या कल्पनेवर विचार केला आणि त्यांना हसू कोसळले. मग प्रेतांच्या किळसवाण्या कथा सांगून ते आमचा छळ करू लागले.

मात्र काही वेळा खालच्या, गेंगाण्या आवाजात ते आम्हाला विलक्षण गोष्टी सांगत:

"ऐकलंत का रे पोरांनो, परवा त्यांनी एका बाईला पुरलं. तिचं मरण संशयास्पद होतं म्हणे! मी सगळी माहिती काढलीय. तुमचं काय मत आहे.."

ते वारंवार बायकांविषयी बोलत आणि नेहमी गलिच्छ बोलत. पण त्यांच्या सांगण्यात काहीतरी कारुण्य आणि कुतूहल असे. जणू ते रहस्य सोडविण्यासाठी विचार करताना आम्ही त्यांना मदत करावी अशी त्यांची अपेक्षा असे. आम्ही लक्षपूर्वक ऐकत असू. ते थांबून थांबून बोलत. अनेकदा प्रश्न विचारण्यासाठी आपल्या बोलण्यात खंड पाडत. पण जे काही ते सांगत त्याचे त्रासदायक कपचे आणि तुकडे आमच्या स्मरणात बोचत रहात.

"'कुणी आग लावली?' त्यांनी तिला विचारलं. 'मी' ती म्हणाली.

'मूर्खे, कसं शक्य आहे? त्या रात्री तू इस्पितळात होतीस!' 'मीच आग लावली', ती पुन्हा म्हणाली. आता असं तिनं का सांगावं? देवा, रात्री सुखानं झोप दे रे बाबा!"

त्या उजाड, भयाण दफनभूमीत त्यांनी पुरलेल्या जवळ जवळ प्रत्येक माणसाच्या आयुष्याचा इतिहास त्यांना माहीत होता. जेव्हा ते बोलू लागत तेव्हा जणू भोवतालच्या घरांची दारे ते सताड आमच्यासाठी उघडत; आम्ही त्या घरांमध्ये प्रवेश करीत असू आणि तिथे राहणाऱ्या लोकांचे जीवन पहात असू. या कृतीमध्ये काहीतरी धीरगंभीर आणि महत्त्वाचे आहे असे आम्हाला वाटत असे. याझचे वडील आख्खी रात्र बोलू शकतील असे वाटायचे. पण अंधार पडताच चूर्का टेबलापासून उठत म्हणायचा:

"मी घरी जातो. आई काळजी करत बसली असेल. कोण येतंय माझ्या-बरोबर?"

आम्ही सारे त्याच्या बरोबर जात असू. याझ आमच्याबरोबर कुंपणा-पर्यंत चालत यायचा, फाटकाला कुलूप लावायचा आणि आपला काळपट, खप्पड चेहरा फाटकाच्या दांड्यांना चिकटवून आम्हाला निरोप द्यायचा.

त्याला त्या स्मशानात सोडून जाताना आम्हाला फार विचित्र वाटायचे. अशाच एका संध्याकाळी कस्त्रोमाने मागे वळून पाहिले आणि तो म्हणाला:

"एखाद्या सकाळी आपण जागे होऊ तेव्हा मरून पडलेला आपल्याला सापडेल!"

याझ आम्हा सर्वांपेक्षा वाईट आयुष्य जगतो असा चूर्का नेहमी दावा करायचा. पण 'कबूतर' आक्षेप घेई.

"आपण मुळीच वाईट रहात नाही," तो म्हणायचा.

मी त्याच्याशी सहमत होतो. रस्त्यावरचे स्वैर स्वतंत्र जीवन मला आवडत होते आणि त्याचा मी मनापासून आनंद उपभोगीत होतो. माझे मित्र मला आवडत होते. आमच्या मैत्रीमुळे माझ्या मनात एक नवी भावना उत्पन्न झाली होती. माझ्या मित्रांना नेहमी मदत करण्याची आणि त्यांचे हित करण्याची इच्छा निर्माण झाली होती.

शाळेमध्ये पुन्हा मला अडचणींना तोंड द्यावे लागत होते. मुले मला भटक्या आणि भंगारवाला म्हणू लागली होती. अशाच एका भांडणानंतर

त्यांनी मास्तरांना जाऊन सांगितले की, माझ्या अंगाला उकीरड्याची एवढी घाण मारते, की माझ्याजवळ बसणे त्यांना अशक्य झाले होते. या गोष्टीचे मला किती विलक्षण दु:ख झाले होते आणि त्यानंतर परत शाळेत जाणे किती अवघड होते, याची मला अजून आठवण आहे. ती तक्रार अगदी खोडसाळपणाची होती: दररोज सकाळी मी काळजीपूर्वक आंघोळ करायचा आणि रद्दी गोळा करताना जे कपडे घालायचा ते कपडे घालून मी कधीही शाळेत येत नसे.

सरतेशेवटी मी तिसरीची परीक्षा पास झालो. चांगल्या गुणांबद्दल मला प्रशस्तीपत्र देण्यात आले. त्याच्या जोडीला एक बायबल, क्रिलोवच्या दंतकथांचा संग्रह आणि 'फता-मॉर्गना' असे गूढ शीर्षकाचे एक पुस्तकही देण्यात आले. ही बक्षिसे मी घरी आणली तेव्हा माझे आजोबा हेलावले आणि त्यांना खूप आनंद झाला. ही पुस्तके आपण काळजीपूर्वक जपून ठेवली पाहिजेत असे ते म्हणाले आणि भक्कम पेटीत ती पुस्तके ठेवण्याचा मनोदय त्यांनी व्यक्त केला. बरेच दिवसपर्यंत आजी आजारी होती आणि तिच्यापाशी पैसे नव्हते. आजोबा कण्हत कुंथत विव्हळले:

"तुम्ही माझा सर्वनाश करणार. तुम्ही माझा काळ ठरणार..."

तेव्हा मी सरळ माझी पुस्तके उचलली आणि पंचावन्न कोपेकना दुकानदाराला नेऊन विकली. ते पैसे मी आजीला दिले. प्रशस्तीपत्रावर गिचमिड लिहून मी ते खराब केले आणि आजोबांच्या हातात ठेवले. माझी गिचमिड त्यांच्या ध्यानात आली नाही. त्यांनी काळजीपूर्वक ते प्रशस्तीपत्र पेटीत ठेवले.

शाळा संपल्यानंतर मी माझ्या रस्त्यावरच्या भटक्या जीवनाला आरंभ करायचा. वसंत ऋतू सुरू झाल्यामुळे या जीवनाला आणखीच मजा येत होती. आता आम्ही जास्त पैसे कमावीत होतो. रविवारी आमचे सबंध टोळके जंगलात भटकायला जायचे. संध्याकाळी परत घरी येताना आम्ही पार थकून गेलेले असायचे. पण मनाने आम्ही एकमेकांच्या आणखी जवळ आलेले असायचे.

हे आयुष्य फार काळ टिकले नाही. माझ्या सावत्रबापाची नोकरी गेली आणि तो कुठेतरी निघून गेला. माझी आई आणि छोटा भाऊ निकोलाय आजोबांकडे रहायला आले. माझी आजी एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या घरी

रहायला गेली होती. तिथे ती प्लाश्चानीचा* विणायचे काम करीत होती. म्हणून घरातील आजाऱ्यांच्या शुश्रूषेचे काम मला करावे लागत होते.

माझ्या गप्प राहणाऱ्या क्षीण आईला उठून बसायची ताकद राहिली नव्हती. माझ्या भावाच्या पायाच्या घोटयांवर भलेमोठे फोड उठले होते. तो एवढा अशक्त होता, की त्याला धड रडतासुद्धा येत नव्हते. जर तो भुकेला असला तर भयानक कण्हायचा आणि त्याला भूक नसली म्हणजे डुलक्या काढायचा. झोपेत मोठमोठे उसासे टाकायची आणि मांजराच्या पिल्लाप्रमाणे पुर्रर्र पुर्रर्र आवाज करायची त्याला सवय होती.

"त्या पोराला चांगल्या अन्नाची गरज आहे. पण तुम्हा सगळ्यांना पुरेल एवढं खायला कुठून आणणार मी?" एक दिवस बाळाला बारकाईने पहात आजोबा म्हणाले.

"त्याला काही फार लागत नाही," उसासा टाकीत आई घोगऱ्या आवाजात उत्तरली.

"ह्याला थोडं... त्याला थोडं... आणि सगळं मिळून तर खूप होतं..."

तिरसटून आजोबांनी हात झटकला आणि माझ्याकडे वळून ते म्हणाले:

"निकोलायला बाहेर ऊन मिळालं पाहिजे... वाळूत..."

मी पोतेभर स्वच्छ, कोरडी वाळू आणली आणि खिडकीखाली ऊन्हाच्या जागी ओतली. मग आजोबांनी सांगितल्याप्रमाणे माझ्या भावाला त्या वाळूत गळाभर पुरले. बाळाला हा मामला आवडलेला दिसला. डोळे किलकिले करून निकोलाय तेथे मजेत बसून राही, मधून मधून माझ्याकडे टक लावून पाही. त्याचे डोळे म्हणजे केवळ निळ्या बाहुल्या दिसायच्या आणि त्यांच्याभोवती आणखी एक फिकट निळे वर्तुळ दिसायचे.

माझ्या भावाचा मला फार लळा लागला. माझ्या मनातील सर्व विचार त्याला समजतात असे मला भासायचे. खिडकीखाली त्याच्या शेजारी मी तासन्‌तास पडून रहायचा. खिडकीमधून आजोबांचा किरकिरा आवाज ऐकू येत असे:

"मरायला काही फारशी अक्कल लागत नाही. कसं जगावं हे जर तुला समजलं असतं तर आता..."

---

*शवपेटीत निजलेल्या ख्रिस्ताचे चित्र विणलेले वस्त्र.—सं.

या पाठोपाठ माझ्या आईची प्रदीर्घ काळपर्यंत खोकल्याची उबळ ऐकू यायची.

निकोलाय वाळूमधून आपले हात सोडवून घ्यायचा आणि आपला फिकट चेहरा डोलवीत माझ्यापुढे ते हात धरायचा. त्याचे केस विरळ आणि रूपेरी होते. त्याचा चेहरा पोक्त आणि विचारी दिसे.

एखादे मांजर किंवा कोंबडीचे पिल्लू जवळ आले तर निकोलाय लक्षपूर्वक त्याच्याकडे पहात राही व माझ्याकडे वळून एक फिकट स्मित करी. त्याच्या ह्या स्मिताने मी अस्वस्थ व्हायचा. त्याच्या शेजारी बसून मला किती कंटाळा आलाय हे तर माझ्या छोटया भावाला समजले नसेल ना! त्याला सोडून रस्त्यावरच्या माझ्या टोळक्यात जायची मला तीव्र इच्छा व्हायची हे तर त्याला कळले नव्हते ना?

आवार छोटे होते आणि सर्व प्रकारची घाण त्याच्यात विखुरलेली होती. फाटकापासून परसदारी हमामखान्यापर्यंत पडव्या आणि इतर खोपटांची माळ लागली होती. छपरांवर फळया, ओंडके, ओलसर लाकडांचे तुकडे आणि फुटक्या बोटींचे अवशेष यांचे उंचच उंच ढीग लागले होते. बर्फ वितळून वसंतामध्ये ओका नदीला पूर आल्यानंतर पैदा केलेली ती मानचिन्हे होती. सबंध आवारभर नदीच्या पाण्यात भिजलेली लाकडे पडली होती. ऊन्हात वाळताना त्यांच्यामधून एक दुर्गंधी बाहेर पडे.

आमच्या शेजारीच एक छोटा कत्तलखाना होता. जवळ जवळ दररोज सकाळी वासरांचे हंबरणे आणि बकऱ्यांचे केविलवाणे बेंबाटणे आमच्या कानांवर येई. रक्ताचा दर्प एवढा उग्र असे की, धुळकट हवेत जणू लाल जाळयात तो ओठंगून राहिला आहे असा मला भास होई.

कपाळाच्या मधोमध कुऱ्हाडीचा घाव घालून जेव्हा जनावरांचे आवाज बंद करण्यात येत, तेव्हा निकोलाय कपाळाला आठ्या घाली, त्याच्या ओठांना मुरड पडे. जणू तो त्या प्राण्यांच्या आवाजांची नक्कल करू पाही. पण 'फुर्र फुर्र' अशा बारिक आवाजापलिकडे त्याच्या तोंडून दुसरा आवाज उमटत नसे.

दुपारी आजोबा खिडकीतून मुंडके बाहेर काढून ओरडत: "जेवायला चला!"

ते स्वत: बाळाला मांडीवर घेऊन बसत. पाव आणि बटाटा चघळून मऊ करीत व बाळाच्या छोट्या ओठांमधून भरवीत. बाळाचे तोंड आणि छोटी टोकदार जिवणी बरबटून जाई. असे थोडे अन्न भरविल्यानंतर आजोबा बाळाचा सदरा वर उचलून त्याच्या फुगीर पोटावर बोटाने दाबून म्हणत:

"याचं पोट भरलं की नाही कुणास ठाऊक! आणखी थोडं भरवू काय?"

"तो पाव धरायला बघतोय ते दिसत नाही का?" अंधाऱ्या कोपऱ्यात पडून राहिलेली माझी आई म्हणायची.

"बाळाला आपलं पोट भरलेलं सांगता येत नाही."

पण तरीही ते त्या लगद्याचा आणखी एक गोळा बाळाच्या तोंडात कोंबत. या प्रकाराची मला भारी लाज वाटे. माझ्या घशात काहीतरी दाटून येई आणि ओकारीची भावना होई.

"आता याला त्याच्या आईपाशी ने," शेवटी आजोबा म्हणत.

निकोलायला मी घेतले म्हणजे तो कण्हायचा आणि टेबलाकडे झेप घ्यायचा. आई एवढी खंगली होती की, पाने झडलेल्या देवदारासारखी दिसायची. बाळाला घेण्यासाठी ती माझ्या दिशेने आपले सुकलेले लांब हात पसरायची.

आताशा ती क्वचितच बोलत असे आणि जे काही मोजके शब्द ती उच्चारायची ते तिच्या कफभरल्या छातीमधून घरघरत्या आवाजात उमटायचे. आख्खा दिवस ती त्या कोपऱ्यात मेल्यासारखी निपचित पडून रहायची. तिची मरणाच्या दिशेने वाटचाल सुरू झाल्याचे मला जाणवत होते. त्यातच आजोबा वारंवार मरणाबद्दल बोलत होते आणि वस्तुस्थिती स्पष्ट करीत होते. विशेषत: संध्याकाळच्या वेळी कोंदट घाण वास हवेत पसरला म्हणजे मरणाविषयीच्या त्यांच्या बोलण्याला जोर चढायचा.

आजोबांचा बिछाना एका कोपऱ्यात अगदी पुतळ्यांखाली होता. खिडकीकडे डोके करून ते झोपत आणि झोपी जाण्यापूर्वी स्वत:शीच पुटपुटत:

"आता मरणाची घटका जवळ आलीय! काय उत्तर द्यायचं देवापाशी? काय सांगणार? जणू काही आयुष्यात मी श्रमलोच नाही—दुसरंच काहीतरी करत बसलो! काय परिस्थिती आलीय पहा!"

चुलाणा आणि खिडकी यांच्या दरम्यान मी खाली झोपायचा. ती जागा मला अपुरी पडायची आणि माझे पाय मी चुलाण्याखाली घुसवायचा. तेथे झुरळे माझ्या पायांना गुदगुल्या करायची. पण ह्या मोक्याच्या जागेवरून केलेली निरीक्षणे मला एक प्रकारचे आसुरी समाधान द्यायची. भट्टीधून भांडी बाहेर काढताना आजोबा जो चिमटा वापरीत त्याच्या दुसऱ्या टोकाचा धक्का लागून नेहमी खिडकीची काच फुटत असे. त्यांच्यासारख्या चतुर माणसाला त्या चिमट्याला आखूड करण्याची अक्कल सुचू नये, याचे मला आश्चर्य वाटायचे.

एक दिवस भट्टीत काहीतरी उकळत ठेवलेले बाहेर काढताना आजोबांनी चिमटा एवढ्या जोराने हिसकला, की त्यांनी चिनी मातीचे भांडे तर फोडलेच, पण खिडकीच्या दोन्ही तावदानांची काच फोडली. हे नुकसान फार होते. आजोबा मटकन खाली बसले आणि रडायला लागले.

“देवा परमेश्वरा, काय रे झालं ऽऽ ,” ते विव्हळले.

जेव्हा ते घराबाहेर गेले तेव्हा मी पावाची सुरी घेऊन त्या चिमट्याचे टोक तोडले व चिमटा आखूड केला.

“दळभद्र्या, काय केलंस हे?” घरी परतल्यावर त्यांनी माझी करामत पाहिली तेव्हा ते ओरडले. “अरे, तो तासून काढला पाहिजे होता. ता-सू-न! ऐकलंस? त्याच्या वाटोळ्या पिना बनवून विकता तरी आल्या असत्या! घरात तुझ्या रूपानं सैतान घुसलाय जणू!”

आजोबा बाहेर व्हरांड्यात गेले तेव्हा आई मला म्हणाली : “तू कशालाही हात लावत जाऊ नकोस बाबा.”

ऑगस्ट महिन्यात एका रविवारी दुपारी ती मेली. माझा सावत्रबाप नुकताच परतला होता आणि त्याला पुन्हा नोकरी मिळाली होती. स्टेशनाजवळ एका स्वच्छ छोट्या घरात त्याच्याबरोबर रहायला आजी आणि निकोलाय एव्हाना गेले होते. लवकरच माझ्या आईला त्या घरात नेणार होते.

ज्या दिवशी ती मेली त्या दिवशी अत्यंत मंद, पण नेहमीपेक्षा स्पष्ट आवाजात ती मला म्हणाली :

“जा, येवगेनी वासिलीचना जाऊन सांग, मला त्यांना भेटायचंय.” भिंतीचा आधार घेऊन ती खाली बसली.

“पळ लौकर!” नंतर पुन्हा डोके टेकीत ती पुढे म्हणाली.



खिडकीबाहेर त्यांनी नजर टाकली आणि एकदम ते बाहेर पळाले. परत आले तेव्हा त्यांचा चेहरा आनंदाने उजळला होता व पाठीशी 'कबूतर' होता.

"हे बघ काय," याश्चे वडील हातात एक मोडकी टाच धरून म्हणाले. "काय सापडलीय वस्तू! मी आणि 'कबूतर' तुला ही बक्षीस देतोय! या टाचेच्या मागचं छोटं चाक पाहिलंस? नक्की कुणा कज्ञाकाच्या बुटाची ही टाच पडली असणार! 'कबूतर'पासून मी ती विकत घेणार होतो – त्याला दोन कोपेक देऊ केले होते..."

"खोटं कशाला बोलतो?" रागाने 'कबूतर' पुटपुटला. पण याझचे वडील सारखे माझ्याभोवती नाचत होते, डोळे मिचकावीत होते.

"कमाल आहे की नाही? 'कबूतर' असा कधी वागतो का? भलता चिकट! फुकटात त्याच्यापासून काही मिळायचं नाही! पण खरं सांगू, ही टाच तोच तुला बक्षीस देतोय, मी नाही..."

आजीने तोंड धुतल्यानंतर आपल्या निळसर, सुजलेल्या चेहऱ्याभोवती रुमाल गुंडाळला व मला आपल्याबरोबर घरी चलण्यास सांगितले. पण मी नाकारले. दफनानंतर घरी दारू पिण्याचा व मेजवानीचा कार्यक्रम असणार आणि त्यावेळी खूप भांडणे होणार याची मला आधीच कल्पना होती. आम्ही चर्चमध्ये उभे असतानाच मिखाईलमामा याकोवमामाला सांगत असलेले मी ऐकले होते:

"आज आपल्याला मस्त प्यायला मिळणार! होय की नाही?"

ती लोखंडी टाच स्वतःच्या हनुवटीला लटकावून जिभेने तिला स्पर्श करण्याचा खेळ दाखवीत 'कबूतर' माझे मनोरंजन करू पहात होता. याझचे वडील उसने अवसान आणून मोठ्याने हसत होते व ओरडत होते:

"अरे बघ, तो काय गंमत करतोय! बघ तरी!" पण मला ही करामत खुलवू शकली नाही हे जेव्हा त्यांनी पाहिले तेव्हा ते गंभीर बनले.

बस्स झालं! सावर स्वतःला. प्रत्येकाला मरण असतं-पक्ष्यांनासुद्धा! हे बघ, तुला हवं तर तुझ्या आईच्या थडग्याभोवती मी हिरवळ लावतो. काय? आपण आता मैदानात जाऊन हिरवळ गोळा करून आणू— —तू, 'कबूतर' आणि मी—आणि माझा याझही येईल. आपण हिरवळ कापून सुंदरपैकी लावू—असं सुंदर थडगं दुसऱ्या कुणाचं असणार नाही!"

मला ही कल्पना आवडली आणि आम्ही सारे मैदानात गेलो.

माझ्या आईच्या दफनानंतर काही दिवसांनी माझे आजोबा मला म्हणाले:

"अलेक्सेई, तू काही माझ्या गळ्यातलं पदक आहेस असं मला म्हणवत नाही! यापुढं तुला इथं निवारा नाही. उघडच्या जगात जायची तुझी वेळ झालीय..."

तर असे मी उघडच्या जगात पाऊल ठेवले.

१९१३–१९१४

## वाचकांना विनंती

या पुस्तकाबाबत, त्याच्या अनुवादाबाबत, रचनेबाबत आपले मत समजावून घेण्यास व भावी प्रकाशनांसंबंधी आपल्या सूचना जाणून घेण्यास ‘प्रगती प्रकाशना’ला आनंद वाटेल.

आपली मते पुढील पत्त्यावर कृपया कळवावी: १७, झुबोव्स्की बुलेवार्द, मॉस्को, सोविएत संघ.

**М. Горький**

ДЕТСТВО

*на языке маратхи*

Перевод сделан по изданию:
М. Горький, Собрание сочинений
в 30 томах, Гослитиздат,
1951, т. 13

